# श्रीमाधव–तिथी व श्रीहरिवासर व्रतकथा

## [श्रीएकादशीचे शास्त्रीय आणि वैज्ञानिक माहात्म्य, महाद्वादशी, श्रीकृष्ण–जन्माष्टमी, श्रीरामनवमी, श्रीगौर–पौर्णिमा, श्रीनृसिंह चतुर्दशी आदी हरिवासर–व्रते आणि चातुर्मास्य–व्रत, श्रीदामोदर व्रत व श्रीपुरूषोत्तम–व्रत माहात्म्य सहित]



श्रीभक्तिप्रज्ञान गौडीय वेदान्त विद्यापीठ प्रकाशन


श्रीचैतन्य महाप्रभु, श्रीनित्यानंद प्रभु, श्रीअद्वैत आचार्य, श्रीगदाधर पंडित, श्रीवास प्रभु आणि गौर-भक्त-वृंद


श्रील जगन्नाथ दास बाबाजी महाराज


श्रील भक्तिविनोद ठाकूर


श्रील गौरकिशोरदास बाबाजी महाराज


श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर प्रभुपाद


श्रीश्रीमद् भक्तिरक्षक श्रीधर गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद् भक्तिप्रमोद पुरी गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराज


श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त वामन गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त त्रिविक्रम गोस्वामी महाराज


श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज


हरि-नाम-माहात्म्य शिक्षा-गुरू श्रीश्रीमद् अनिरुद्ध प्रभु


श्रीश्रीमद् गौर-गोविन्द स्वामी महाराज



# श्रीब्राह्म-माध्व-गौडीय वैष्णव गुरु-परंपरा



॥श्रीगुरु–गौरांगौ–जयतः॥

# श्रीमाधव–तिथी व श्रीहरिवासर व्रतकथा

**(श्रीएकादशी, महाद्वादशी, श्रीकृष्ण–जन्माष्टमी, श्रीगौर–पौर्णिमा, श्रीनृसिंह चतुर्दशी आदी हरिवासर–व्रते तसेच चातुर्मास्य–व्रत, श्रीदामोदर व्रत व श्रीपुरूषोत्तम–व्रत माहात्म्य सहित)**

**श्री गौडीय वेदान्त समिती आणि त्याच्या अंतर्गत**
**भारतव्यापी श्रीगौडीय मठांचे संस्थापक, श्रीकृष्णचैतन्याम्नाय**
**दशमाधस्तनवर श्रीगौडीयाचार्यकेशरी नित्यलीलाप्रविष्ट**
**ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी**
**महाराज यांचे अनुगृहीत**

**नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत**
**श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज**
**यांच्या प्रेरणेने व कृपेने प्रकाशित**



**प्रकाशकः डॉ. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज**
**कर्नाटकातील प्रचार–केंद्रः श्रीरंगनाथ गौडीय मठ, नृत्य–ग्रामाच्या जवळ, हेसरकट्टा, बंगळूर–५६००८८ दूरध्वनी–०८०९५२४०३८७, ०९३७९४४७८९५ ई–पत्र– bvdandi@gmail.com**
**महाराष्ट्रातील प्रचार–केंद्रः श्रीरंगनाथ गौडीय मठ आणि गोशाळा, मुक्कामः गाडेवाडी, पोस्टः बोरीबेल, तालुकाः दौंड, जिल्हाः पुणे**

जर आपल्याला आपल्या गावातील मंदिरात किंवा स्वतःच्या घरी श्रीमद्भगवद्गीता, श्रीमद्‌भागवत किंवा एकादशी माहात्म्य या विषयांवर विनामूल्य प्रवचन आयोजित करायचे असेल तर आमच्याशी खालील दूरध्वनी क्रमांकांवर संपर्क साधण्याची कृपा करावी. आम्ही गावोगावी जाऊन हरिनामसंकीर्तन व प्रवचन करण्याची इच्छा बाळगतो.

**श्रीपाद जमदग्नी प्रभू (दूरध्वनी–९८५०५१९९०४)**
**श्रीपाद हरिदास प्रभू (दूरध्वनी–९७६६३३०२०३)**
**श्रीपाद भक्तिवेदान्त विष्णुदैवत स्वामी**
**बीई, एमटेक (आयआयटी. खरगपूर)**
**(दूरध्वनी–०८२७५८४५३४४, ०७५७९९२३८४५)**
**ई–पत्रः vd108108108@gmail.com**

‘श्रीमाधव–तिथी व श्रीहरिवासर व्रतकथा’ या ग्रंथाच्या मराठी आवृत्तीच्या प्रकाशनासाठी खालील भक्तांनी सहाय्यता दिली. आम्ही त्यांचे आभारी आहोत —**श्रीमान विलास विठ्ठल बर्वे बीए (ऑनर्स), एलएलएम (दौंड); श्रीपाद राधाशरण प्रभू (दौंड); श्री रामानुज प्रभू (रावणगाव); श्री वैकुण्ठ प्रभू (रावणगाव); श्री गोलोक प्रभू (देवळगाव) ; श्री राजाराम प्रभू (रावणगाव); श्री पांडुरंग मेरगळ (रावणगाव); श्री विजय आटोळे (रावणगाव); श्री ब्रह्महरिदास प्रभू (दौंड); श्री विष्णुपंत पाचपूते (बोरीबेल); श्री विठ्ठल पाचपूते (बोरीबेल); श्री अर्जुन कुंभार (बोरीबेल); श्री अंकुशराव येवले (गाडेवाडी); श्री प्रताप जगताप (गाडेवाडी); श्री पांडुरंग क्षीरसागर (भोसे); श्री दिलीप मोरे (खेड); श्री विश्वनाथ प्रभू; श्री कानजी भाई; श्री शांतीदास प्रभू (देवळगाव); श्री विठ्ठल कृष्ण प्रभू (देवळगाव); श्री सुदाम ठणगे (पेडगाव); श्री अमलकृष्ण प्रभू; श्री शिवाजी नाकोरे (शिंगाडेवाडी); श्री निताई प्रभू (कॅनडा); रॅक्मो प्रेस, नवी दिल्ली.**

या पुस्तकाचे मुख्यपृष्ठ श्रीमती बकुला ताईंनी चित्रित केले आहे. इतर छायाचित्रे व कलाकृतींसाठी आम्ही सर्व कलाकारांचे आभारी आहोत. श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराजांची छायाचित्रे भक्तिवेदान्त बुक ट्रस्टच्या सौजन्याने. श्रीदेवानन्द गौडीय मठाच्या ‘श्रीहरिवासर कथा’ या हिंदी ग्रंथाचा अनुवाद यात समाविष्ट आहे.

# अनुक्रमणिका

---



**शुद्ध भक्तीचे आचार्य श्रीतुकाराम महाराज**

**हरे कृष्ण हरे कृष्ण**
**कृष्ण कृष्ण हरे हरे**
**हरे राम हरे राम**
**राम राम हरे हरे**

**जय जय राम कृष्ण हरी!!**

# एकादशी उपवासाची आवश्यकता

आमच्या देशात सामान्यतः सर्व लोक उपवास करतात. सप्ताहाच्या कोण्या कोण्या दिवशी उपवास किंवा व्रत ठेवतात आणि त्या द्वारा विविध देवतांना प्रसन्न करण्याची इच्छा असते. या व्रताच्या मागे काहीतरी उद्देश्य निश्चितच असते. साधारणतः धनप्राप्तीसाठी, आजार ठीक होण्यासाठी, राजनीतीमध्ये पद प्राप्त करण्यासाठी, चांगली नोकरी, पत्नी या पतीच्या प्राप्ती साठी लोक उपवास करतात. भौतिक इच्छा प्राप्ती साठी उपवास केल्याने अनेकवेळा फळ प्राप्त होते. परंतु हे फळ भौतिक असल्यामुळे फक्त क्षणिक असते. असे व्रत करणे म्हणजे भगवंताशी केलेला सौदाच आहे. आमची इच्छा पूर्ण होताच व्रत समाप्त करून आम्ही विसरून जातो. 'गरज संपताच वैद्याची आवश्यकता उरत नाही!' श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराज अशा अनुष्ठानांना 'भौतिक धर्म' म्हणत असत.

भगवान श्रीकृष्णांचे भक्तदेखील एकादशी, जन्माष्टमी, रामनवमी, गौर पौर्णिमा, नृसिंह-चतुर्दशी, किंवा अन्य वैष्णव तिथींना उपवास करतात, व्रत पालन करतात. याच्या मागे त्यांचा काय उद्देश असतो? वस्तुतः भक्तांची कोणतीही भौतिक कामना नसते. भक्त आपल्या आध्यात्मिक उन्नतीसाठी हे व्रत करतात. भगवंताच्या प्रती आपली भक्ती वाढवणे हाच भक्तांचा मूळ उद्देश असतो. उपवास केल्याने मन शुद्ध होते. मन वश होते. मनाला वश करून त्यास भगवान श्रीकृष्णांच्या सेवेत उत्तमरीत्या नियुक्त करण्यास उपवास सहाय्यक होतो.

एकादशीच्या दिवशी अन्नाचा त्याग करून शरीराच्या आवश्यकता कमी करून श्रवण-कीर्तनाद्वारे भगवंताची अधिकाधिक सेवा करणे—हे उपवासाचा खरा प्रयोजन होय. याद्वारे भगवान संतुष्ट होतात. भारतात अनादी कालापासून एकादशीच्या व्रताचे पालन केले जाते आहे. परंतु साधारण लोकांना अध्यात्माच्या प्रती काहीच रुची नाही आहे. जर कोणी एकादशीचे व्रत ठेवू इच्छिले तर घरातील लोक नाराज होतात. "एकादशी व्रताचे पालन तर वयोवृद्ध लोकांसाठीच आहे, तरुणांनी तर खाऊन पिऊन मौज करायला हवी"—असा उपदेश दिला जातो. श्रील भक्तिवेदांत स्वामी महाराज एकादशी आणि अन्य उत्सवांच्या दिवशी व्रत ठेवण्यास आध्यात्मिक जीवनाचे महत्त्वपूर्ण अंग मानतात. ते म्हणतात—"हे सर्व विधि-विधान आमच्या महान आचार्यांनी त्या लोकांसाठी

बनविली आहेत जे दिव्य जगात भगवंतांचा संग प्राप्त करण्याचे इच्छुक आहेत. महात्मागण या सर्व विधि-विधानांना मानतात, म्हणून त्यांना फळ मिळते."

श्रील व्यासदेवांनी पुराणांमध्ये अनेक स्थानांवर एकादशी-व्रताचे माहात्म्य वर्णन केले आहे. या पुस्तकात अपरा एकादशीच्या माहात्म्याचे वर्णन कथा रूपात केले गेले आहे. कथा वाचल्यावर कोणाला असे प्रतीत होऊ शकते की या पालनाद्वारे भौतिक लाभ होतो, म्हणून हे व्रत केवळ भौतिक लाभार्थ आहे. परंतु तसे अजिबात नाही. जे वैष्णव आहेत, त्यांच्यासाठी हे सर्वश्रेष्ठ व्रत आहे. एकादशी भगवान श्रीकृष्णांना अत्यंत प्रिय आहे, म्हणून त्यास हरिवासर म्हणतात. उपवास शब्दाचा अर्थ आहे जवळ राहणे. आम्हाला जर भगवंताच्या निकट राहायचे असेल तर उपवास करणे आवश्यक आहे. म्हणून एकादशीच्या दिवशी सर्व भौतिक इंद्रिय तृप्तीच्या कार्यांपासून दूर राहून भगवंतांच्या नामस्मरणात अधिकाधिक समय घालवायला हवा. ब्रह्मवैवर्त पुराणात म्हटले आहे की-

**उपावृत्तस्य पापेभ्यो यस्तु वासो गुणैः सह।**
**उपवासः स विज्ञेयः सर्व भोग विवर्जितः॥**

उपवासाचा अर्थ सर्व पापांपासून आणि इंद्रिय तृप्तीच्या कार्यांपासून दूर राहणे. एकादशी व्रताच्या पालनाने धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांची प्राप्ती तर खचितच होते, परंतु त्याच्यासोबत पंचम पुरुषार्थ भगवद्-भक्ती अथवा कृष्ण-प्रेमाची सुद्धा प्राप्ती होते. श्रीहरिभक्तिविलास नामक ग्रंथात सांगितले गेले आहे की—

**एकादशी व्रतं नाम सर्व-काम-फल-प्रदम्।**
**कर्त्तव्यं सर्वदा विप्रैः विष्णु प्रीणनकारणम्॥**

भगवान श्रीविष्णूच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मणांनी एकादशी व्रताचे पालन करायला हवे. हे त्यांचे कर्तव्य आहे. म्हणूनच प्रत्येक व्यक्तीला भगवंताच्या प्रसन्नतेसाठी या व्रताचे पालन करायला हवे. भगवान श्रीविष्णूंच्या प्रसन्नतेने सुख आणि समृद्धी आपोआप प्राप्त होते. ॐ विष्णुपाद नित्यलीला प्रविष्ट सच्चिदानंद भक्तिविनोद ठाकूर आपल्या एका गीतात लिहतात—

**माधव तिथी भक्ति जननी यतने पालन करी।**

माधव तिथी अर्थात एकादशी व्रत, भक्तिजननी (भक्तीची आई) आहे. अर्थात हे व्रत आमच्या हृदयात भक्ती निर्माण करणारे आहे. म्हणून ते म्हणतात की, आम्हाला प्रयत्नपूर्वक त्याचे पालन करायला हवे. संत शिरोमणी श्री तुकाराम महाराज म्हणतात—

**ज्यासी नावडे एकादशी। तो जिताची नरकवासी॥**
**ज्यासी नावडे हे व्रत। त्यासी नरक तोहि भीत॥**
**ज्यासी घडे एकादशी। जाणे लागे विष्णुपाशी॥**
**तुका म्हणे पुण्यराशी। तोचि करी एकादशी॥**

ज्या अमूल्य व्यक्तीला एकादशी आवडत नाही, ती जिवंत अवस्थेतच नरकात राहणारी आहे. ज्या व्यक्तीला हे व्रत पसंत नाही, तिला नरकसुद्धा घाबरते. कारण ती व्यक्ती महापापी मानली जाते. जी व्यक्ती एकादशी व्रताचे पालन करते, तिला निश्चितच वैकुंठाची प्राप्ती होते. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात की ज्या व्यक्तीने पूर्व जन्मात पर्वताएवढे पुण्य केले आहे, तीच केवळ एकादशी व्रताचे पालन करते.

श्रीएकनाथ महाराज (श्रीजनार्दन महाराजांचे शिष्य) म्हणतात—

**एकादशी, एकादशी। जया छंद अहर्निशी॥**
**व्रत करी जो नेमाने। तेथे वैकुंठाचे पणे॥**
**नामस्मरण जाग्रण। वाचे गाय नारायण॥**
**तोचि भक्त सत्य याचा। एका जनार्दन म्हणे वाचा॥**

जो भक्त रात्रंदिवस एकादशी तिथीच्या बाबत विचार करतो आणि नित्यनियमाने एकादशीचे पालन करतो, तो अवश्य वैकुंठाला जाईल. जो भक्त एकादशीच्या दिवशी जागरण करीत भगवान श्रीहरींच्या नामांचे स्मरण करतो, त्या पवित्र नामांचे गायन करतो, तो भगवंतांचा खरा भक्त आहे.

एकादशीला अन्न ग्रहण केल्याने काय होते याचे वर्णन श्रीतुकाराम महाराज अशा प्रकारे करतात—

**एकादशीस अन्न पान। जे नर करिती भोजन।**
**श्वानविष्ठेसमान। अधम जन तो एक॥**
**ऐका व्रताचें महिमान। नेमें आचरती जन।**
**गाती ऐकती हरिकिर्तन। ते समान विष्णूशी॥**

जे लोक एकादशीला अन्न ग्रहण करतात, भोजन करतात ते खूपच पतित जीव आहेत. त्यांना अधम मानले जाते, कारण ते जे भोजन करतात ते श्वान (कुत्र्याच्या) विष्ठेच्या समान असते. जे या व्रताचे माहात्म्य ऐकून त्याचे नियमपूर्वक पालन करतात आणि हरिकीर्तन गातात व ऐकतात, ते विष्णूंच्या समानच बनतात (अर्थात त्यांना सारूप्य आदी मुक्ती प्राप्त होते.)

**अशुद्ध विटालशींचे खळ। विडा भक्षिंती तांबूल।**
**सांपडे सबळ। काळाहातीं न सुटे॥**
**शेज बाज विलास भोग । करि कामिनीशीं संग।**
**तया जोडे क्षयरोग। जन्मव्याधी बळिवंत॥**
**आपण न वजे हरिकिर्तन। आणिकां वारी जातां जन।**
**त्याच्या पापा जाणा। ठेंगणा महामेरु तो॥**
**तया दंडी यमदूत। झाले तयाचे अंकित।**
**तुका म्हणे व्रत। एकादशी चुकलीया॥**

जे एकादशीच्या दिवशी विडा किंवा तांबूल भक्षण करतात त्यांना ऋतुमती स्त्रीचा मासिक धर्मातील विटाळ (अशुद्ध रक्त) पिण्याचे पाप लागते. ते काळपुरुषाच्या तावडीत सापडतात. जे एकादशीला स्त्रियांसोबत भोग-विलास करतात त्यांना क्षय रोग जडतो. जी व्यक्ती हरिकीर्तनाला जात नाही आणि अन्य कोणी व्यक्ती जर जात असेल तर तिला थांबविते, अशा व्यक्तीच्या पापांच्या पर्वतासमोर महामेरू पर्वत सुद्धा ठेंगणा आहे. जी व्यक्ती एकादशी करित नाही, तिला यमदूत दंड देतात. एकादशीच्या दिवशी पापपुरुष अन्नात वास करतो, म्हणून अन्नग्रहण करू नये.

संतांचे शिरोमणी श्रीतुकाराम महाराजांनी छत्रपती श्रीशिवाजी महाराजांना एकादशी व्रत करण्याचा उपदेश दिला होता—

**आम्ही तेणे सुखी। म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखी॥**
**तुमचे ऐरवित्त धन। ते आम्हा मृत्तिकेसमान॥**
**कंठी मिरवा तुळशी। व्रत करा एकादशी॥**
**म्हणवा हरिचे दास। तुका म्हणे मज हे आस॥**

"हे शिवबा! तुम्ही जर नेहेमी तोंडाने विठ्ठलांच्या नामाचे उच्चारण केले तर मला परम आनंद होईल. तुमचे राजवित्त (राजाची संपत्ती) तर माझ्यासाठी अक्षरशः मातीमोल आहे. तुम्ही नेहेमी गळयात तुळशीच्या सुकलेल्या काष्ठापासून (लाकडापासून) बनविलेल्या मण्यांची माळ गळयात मिरवावी. मला हीच आशा आहे की तुम्ही स्वतःला भगवान श्रीहरींचे दास म्हणून घोषित कराल."

पद्म पुराणात असे सांगितले आहे की—

**अश्वेमेधसहस्त्राणि राजसूयशतानि च।**
**एकादश्युपवासस्य कलां नार्हन्ति षोडशीम्॥**

सहस्त्र अश्वमेध यज्ञ आणि शेकडो राजसूय यज्ञ यांना एकादशीच्या उपवासाच्या सोळाव्या कला अर्थात ६ टक्के इतके

सुद्धा महत्त्व नाही आहे.

**स्वर्गमोक्षप्रदा ह्येषा शरीरारोग्यदायिनी।**
**सुकलत्रप्रदा ह्येषा जीवत्पुत्रप्रदायिनी॥**
**न गंगा न गया भूप न काशी न च पुष्करम्।**
**न चापि वैष्णवं क्षेत्रं तुल्यं हरिदिनेन च॥**

एकादशी स्वर्ग, मोक्ष, आरोग्य, चांगली पत्नी आणि चांगला पुत्र प्रदान करते. गंगा, गया, काशी, पुष्कर, वैष्णव क्षेत्र यांच्यातील कोणीही एकादशीची बरोबरी करू शकत नाहीत. एकादशी या व्रताचे आणखी एक माहात्म्य आहे.

ज्यांना आपले हित साधायचे आहे अश्या व्यक्तींनी निम्न लिखित अन्न-धान्यांचा व निषिद्ध पदार्थांचा एकादशीच्या दिवशी त्याग करायला हवा.

१) तांदूळ आणि त्या पासून बनलेले पदार्थ, २) गहू, ज्वारी, मका. तसेच या पासून बनलेले पदार्थ, ३) डाळी—मूग, मसूर, तूर, चणे, मटार इत्यादी ४) जव (सातू), ५) राई आणि तिळाचे तेल ६) भगर (वरईचा म्हणजे श्यामा तांदूळ), साबुदाणा, पांढरी साखर ७) चहा, कॉफी, रासायनिक टूथपेस्ट ८) समुद्राचे आणि काळे मीठ (सैंधव मीठ चालेल) ९) सर्व प्रकारचे मसाले (आले आणि काळया मिरी चालतील)

चुकूनसुद्धा या पदार्थांचे सेवन करू नये. अन्यथा व्रत भंग होते. भक्तीमध्ये प्रगती करण्यास इच्छुक व्यक्तींनी याचे पालन करायला हवे. एकाच दिवशी दोन तिथी (दशमी आणि एकादशी आल्यास वैष्णव त्या दिवसाचे व्रत अथवा उत्सव दुसऱ्या दिवशी करतील.) म्हणून आम्हाला स्मार्त आणि भागवत अशा दोन एकादशी आढळतात. हरिभक्तिविलास या ग्रंथात म्हटले आहे, “हे ब्राह्मण, सूर्योदयाच्या ९६ मिनटे आधी एकादशी आरंभ झाल्यास त्या एकादशीस ‘शुद्धा एकादशी’ म्हणावे.” गृहस्थांनी विद्धा अथवा स्मार्त एकादशीचा त्याग करून केवळ शुद्धा अर्थात भागवत एकादशीचे पालन करायला हवे. एकादशी करणाऱ्या किंवा करण्याची इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस हा ग्रंथ ध्यान पूर्वक वाचायला हवा.

***—त्रिदंडि-स्वामी भक्तिवेदान्त दंडी महाराज***

---

श्रीकृष्ण म्हणाले, “व्यवहारिक कार्यांत अपेक्षाशून्य, पवित्र, निपुण, अनासक्त, उद्वेगरहित आणि भक्ति-प्रतिकूल समस्त उद्यमांनी रहित माझे जे भक्त आहेत, ते माझे प्रिय आहेत.” *(श्रीगीता १२/१६)*

# निवेदन

*(श्रीएकादशी-व्रतकथा ग्रंथात प्रकाशित)*

श्रीगौडीय वेदांत समिती द्वारे श्रीएकादशी-व्रतकथा-नामक ग्रंथ सप्तम आवृत्तीच्या रूपात प्रकाशित झाला आहे. विभिन्न पुराणे आणि वैष्णव-स्मृतिराज श्रीहरिभक्तिविलास इत्यादी ग्रंथांतून हा संकलित झाला आहे. श्री गौडीय वेदान्त समितीद्वारे प्रकाशित 'श्रीचैतन्य पंजिके' चे पुनःप्रवर्तक नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्री श्रीमद् भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज यांनी स्व-लिखित भूमिकांमध्ये, श्रीचैतन्य-पंजिकेचे आदर्श-स्वरूप—जगद्गुरू श्रील भक्तिसिद्धांत सरस्वती गोस्वामी प्रभुपादांच्या विचारधारेने संवलित "गौडीयेर कृत्य" (भागवत धर्म) शीर्षकाने त्यांचे स्व-हस्त-लिखित काही उपदेश मुद्रित केले आहेत. त्यामध्ये संख्यापूर्वक नाम-जपासहित 'एकादशी' इत्यादी 'हरिवासर-व्रतपालना' च्या संबंधी विशेष निर्देश प्रदत्त झाले आहेत. चौसष्ट प्रकारच्या भक्तीच्या अंगांमध्ये सुद्धा एकादशी-व्रत पालनाचा विषय उल्लेखित आहे. म्हणून भक्ती लाभ करण्यासाठी सर्व लोकांद्वारे या एकादशी किंवा हरिव्रत पालनाचे नित्यत्व आणि उपयोगिता स्वीकृत झाली आहे.

पुराणे इत्यादी मध्ये उल्लेख आला आहे की—परमवल्लभा एकादशी तिथी मनुष्य-मात्रासाठीच (प्रत्येक माणसासाठीच) सर्वाभीष्ट-प्रदायिनी आहे. शुक्ल असो किंवा कृष्ण, दोन्ही पक्षांतील एकादशी तिथीच्या दिवशी पूजा-महोत्सव इत्यादी अनुष्ठान करणे कर्तव्य आहे. या व्रताचे पालन केल्याने सर्व पाप-ध्वंस, सर्वार्थ-प्राप्ती आणि श्रीकृष्णांचे प्रितिविधान होते. भगवंतांचे प्रितिविधान, विधि-प्राप्तत्व, भोजनाची निषिद्धता आणि व्रत न केल्यामुळे दोष —या चार कारणांमुळे उक्त व्रताचे नित्यत्व प्रसिद्ध आहे. एकादशीचे व्रत श्रीहरींसाठी सर्वात अधिक प्रिय आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, नारी-पुरूष जे सुद्धा भक्तिपूर्वक एकादशी व्रत पालन करतील, ते मोक्ष आणि भगवत्-सान्निध्य प्राप्त करू शकतात.

सर्वांसाठी एकादशीच्या उपवासी राहून उपरोक्त व्रत पालन करणे अत्यावश्यक आहे. उपवास-फलेच्छू (उपवासाच्या फळाची इच्छा करणारी) व्यक्ती एक दिवस आधी रात्रीचे भोजन, उपवासाच्या दुसऱ्या दिवशी रात्रीचे भोजन आणि उपवासाच्या दिवशी सकाळचे आणि रात्रीचे भोजनाचा परित्याग करतील. हरिवासरा (उपवासा) च्या दिवशी ब्रह्म-हत्या इत्यादी समस्त पाप अन्नात प्रवेश करतात,

म्हणून या वेळी पंचशस्य (जव—गव्हासारखेच एक प्रकारचे पीक, तांदूळ, राई, उडीद-डाळ, तीळ इत्यादी) भोजन केल्याने सर्व प्रकारच्या पापांनाच ग्रहण करावे लागते आणि मातृघाती (आईची हत्या करणारा), पितृघाती (वडिलांची हत्या करणारा), भ्रातृघाती आणि गुरुघाती पापी म्हणून त्याची गणना होते. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी (त्रिदंडि-संन्यासी) च्या द्वारे एकादशीच्या दिवशी भोजन केल्याने गोमांसाचे (गाईच्या मासाचे) भोजन केल्या समान होते. ब्रह्मघाती (ब्राह्मणाची हत्या करणारे), सुरापायी (दारू पिणारे), चोर इत्यादीसाठी मुक्तीचे विधान आहे, परंतु एकादशीला अन्न भोजन करणाऱ्याच्या रक्षणासाठी कोणतीही व्यवस्था नाही आहे. एकादशीला अन्न ग्रहण करणारी व्यक्ती पितरांसोबत नरकगामी होते. हरिवासर तिथीला कोणालाही भोजनाचा आग्रह करणे हा सुद्धा अन्यायच आहे.

जी विधवा स्त्री एकादशीच्या दिवशी अन्न वगैरे ग्रहण करते, तिची सारी सुकृती (पुण्य) नष्ट होते आणि सर्ववर्णी, सर्वाश्रमी, विधवा, यती, सतीची सुद्धा 'अंधतामिश्र' नामक नरकात दुर्गती होते. भक्तियुक्त होऊन पुत्र-पत्नी आणि नातेवाईकांसोबत दोन्ही पक्षांची एकादशीला उपवास केल्याने भगवद्-भक्ती आणि परम-पद प्राप्त होते. घोर विपत्ती किंवा जनन आणि मरणाशुचीमध्ये (सुतकात) सुद्धा एकादशी व्रताचा त्याग करू नये. एकादशीच्या दिवशी नैमित्तिक श्राद्ध आल्यास उपवासी (उपाशी) राहून द्वादशीला श्राद्ध करायला हवे. उपवासाच्या दिवशी कधीही श्राद्ध करू नये, कारण त्या दिवशी देवता आणि पितृगण निंदित-अन्नाचे भोजन करीत नाहीत. एकादशीच्या दिवशी श्राद्ध केल्याने दाता (दान देणारा), भोक्ता आणि विगत आत्मा (वारलेली व्यक्ती) या तिघांनाही नरकात जावे लागते. आठ वर्षाच्या वयापासून ऐंशी वर्षाच्या वयापर्यंत शुक्ल आणि कृष्ण—या दोन्ही पक्षांच्या एकादशीला उपवास करणे अबला-वृद्ध-वनिता सर्व मनुष्यांचे कर्तव्य आहे. वैष्णव (भगवान विष्णूंचे भक्त), शैव (शंकरांचे उपासक), सौर (सूर्यदेवांचे उपासक) इत्यादी सर्व मनुष्यांचे कर्तव्य आहे. वैष्णव, शैव, सौर इत्यादी सर्वांनाच हरिवासर-व्रत पालन करायला हवे. शिवजी महाराज (श्रीशंकर) पार्वती देवींना म्हणाले—माझ्या भक्तिबळाचा आश्रय घेऊन हरिवासरात अन्न वगैरे भोजन करणाऱ्या दुष्ट पातकी लोकांना माझे अप्रियकर समजावे. पतिपत्नी दोघे अथवा पत्नी जर पतीच्या उद्देशाने एकादशी-व्रताचे पालन करते तर ती शंभरपट पुण्याची

भागीदार होते. बालक, वृद्ध, आतुर, रोगग्रस्त, असमर्थ व्यक्ती रात्री मात्र एकच वेळ अनुकल्प स्वीकारून अर्थात दूध-फळे-कंदमुळे भोजन करून एकादशी-तिथीचे पालन करतील.

शिशूंच्या रक्षणासाठी माते प्रमाणे आणि रोग्यांच्या परित्राणासाठी औषधाप्रमाणे, सर्व जिवांच्या रक्षणासाठी एकादशी तिथी आविर्भूत झाली आहे. नाना प्रकारच्या दुःखांनी भरलेल्या संसारात दुर्लभ मनुष्य जन्म प्राप्त करून जे एकादशीचे व्रतानुष्ठान करतात, ते धन्य आहेत, ते बुद्धिमान आहेत. एकादशी-व्रतास सोडून अन्य व्रत केल्याने हातात आलेला मणी सोडून लोष्ट्राची (दगडाची) याचना केल्यासारखेच होते. केवळ मात्र एकादशीचा उपवास करून जनार्दनांची भक्तिपूर्वक पूजा केल्याने दुःखपूर्ण संसारातून मुक्ती प्राप्त केली जाऊ शकते. संसार रूपी सर्पाद्वारे दष्ट (दंश झालेले) सर्व पापी मनुष्य एकादशी उपवासाच्या द्वारेच परम सुख-शांती प्राप्त करतात. एकादशीला अन्नाच्या अभावात उपवासी (उपाशी) राहिल्याने किंवा राजगृहात बंदी असलेल्या अवस्थेत एकादशी उपवास केल्याने सुद्धा सम्यक उपवासाचे फळ प्राप्त होते. गोविंदाचे स्मरण आणि एकादशीचा उपवास—हे दोन्हीही निःसंदेह मनुष्यांसाठी प्रायश्चित्त स्वरूप आणि संसारापासून उद्धार करणारे आहेत. जे सर्व सुख-धर्म-गुणाचे आश्रय जगतपतीचे अत्यंत प्रिय आणि सर्व धर्मांत श्रेष्ठ, एकादशी-व्रताचे श्रद्धापूर्वक पालन करतात, ते वैकुंठ-गती लाभ करतात. एकादशी-व्रतकथा श्रवण ऐकल्याने, याचे अनुष्ठान केल्याने, याच्या अनुष्ठानास अनुमती दिल्याने अथवा व्रत पालन करण्यासाठी मनुष्यांच्या हृदयात श्रद्धा उत्पन्न केल्याने सर्व पापांतून परित्राण आणि अत्युत्तम गती प्राप्त होते. हरिवासरास सोडून दान, तपस्या, तीर्थ-स्थान किंवा अन्य कोणत्याही प्रकारचे पुण्य मुक्तीचे कारण होत नाही. एकादशी-व्रत परायण व्यक्ती सर्वत्र पूज्य होते; रोग, उपसर्ग, दाह, ग्लानी आणि कातरता यापासून त्याला भयाची संभावना राहात नाही आणि सर्वदा त्याच्या चित्तात श्रीहरीची स्मृती बनून राहते; त्या लोकांची नित्य हरिकथेमध्ये रुची आणि नित्य-धर्मात मती राहाते आणि श्रीकृष्णांच्या प्रती अतिशय अमला (विमल) भक्ती प्राप्त होते. एकादशी—पुण्य-स्वरूपिणी, सर्वपाप-विनाशिनी, विष्णु-भक्ति-उद्दीपनी (हृदयात विष्णूंची भक्ती जागविणारी आहे) आणि परमार्थ-गति-प्रदायिनी आहे. जगदीश्वर एकादशीतच मूर्तिमंत होऊन विराजमान आहेत. जी विष्णुमयी-शक्ती अनंतस्वरूपा आणि पूर्ण जगतात व्याप्त होऊन अवस्थित आहे, तीच सर्व

प्रकारचे मंगल प्रदान करणारी एकादशी-तिथी आहे.

अरुणोदय-विद्धा या दशमी-विद्धा एकादशीचा विशेष रूपाने त्याग करीत शुद्धा एकादशी व्रताचे पालन करणे कर्तव्य आहे. तिन्ही लोकांत जितके पाप विद्यमान आहेत, दशमी-संयुक्त एकादशीस त्या पापांचे स्थान म्हटले गेले आहे. राक्षस आणि असुर दशमी-संयुक्त एकादशीचा आश्रय घेतात, आणि द्वादशी-युक्त एकादशीस उपवासी राहणाऱ्या व्यक्तीस भगवान वांछित फळ प्रदान करतात. दशमी-विद्धा एकादशीस हरिवासर (श्रीहरींचा दिवस) म्हटले जाऊ शकत नाही. येथे द्वादशीस उपवास आणि त्रयोदशीस पारणे करण्याचा विधी आहे. जगद्गुरू श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी गायले आहे —"माधव-तिथी भक्ति जननी, यतने पालन करि." 'यतने पालन करि', अर्थात येथे 'विद्धा (एकादशी)'चा परित्याग करीत, व्रत पालन करण्याचा उपदेश दिला गेला आहे.' ग्रंथाच्या शेवटी विद्धा (एकादशी)च्या संबंधी संक्षिप्त विचार प्रदर्शित केले आहेत. एकादशी विभिन्न नामांनी कथित आहे आणि अष्ट-महाद्वादशी सुद्धा वेगवेगळया नामांनी प्रसिद्ध आहेत. या सर्व विषयांचे या ग्रंथात संपूर्ण इतिहास आणि वृत्तांतासहित विश्लेषण झाले आहे. हा ग्रंथ एकादशी-व्रत पालन करणाऱ्यांसाठी यथेष्ट सहाय्यक होईल, यात संशय नाही आहे. या आवृत्तीच्या परिशिष्ट अंशात "अष्ट-महाद्वादशी" निरूपण, व्रत-कृत्य सूचक कीर्तन, माहात्म्य इत्यादी संयोजन आणि ग्रंथाच्या पूर्व निबंधात अधिकतर ज्ञानाचा मार्ग प्रशस्त केला गेला आहे. व्रतपालनकारी आणि वाचक-वाचिका (ह्या पुस्तकाचे वाचन करणारे पुरुष आणि स्त्रिया) तसेच श्रोतृवर्गाद्वारे भगवद्-भक्ती लाभ केल्याने आम्हा सगळयांचे सेवा-कार्य सार्थक होईल. अधिक काय, असावधानीवशतः काही त्रुटी राहील्यास वाचकवर्ग निजगुणाने संशोधन करून घेतील, हाच अनुरोध आहे. अलमतिविस्तरेण—

*पापांकुशा एकादशी*
*२६ पद्मनाभ, ५१८ गौराब्द*
*७ कार्तिक, १४११ बंगाब्द.*
*२४-१०-२००४*

**त्रिदण्डिभिक्षू**
**श्रीभक्तिवेदान्त वामन**

---

भगवान श्रीकृष्ण म्हणाले, "मी द्वादश आदित्यांमध्ये विष्णू नामक आदित्य, प्रकाश देणाऱ्यांमध्ये महाकिरणशाली सूर्य, समग्र वायुगणामध्ये मरीची नामक वायू आणि नक्षत्रांमध्ये चंद्र आहे." *(श्रीगीता १०.२१)*


उडुपी कृष्ण

# श्रीमन्मध्वाचार्यांचे एकादशी संबंधी विचार


श्रीमन्मध्वाचार्य

## *स्मार्त्तमत खंडन*

**श्वदृतो पञ्चगव्यञ्च दशम्या दुषितां त्यजेत्।**
**एकादशीं द्विजश्रेष्ठाः पक्षयोरुभयोरपि॥**

*(कृष्णामृतमहार्णवम् 129)*

श्रेष्ठ ब्राह्मणगण कुत्र्याच्या चामड्याने बनलेल्या पात्रात ठेवलेल्या पंचगव्याच्या त्यागाप्रमाणे दोन्ही पक्ष्यांची दशमी विद्धा एकादशीचा परित्याग करतील.

**अथवा मोहनार्थाय मोहिन्या भगवान् हरिः।**
**अर्थितः कारयामास व्यासरूपी जनार्दनः॥**
**धनदार्चाविवृद्ध्यर्थं महावित्तलयस्य च।**
**असुराणां मोहनार्थं पाषण्डानां विवृद्धये॥**
**आत्मस्वरूपाविज्ञप्त्यै स्वलोकाप्राप्तये तथा।**
**एवं विद्धां परित्यज्य द्वादश्यामुपवासयेत्॥**

*(कृष्णामृतमहार्णवम् 150-152)*

अथवा व्यासरूपी भगवंत जनार्दन श्रीहरींनी (रुक्मांगद राजाची दुसरी पत्नी) मोहिनीच्या द्वारे प्रार्थना केल्या गेल्यावर कामी लोकांना मोहित करण्यासाठी, धनाच्या आकांक्षेद्वारे अर्चनेच्या वृद्धीसाठी, परमार्थाला लुप्त करण्यासाठी, असुरांना मोहित करण्यासाठी, पाखंडी लोकांच्या वृद्धीसाठी, आपल्या आत्मस्वरूपाला लपवून ठेवण्याच्या अभिप्रायाने आणि जेणेकरून विष्णु-लोकाची प्राप्ती होऊ नये म्हणून असे विधान करविले होते. म्हणून अशा प्रकारच्या विद्धा एकादशीचा परित्याग करून द्वादशीला उपवास करायला हवा.

**वरं स्वमातृगमनं वरं गोमांसभक्षणम्।**
**वरं हत्या सुरापानमेकादश्यन्नभक्षणात्॥**

*(कृष्णामृतमहार्णवम् 180)*

एकादशीला अन्न भोजन करणे स्व-मातृगमन, गोमांस-भक्षण, सुरापान (मद्यपान) इत्यादी कार्यांपेक्षाही अधिक निंदनीय आहे.

# एकादशी कथा

**एक दिवस मातार पदे करिया प्रणाम।**
**प्रभु कहे,—माता मोहे देह एक दान॥**
**माता बले,—ताइ दिब, या तुमि मागिबे।**
**प्रभु कहे,—एकादशीते अन्न ना खाइबे॥**
**शची कहे,—ना खाइब, भाल-इ कहिला।**
**सेई हैते एकादशी करिते लागिला॥**

*(चैतन्य चरितामृत आदि-लीला १५/८,९,१०)*

एक दिवस श्रीगौरसुंदरांनी शचीमातेंच्या चरणी प्रणाम करीत म्हणाले—‘आई!आपण मला एक दान प्रदान करावे.’ शचीमाता म्हणाल्या—‘तुम्ही जे मागाल ते मी तुम्हाला प्रदान करीन.’ प्रभू म्हणाले—'आई, आपण एकादशीच्या दिवशी अन्न खाऊ नका.' आई म्हणाल्या—‘तू ठीक बोललास. मी त्या दिवशी अन्न खाणार नाही.’ त्या दिवसा नंतर शचीमाता एकादशीचे पालन करू लागल्या.

आपल्या आईंना निमित्त करून श्री चैतन्य महाप्रभूंनी प्राणीमात्राला (प्रत्येक जिवाला) एकादशी व्रत पालन करण्याचा निर्देश दिला आहे. श्रीहरिभक्तिविलास (१२/८) मध्ये म्हटले आहे —**“एकादशी व्रतं नाम सर्वाभीष्ट-प्रदं नृणां। कर्तव्यं सर्वथा विप्र विष्णु-प्रीति-करं यतः॥”** अर्थात एकादशी व्रत केल्याने श्रीविष्णूंप्रती प्रीती होते म्हणूनच याचे दुसरे नाव ‘हरिवासर’ आहे. अन्य अन्य सकाम व्रत केल्याने त्याचे फळ तर प्राप्त होते परंतु न केल्याने कोणताही अपराध वा पाप देखील होत नाही. एकादशी व्रताचे फळ आहे श्रीकृष्णभक्तीची प्राप्ती. म्हणूनच एकादशी न केल्याने अपराध तर होतोच, सोबतच व्रताचे फळ श्रीकृष्ण भक्तीचा हृदयात आविर्भाव होत नाही.

श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी म्हटले आहे—

**माधव तिथि भक्ति जननी यतने पालन करि।**
**कृष्ण वसति, वसति बलि परम आदर वरि॥**

अर्थात माधव तिथी (एकादशी) भक्तीला जन्म देणारी आहे, या तिथीत श्रीकृष्णांचा साक्षात निवास आहे, असे जाणून मी परम आदरपूर्वक या तिथीचा स्वीकार करून प्रयत्नपूर्वक याचे पालन करतो.

## *एकादशी तिथी जन्माष्टमीपेक्षाही श्रेष्ठ*

"श्रीकृष्णांसाठी एकादशी तिथी जन्माष्टमीपेक्षाही श्रेष्ठ आहे. परम करुणामय परमेश्वर श्रीकृष्ण स्वतः माधव-तिथी अर्थात एकादशीच्या स्वरूपात मूर्तिमंत होऊन या जगात विराजमान आहेत. अनंत-स्वरूपा विष्णुमयी शक्ती समस्त जिवांसाठी सर्व प्रकारचे मंगल विधान करण्याच्या उद्देशाने परम-शुभ एकादशी तिथीच्या रूपात प्रकट झाली आहे." *(श्रील गुरुदेवांच्या प्रवचनातून उद्धृत)*

एकादशी व्रतोपवासाचे वास्तविक उद्देश्य श्री भगवंताच्या प्रती प्रेम-भक्ती प्राप्त करणे हे आहे, यथा-

"शुद्ध भक्तांच्या संगतीत या व्रताचे आचरण केल्याने धर्म-अर्थ-काम-मोक्ष रूपी चतुर्वर्गाच्या प्रती तुच्छ बुद्धी जागृत होऊन श्रीकृष्णांच्या प्रती श्रवण इत्यादी रूपा प्रेमलक्षणा विशुद्ध भक्ती प्राप्त होते." *(स्कंद-पुराण)*

"समस्त प्रकारचे भोग आणि सिद्धी हरिभक्ति-रूपा एकादशी महादेवींच्या मागे सदा दासीप्रमाणे अनुगमन करतात." *(नारद-पंचरात्र)*

"समस्त कामनांना पूर्ण करणारे एकादशी व्रत केवळ श्रीकृष्णांच्या प्रीति साठीच पालन करणे कर्तव्य आहे." *(श्रीहरिभक्तिविलास)*

## *एकादशी पालनकारी कथा*

श्रीमद्भागवतात वर्णन आहे की श्रीकृष्णाचे पिता श्रीनंद महाराज एकादशीच्या दिवशी निराहार राहून व्रत पालन करीत असत—

**एकदश्यां निराहारः समभ्यर्च्य जनार्दनम्।**
**स्नातुं नन्दस्तु कालिन्द्यां द्वादश्यां जलमाविशत्॥**

*(श्रीमद्भागवत १०.२८.१)*

अनुवाद—श्रीशुकदेव म्हणाले—"परीक्षित! एक दिवस नंद महाराजांनी कार्तिक-शुक्ल एकादशीचा उपवास करून भगवान जनार्दनांची पूजा केली. त्याच रात्री द्वादशी तिथीचा स्पर्श झाल्यावर त्यांनी स्नान करण्यासाठी यमुनेच्या पाण्यात प्रवेश केला."

## *एकादशी तत्त्व*

पद्मपुराणात श्रीव्यासदेव-जैमिनी ऋषी संवादात कथा येते—एके वेळी श्रीभगवान पुरूषोत्तम गरुडांवर आरोहण (पक्षीराज श्रीगरुडांच्या पाठीवर बसून) करून यमपुरीत गेले. यमराजांसोबत वार्तालाप करते वेळी त्यांनी आक्रंदन (विलाप, जोरजोराने रडण्याचा) ध्वनी ऐकला

आणि त्यांनी त्याचे कारण विचारले. यमराजांनी उत्तर दिले—"हे देव! पातकी मर्त्य जीव आपल्या पापकर्मांच्या दोषामुळे अत्यंत दुःखदायक नरकयातना भोगत आहेत. हा त्यांचाच मोठ्याने रडण्याचा आवाज आहे." हे ऐकून श्रीकृष्ण त्या जिवांना पाहायला पोहोचले. त्या पाप्यांना असह्य यातनेने पीडित पाहून, त्यांचे हृदय करुणेने पाघळले. ते विचार करू लागले—"ही सर्व माझ्याद्वारेच निर्मित प्रजा आहे. यांनी केलेल्या पापांच्या निवारणासाठी मला काही उपाय करावा लागेल."

असा विचार करून त्यांनी स्वतःच एकादशी तिथीचे रूप धारण केले. त्या समस्त पापी जिवांना एकादशी व्रताचे आचरण करविले. त्या व्रताच्या प्रभावाने ते सर्व पापी पापमुक्त झाले आणि त्यांनी परमधाम वैकुंठाला गमन केले. म्हणून हे वत्स जैमिनी! तुम्ही एकादशी तिथीला श्रीविष्णूंची मूर्तीच समजा. एकादशी समस्त सुकर्मांमध्ये श्रेष्ठ आणि समस्त व्रतांमध्ये उत्तम आहे.

करुणामय भगवंत श्रीकृष्णांनी एकदा विचार केला की मला विसरल्यामुळे जीव दुःख-कष्ट भोगत आहेत. ते पतित आणि असहाय्य आहेत. त्यांना मी आपल्या धामात कसा आणू शकेन? असा विचार करून त्यांनी स्वतःच एकादशी तिथीचे रूप धारण केले. सर्व चिन्मय काळ श्रीकृष्णांच्याच अंतर्गत आहेत. उदाहरणार्थ श्रीमती राधिका श्रीकृष्णांच्या प्रकाश आहेत आणि त्यांच्या वामांगातून (डाव्या अंगातून) प्रकट झाल्या आहेत. श्रीकृष्णाने स्वतःच एकादशी रूप धारण केल्यामुळेच ही तिथी 'माधव तिथी' म्हणविली गेली आणि ती भक्तीला जन्म देणारी आई बनली. एकादशीच्या दिवशी श्रीकृष्ण या धराधामात (पृथ्वीवर) येतात आणि या व्रताचे पालन करणाऱ्यांना विशेष कृपा प्रदान करतात.

काही समय व्यतीत झाल्यावर पाप-पुरुषाने श्रीकृष्णाच्या समीप जाऊन हात जोडून दीनतापूर्वक प्रार्थना केली—"आपल्या द्वारा पाप-विनाशक एकादशीचे सृजन झाल्याने मी क्षीण होत चाललो आहे, कारण या व्रताचे पालन करणाऱ्यांवर माझा प्रभाव पडत नाही. आता मी या जगात कोणाचा आश्रय घेऊन जगू? हे केशव! एकादशी तिथीच्या भयापासून माझे रक्षण करावे."

श्रीभगवान हसत त्या पाप-पुरुषाला म्हणाले—"अहो! तुम्ही दुःखी होऊ नका. त्रिभुवन पवित्र करणाऱ्या एकादशीच्या दिवशी तुम्ही पंचशस्य (गहू, जव, तांदूळ, उडीद-डाळ, राई, तीळ इत्यादी) मध्ये निवास करा. मी तुम्हाला हे स्थान देत आहे. जे लोक

एकादशीच्या दिवशी अन्नाचे भोजन करतात, ते ब्रह्महत्येसारख्या भयंकर पापांचेच भोजन करतात आणि आपल्या पितरांसहित नरकवास भोगतात."

एकादशीच्या दिवशी अन्नाचे दान करू नये किंवा कोणालाही अन्न खाण्याची प्रेरणा सुद्धा देऊ नये. असे केल्यास अशी व्यक्तीदेखील उपरोक्त पापांची भागीदार बनते. एकादशी व्रत नित्य आणि सर्वदा पालनीय आहे. असे नाही की कधी एकादशी व्रत केले आणि कधी सोडून दिले. याच्या नित्यतेचे मुख्य कारण आहे की याच्याद्वारे भगवान श्रीकृष्ण संतुष्ट होतात. श्रीरूप गोस्वामीपादांनी असे नमूद केले आहे की भक्तीच्या चौसष्ट अंगांपैकी 'एकादशी व्रताचे पालन' या अंगाचे पालन करणेदेखील अत्यावश्यक आहे. प्रत्येक महिन्यात कृष्ण आणि शुक्ल पक्षातील अकराव्या दिवसाला एकादशी तिथी येते. याच्या व्यतिरिक्त जवळपास अडीच वर्षाने अधिक मास किंवा पुरूषोत्तम मासात (महिन्यात) देखील दोन एकादश्या येतात.

कधी विशेष योगामुळे महाद्वादशी देखील उपस्थित होते. त्यावेळी एकादशीच्या ऐवजी महाद्वादशीचे व्रत करायला हवे.



***हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे***

***हरे राम हरे राम राम राम हरे हरे***

# अनुकूल ग्रहण—वाचिक आणि मानसिक (एकादशी-कीर्तन)

**शुद्ध भकत, चरण-रेणु,**
**भजन अनुकूल।**
**भकत सेवा, परम सिद्धि,**
**प्रेमलतिकार मूल॥**

शुद्ध भक्तांची चरणधूळच भजनासाठी फारच अनुकूल आहे. वैष्णवांची सेवाच परम-सिद्धी आहे आणि सेवाच प्रेमरूपी वेलीचे मूळ आहे.

**माधव-तिथि, भक्ति जननी,**
**यतने पालन करि।**
**कृष्णवसति, वसति बलि',**
**परम आदरे वरि॥**

माधव-तिथी (एकादशी) भक्तीला सुद्धा जन्म देणारी आहे आणि हिच्यात श्रीकृष्णांचा निवास आहे—असे जाणून परम आदरपूर्वक हिचा स्वीकार करून प्रयत्नपूर्वक पालन करतो.

**गौर आमार, जे सब स्थाने,**
**करल भ्रमण रङ्गे।**
**पासून सब स्थान, हेरिबो आमि,**
**प्रणयि-(भकत-) संगे॥**

माझ्या श्रीगौरसुंदरांनी ज्या ज्या स्थानांचे आनंदपूर्वक भ्रमण केले; मी देखील प्रेमी भक्तांच्या सोबत त्या सर्व स्थानांचे दर्शन करेन.

**मृदंग-वाद्य, सुनिते मन,**
**अवसर सदा याचे।**
**गौर-विहित, कीर्तन सुनि',**
**आनन्दे हृदय नाचे॥**

मृदुंगाचा मधुर ध्वनी ऐकण्यासाठी माझे मन सर्वदा आतूर असते आणि श्रीगौरसुंदरांच्या संबंधित कीर्तनांना ऐकून माझे हृदय आनंदाने भरून जाते आणि नाचू लागते.

**युगलमूर्ति, देखिया मोर,**
**परम आनन्द हय।**
**प्रसाद-सेवा, करिते हय,**
**सकल प्रपञ्च-जय॥**

युगुल मूर्तीचे दर्शन करून मला परम आनंद होतो. महाप्रसादाचे

सेवन केल्याने मायेवर सुद्धा विजय प्राप्त केला जाऊ शकतो.

**जे दिन गृहे, भजन देखि,**
**गृहेते गोलोक भाय।**
**चरण-सीधू देखिया गङ्गा,**
**सुख ना सीमा पाय॥**

ज्या दिवशी घरी भजन-कीर्तन होते, त्या दिवशी घर साक्षात गोलोक होऊन जाते. श्रीभगवंताचे चरणामृत आणि श्रीगंगेचे दर्शन करून तर सुखाला सीमाच उरत नाही.

**तुलसी देखि', जुडाय प्राण,**
**माधवतोषणी जानि'।**
**गौर-प्रिय, शाक-सेवने,**
**जीवन सार्थक मानि॥**

माधवप्रिया तुळशीचे दर्शन करून त्रितापांनी दग्ध झालेले हृदय सुशीतल होऊन जाते. गौरसुंदरांच्या प्रिय पालेभाजीचे आस्वादन करण्यासच मी जीवनाची सार्थकता मानतो.

**भकति विनोद, कृष्ण-भजने,**
**अनुकूल पाय जाहा।**
**प्रतिदिवसे, परम-सुखे,**
**स्वीकार करये ताहा॥**

कृष्ण भजनाच्या अनुकूल जीवन निर्वाहासाठी जे काही प्राप्त होते, भक्तिविनोद प्रतिदिन त्यास सुखपूर्वक ग्रहण करतात.

*(श्रील भक्तिविनोद ठाकूर)*





**श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराज**

# श्रीचैतन्य महाप्रभूंचे एकादशीचे अनुष्ठान

'श्रीचैतन्य भागवत' या ग्रंथाच्या मध्य खंडातील आठव्या अध्यायात श्रील वेदव्यासांचे अवतार—श्रील वृंदावन दास ठाकुरांनी श्रीशचीनंदन गौरहरींच्या एकादशी अनुष्ठानाविषयी माहिती दिली आहे. एकादशीच्या दिवशी सर्व भक्तांनी हे भजन अवश्य गावे व त्यांचा अर्थाचे स्मरण पण करावे.

**श्रीहरिवासरे हरि-कीर्तन विधान।**
**नृत्य आरम्भिला प्रभु जगतेर प्राण॥**

एकादशीच्या दिवशी श्रीगौरसुंदर प्रभूंनी सर्व भक्तांना आदेश देऊन हरिनाम-संकीर्तन आरंभ केले. या जगाचे प्राण-स्वरूप असणारे शचीनंदन गौरहरी आनंदाने फारच मधुर नृत्य करू लागले.

**पुण्यवन्त श्रीवास-अंगने शुभारंभ।**
**उठिल कीर्तन-ध्वनि 'गोपाल गोविन्द'॥**

परम-भक्त श्रीवास पंडित (जे श्रीनारद मुनींचे अवतार आहेत) त्यांचे अंगण हे एक परम पवित्र स्थान आहे. तेथे कीर्तनाचा शुभारंभ झाला आणि चारी दिशांना 'गोपाळ गोविंद' असा मंगल कीर्तन ध्वनी पसरला.

**मृदंग-मंदिरा बाजे शंख-करताल।**
**संकीर्तन संगे सब हइल मिशाल॥**

मृदुंग, झांजा, शंख, टाळ आदी वाद्ये सुमधूर ध्वनी करू लागली. या अद्भुत संकीर्तन रसात सर्व वाद्यांचा ध्वनी एकदम मिसळून गेला.

**ब्रह्माण्ड भेदिले ध्वनि पुरिया आकाश।**
**चौदिकेर अमंगल जाय सब नाश॥**

हा संकीर्तन-ध्वनी ब्रह्मांडाची आठ आवरणे भेदून चिदाकाशातील वैकुंठापर्यंत पोहोचला. त्यामुळे चारी दिशांतील अभद्र व अमंगल विचार व घटनांचा विनाश झाला.

**उषःकाल हइले नृत्य करे विश्वम्भर।**
**यूथ यूथ हइल जत गायन सुन्दर॥**

अगदी पहाटे पासूनच भगवान विश्वंभर नृत्य करू लागले. त्यांच्या सोबत भक्तगण अनेक गट बनवून गायन करू लागले.

**श्रीवास-पंडित लइया एक सम्प्रदाय।**
**मुकुन्द लइया आर जन-कत गाय॥**

एका कीर्तन-गटाचे नायक 'श्रीवास पंडित' होते आणि अन्य एका कीर्तन-गटाचे प्रमुख 'श्रीमुकुंद दत्त' होते.

**लइया गोविन्द घोष आर कत जन।**
**गौरचंद्र-नृत्ये सबे करेन कीर्तन॥**

अनेक भक्त 'श्रीगोविंद घोष' यांच्या आनुगत्यात कीर्तन करित होते. भगवान श्रीगौरचंद्रांच्या नृत्यासोबत सर्व भक्त कीर्तन करित होते.

**धरिया बुलेन नित्यानन्द महाबली।**
**अलक्षिते अद्वैत लयेन पदधुलि॥**

महाबलशाली नित्यानंद प्रभूंनी भगवान गौरसुंदरांना मागून धरून ठेवले होते आणि ते अत्यंत प्रेमाने गौरसुंदरांना कुरवाळत होते. अद्वैत आचार्यांनी लपूनछपून भगवान गौरहरींची चरणधूळ प्राप्त केली.

**गदाधर-आदि जत सजल-नयने।**
**आनन्दे विह्वल हइल प्रभुर कीर्तने॥**

श्रीगदाधर पंडित ज्या भक्तांचे प्रमुख आहेत ते सर्वजण आनंदाने विव्हळ झाले आणि त्या सर्वांचे डोळे अश्रूंनी डबडबून गेले.

**जखन उद्दण्ड नाचे प्रभु विश्वम्भर।**
**पृथिवी कम्पित हय, सबे पाय डर॥**

जेव्हा प्रभू विश्वंभर आवेशात नृत्य करायचे, तेव्हा पृथ्वी कंपित व्हायची आणि सर्वांना भीती वाटायची.

**कखनो वा मधुर नाचये विश्वम्भर।**
**जेन देखि नन्देर नन्दन नटवर॥**

कधी विश्वंभर इतके मधुर नृत्य करायचे की त्यावेळी असे वाटायचे की जणू नंद महाराजांचे लाडके पुत्र श्रीकृष्ण, जे जगातले सर्वश्रेष्ठ नर्तक आहेत, तेच नाचत आहेत.

**अपरूप कृष्णवेश, अपरूप नृत्य।**
**आनन्दे नयन-भरि' देखे सब भृत्य॥**

सर्व भक्तांचे डोळे आनंदाने परिपूर्ण झाले. महाप्रभूंचे सेवक त्यांचे अद्वितीय कृष्ण-प्रेम आणि अतुलनीय सुंदर नृत्य पाहात आहेत.

**निजानन्दे नाचे महाप्रभु विश्वम्भर।**
**चरणेर ताल शुनि अति मनोहर॥**

आपल्या दिव्य आनंदात विश्वंभर महाप्रभू नृत्य करित आहेत.

त्यांच्या चरणांच्या नृत्याचा ताल अतिशय मनमोहक आहे.

**भाव-भरे माला नाहीं रहे गलाय।**
**छिण्डिया पडये गिया भकतेर पाय॥**

त्यांच्या भावावस्थेतील उद्योगांमुळे फुलांची माळ त्यांच्या गळयात टिकूच शकली नाही. ती तुटून भक्तांच्या चरणी पडली.

**चतुर्द्दिके श्रीहरि-मंगल-संकीर्तन।**
**माझे नाचे जगन्नाथ-मिश्रेर नन्दन॥**

श्रीहरिनाम-संकीर्तनाचे हे मंगलमय वातावरण चारी दिशांना पसरले आणि सर्वांच्या मध्ये श्रीजगन्नाथ मिश्रांचे सुपुत्र श्रीगौरसुंदर नृत्य करित होते.

**जाँर नामानन्दे शिव वसन ना जाने।**
**जाँर यशे नाचे शिव, से नाचे आपने।**

ज्यांच्या नामाचा जप करताना अनुभवलेल्या आनंदाने श्रीशंकरांना इतकी आत्म-विस्मृती होते की आपले कमरेचे अधोवसन मृग-चर्म (हरिणाचे कातडे) कधी गळून पडले हे सुद्धा त्यांना समजत नाही. ज्यांच्या यशाचे श्रवण व कीर्तन करून आनंदित झाल्याने सोमशेखर उमापती श्रीशंकर नृत्य करतात, ते महाप्रभू विश्वंभर या पृथ्वीतलावर श्रीनवद्वीप धामात एकादशीच्या दिवशी नृत्य करित आहेत.

**जाँर नामे वाल्मीकि हइला तपोधन।**
**जाँर नामे अजामिल पाइल मोचन॥**

त्यांच्या नावाचा उलटा ('राम' ऐवजी 'मरा' असा) जप करून रत्नाकर नावाचे डाकूसुद्धा रामायणाचे रचनाकार परम-तपस्वी वाल्मीकी ऋषी बनले. त्यांच्याच 'नारायण' नामाचे उच्चारण करून अजामिळ नावाचे पतित वेश्यागामी ब्राह्मण सुद्धा मुक्ती प्राप्त करून वैकुंठाला पोहोचले.

**जाँर नाम श्रवणे संसार-बन्ध घुचे।**
**हेन प्रभु अवतरि' कलियुगे नाचे॥**

फक्त त्यांची पवित्र नावे जशी 'राम-कृष्ण-हरी' कानात शिरली तरी संसार बंधनातून मुक्ती मिळते, तेच भगवान श्रीगौरहरी आता या कलियुगात श्रीनवद्वीप-धामात अवतार घेऊन नृत्य करित आहेत.

**जाँर नाम गाइ', शुक-नारद बेडाय।**
**सहस्र-वदन प्रभु जाँर गुण गाय॥**

त्या प्रभूंच्या 'राधारमण हरि बोल',' गोविन्द जय जय गोपाल जय जय' आदी नावांचे कीर्तन करित शुकदेव गोस्वामी आणि

नारद मुनी सर्वत्र भ्रमण करतात. त्या प्रभूंचे गुणगान आपल्या एक सहस्र तोंडांनी स्वतः अनंतदेव-शेषनाग करतात.

**सर्व-महा-प्रायश्चित्त जे प्रभुर नाम।**
**से प्रभु नाचये, देखे जत भाग्यवान्॥**

ज्या भगवान श्रीकृष्णांच्या अगणित नामांचा जप—जगातील सर्व महापातकांचे अमोघ प्रायश्चित्त आहे, तेच श्रीकृष्ण आज नृत्य करित आहेत आणि ते नृत्य पाहाणारे भक्त परम भाग्यवान आहेत.

**प्रभुर आनन्द देखि' भागवतगण।**
**अन्योन्ये गला धरि' करये क्रन्दन॥**

श्रीचैतन्य महाप्रभूंचा आनंद पाहून भक्तांनी एकमेकांना गाढ आलिंगन केले आणि एकमेकांच्या गळयात पडून सगळे कृष्ण-प्रेमाने रडू लागले.

**सबार अंगेते शोभे श्रीचन्दन-माला।**
**आनन्दे गायेन कृष्ण-रसे हइ' भोला॥**

जे सर्व भक्त कीर्तनात सहभागी झाले आहेत त्या सर्वांच्या अंगांवर चंदनाचे गंध व सुगंधी फुलांच्या माळा शोभा देत आहेत. कृष्ण-भक्ती-रसात मग्न झाल्यामुळे सर्व भक्त स्वतःला सुद्धा विसरून गेले आहेत.

**यतेक वैष्णव-सब कीर्तन-आवेशे।**
**ना जाने आपन देह, अन्य जन किसे॥**

कीर्तनाच्या आवेशात सर्व वैष्णवांना स्वतःच्या देहाचे सुद्धा भान उरले नाही तर इतरांचे भान कसे राहील?

**जय-कृष्ण-मुरारी-मुकुन्द-वनमाली।**
**अहर्निश गाय सबे हइ' कुतूहली॥**

फारच आनंदित होऊन सगळे जण 'जय कृष्ण, मुरारी, मुकुंद, वनमाळी' आदी भगवंताची नावे रात्रंदिवस गात आहेत.

**अहर्निश भक्त संगे नाचे विश्वम्भर।**
**शान्ति नाहि कारो, सबे सत्य-कलेवर॥**

रात्रंदिवस सर्व भक्तांच्या सोबत भगवान विश्वंभर नाचत आहेत परंतु कोणालाही थकवा आला नाही कारण सर्वांची शरीरे सच्चिदानन्दमय आहेत.

**एइ मत नाचे महाप्रभु विश्वम्भर।**
**निशि अवशेष मात्र से एक प्रहर॥**

अशा रितीने महाप्रभू विश्वंभर संपूर्ण रात्रभर नृत्य करतात. फक्त एक प्रहर (सुमारे तीन तास) ते निद्रा घेतात.

**एइ मत आनन्द हय नवद्वीप-पुरे।**
**प्रेमरसे बैकुण्ठेर नायक विहरे॥**

अशा रितीने नवद्वीप धामात दिव्य आनंदाचा अनुभव सर्व भक्त घेत आहेत. आज वैकुंठाचे नायक भगवान श्रीनारायण स्वतः श्रीगौरसुंदर बनून तेथे विहार करित आहेत.

**ए सकल पुण्यकथा जे करे श्रवण।**
**भक्त संगे गौरचन्द्रे रहु ता'र मन॥**

या पुण्य कथेचे जे भक्त श्रवण करतात त्यांच्या हृदयात भगवान गौरचंद्र आपल्या भक्तांसोबत निवास करतात.

**श्रीकृष्ण-चैतन्य-नित्यानन्द-चाँद जान।**
**वृंदावन-धाम तछु पदयुगे गा'न॥**

वृंदावन दास ठाकूर हे गीत आपले आराध्य दैवते—श्रीकृष्ण चैतन्यदेव आणि चंद्रासमान सुशीतल असणाऱ्या श्रीनित्यानंद प्रभूंच्या चरणी अर्पण करतात.

देवतांची अशी प्रार्थना आणि श्रीराधिकेची आपल्या सोबत एकाकार होण्याची प्रार्थना मानून कृपा-सिंधू श्रीहरी प्रसन्न होऊन आपल्या पार्षदांसोबत कलियुगात भक्तरूपाने अवतार घेतील. त्या वेळी आपला श्रीविग्रह गौरवर्णाचा असेल. नाद देखील गंभीर असेल. स्वनामामृतपानाची लालसा प्रतिक्षण प्रकट होत राहील, म्हणून दयाळू श्रीहरी शचीसुत होऊन आपल्या भक्तांसोबत संकीर्तन करित आणि करवित राहातील. नाम-नामीत भेद नसल्यामुळे आपल्याला नाममय मानून आपल्या दोन अक्षरांच्या 'हरि' नामाचा उच्च स्वराने 'हरि बोल' 'हरि बोल' अशा प्रकारे लाज-रहित होऊन पुकारत मदमत्त हत्ती प्रमाणे निज भक्तगणांमध्ये विहार करतील. ज्या वेळी पुराण पुरूषोत्तम भगवान श्रीगोविंद भूमीवर अवतीर्ण होतील, तेव्हा त्यांचे नाम 'श्रीचैतन्यदेव' रूपाने प्रसिद्ध होईल आणि त्यांच्या सोबतच त्यांचे पूर्व पार्षद देखील आपापल्या अंशाने येतील. त्यांचे नावे देखील पूर्वीपेक्षा वेगवेगळीच असतील. ते सर्व प्रायः पुरुषाकार मूर्तीतच प्रकट होतील.

# एकादशी तिथीचा निर्णय

श्रीचैतन्य-चरितामृत मध्यलीलेत श्रीसनातन गोस्वामींना दिलेल्या शिकवणीच्या अंतर्गत श्रीचैतन्य महाप्रभू म्हणतात—

**एकादशी, जन्माष्टमी, वामनद्वादशी।**
**श्रीरामनवमी, आर नृसिंह चतुर्दशी॥**
**एइ सबे विद्धा-त्याग अविद्धा करण।**
**अकरणे दोष, कैले भक्तिर लंभन॥**

*(श्रीचैतन्य चरितामृत मध्यलीला अध्याय २४ श्लोक ३४१-३४२)*

"जगातील सर्व जिवांनी एकादशी, जन्माष्टमी, वामन-द्वादशी, श्रीराम-नवमी तसेच श्रीनृसिंह-चतुर्दशीच्या उपवासाचे न चुकता पालन करावे. हे सनातन! तुम्ही सर्वांना शुद्धा एकादशीचा उपवास करण्याची शिकवण प्रदान करावी. सर्वांना दशमी-विद्धा किंवा पूर्व-विद्धा एकादशीचा (ज्या एकादशी तिथीला अरुणोदय काळात दशमी तिथीचा स्पर्श झाला आहेत) त्याग करायलासुद्धा शिकवावे. ही व्रते न केल्याने जो दोष उत्पन्न होतो, त्याचे पण वर्णन करावे. या विषयी अतिशय जागरूक राहाण्याची आवश्यकता आहे. जर आम्ही ही व्रते करण्याची काळजी घेतली नाही, तर आम्हाला भक्तीच्या अनुष्ठानात हलगर्जीपणा करण्याचा दोष लागेल."

एकादशीच्या दिवशी अरुणोदय काळात अर्थात सूर्योदयाच्या पूर्वी एक तास छत्तीस मिनिटाच्या मध्ये जर दशमीचा किंचित स्पर्श झाला तर ती एकादशी 'विद्धा' म्हणविली जाते. जर एकादशीच्या शेष (उरलेल्या किंवा शेवटच्या) भागात द्वादशी सुरू झाली तर तेव्हा यामध्ये कोणताही दोष नसतो. तीच पालनीय आहे. अधिक माहितीसाठी श्रीहरिभक्तिविलास ग्रंथात बारावा आणि तेरावा अध्याय पाहावा.





# श्रीमती सीतादेवी आणि श्रीनारदमुनी





एकदा श्री नारदमुनी श्रीरामांच्या पत्नी श्रीमती सीतादेवींना भेटायला गेले. श्रीमती सीतादेवींनी त्यांचे स्वागत केले, त्यांना प्रणाम केला आणि खाण्याकरिता काही फळे अर्पण केली. तेव्हा नारद मुनींनी ती फळे खाणे अस्वीकार केले. सीतादेवींनी याचे कारण विचारले असता श्री नारदमुनी म्हणाले की, “हे सीतादेवी! तुम्हाला ब्रह्महत्येचे पातक लागले आहे. काल द्वादशी तिथी होती आणि तुम्ही तुळशी-देवीला प्रणाम करायला गेल्या असताना, चुकून झालेल्या पदराच्या स्पर्शाने तुळशीचे एक पान गळून पडले. द्वादशीला तुळशीचे पान तोडल्याने ब्रह्महत्येचे( ब्राह्मणाची हत्या करण्याचे) पातक लागते.”

तेव्हा सीतादेवी म्हणाल्या, “हे मुनीवर! मी माझ्या पातिव्रत्याच्या बळाने हे पान जोडेन.” तेव्हा त्यांनी प्रार्थना केली, “हे भगवान नारायणा! मी जर स्वप्नात सुद्धा श्रीरामचंद्रांव्यतिरिक्त कोण्या परपुरुषाचे स्मरण केले नसेल तर माझ्या तपस्येच्या बळावर हे पान परत जुळो.” परंतु पान काही जुळले नाही. तेव्हा त्यांनी अचंबित होऊन श्रीनारद मुनींना विचारले की असे का झाले. तेव्हा श्रीनारद मुनी म्हणाले, “हे सीतादेवी! काल जनकपुरीतून (मिथिलेहून) तुझ्या वडिलांनी (राजा जनकांनी) काही आंबे धाडली होती. त्यातील काही आंबे तुम्ही श्रीरामचंद्रांना अर्पण न करताच खाल्लीत. अजाणताच पतीच्या सेवेत झालेल्या चुकीमुळे म्हणून तुमच्या पातिव्रत्याचे बळ क्षीण झाले आहे, म्हणून पान जुळत नाही आहे.” सीतादेवींनी विचारले, "आता मी काय करू?” श्रीनारद मुनी उत्तरले, "तुम्ही श्रीरामचंद्रांच्या चरणी पडून त्यांच्यांकडे क्षमेची याचना करा." सीतादेवींनी तसे करताच ते तुळशीचे गळून पडलेले पान आपोआप जुळले आणि मग श्री नारद मुनींनी श्रीमती सीतादेवींनी अर्पण केलेल्या फळांचा प्रसाद सहर्ष स्वीकार केला.

तात्पर्य हे की (१) द्वादशीला तुळशीचे पान तोडू नये आणि (२) भगवंतांना अर्पण केल्याशिवाय फळे किंवा कोणत्याही खाद्य वस्तू खाऊ नयेत.

# एकादशीला अन्न-ग्रहण न करण्याचे वैज्ञानिक कारण

गुरूदेव नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रील भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांनी हवाई, अमेरिकेत १३ मे २००० ला दिलेल्या प्रवचनात 'एकादशीला उपवास का करावा?' या प्रश्नाचे एक अद्भुत उत्तर वैज्ञानिक दृष्टिकोणातून प्रस्तुत केले.

प्रत्येक महिन्यात शुक्ल आणि कृष्ण पक्षांत एकादशीपासून पौर्णिमा आणि एकादशीपासून अमावस्येपर्यंत समुद्रात जबरदस्त भरती येते. लाटा खूपच उंचउंच उठतात. याचे कारण आहे की या पाच दिवसांत चंद्र पृथ्वीच्या काही निकट येतो आणि पाण्याला आकर्षित करतो. चंद्र आपल्या गुरुत्वाकर्षण बळाने (Gravitational Pull) पाण्याला आपल्याकडे ओढतो. मनुष्य शरीरात जवळपास ९० टक्के तरल द्रव्ये असतात. शरीरातील पाण्यावर सुद्धा या दिवसांत चंद्राचा प्रभाव पडतो. एकादशीच्या दिवशी शिजवलेली अन्नधान्ये ग्रहण केल्याने ती पोटात जाऊन या पाण्यास शोषून ठेवते आणि चंद्राद्वारे सुद्धा शरीरातील पाणी खेचल्या गेल्यामुळे रोग होण्याची संभावना असते. मनुष्य शरीर एक मशीनसारखे (यंत्रासारखे) आहे. आम्ही दिवसातून तीन वेळा भोजन करतो ज्यामुळे या मशीनला आराम मिळत नाही. म्हणून एकादशीच्या दिवशी भोजन न केल्याने शरीराला आराम मिळतो. तसेच श्रीनाम-भजनासाठी अधिक वेळ उरतो आणि भक्तीसुद्धा पुष्ट होऊन वृद्धिंगत होते.



# एकादशी व्रत वेळापत्रक

## *(उत्तर भारतीय पंचांगानुसार)*

| | | |
|---|---|---|
| वैशाख | कृष्ण | वरूथिनी |
| वैशाख | शुक्ल | मोहिनी |
| ज्येष्ठ | कृष्ण | अपरा |
| ज्येष्ठ | शुक्ल | निर्जला |
| आषाढ | कृष्ण | योगिनी |
| आषाढ | शुक्ल | शयनी |
| श्रावण | कृष्ण | कामिका |
| श्रावण | शुक्ल | पवित्रारोपणी |
| भाद्रपद | कृष्ण | अन्नदा |
| भाद्रपद | शुक्ल | पार्श्व (परिवर्तिनी, वामन) |
| आश्विन | कृष्ण | इंदिरा |
| आश्विन | शुक्ल | पापांकुशा |
| कार्तिक | कृष्ण | रमा |
| कार्तिक | शुक्ल | उत्थान (प्रबोधिनी) |
| अग्रहायण (मार्गशीर्ष) | कृष्ण | उत्पन्ना |
| अग्रहायण (मार्गशीर्ष) | शुक्ल | मोक्षदा |
| पौष | कृष्ण | सफला |
| पौष | शुक्ल | पुत्रदा |
| माघ | कृष्ण | षट्तिला |
| माघ | शुक्ल | भैमी |
| फाल्गुन | कृष्ण | विजया |
| फाल्गुन | शुक्ल | आमलकी |
| चैत्र | कृष्ण | पापमोचनी |
| चैत्र | शुक्ल | कामदा |
| पुरुषोत्तम मास | कृष्ण | कमला |
| पुरुषोत्तम मास | शुक्ल | कामदा |

## *महाद्वादशी*

**उन्मीलनी व्यञ्जुली च त्रिस्पृशा पक्षवर्द्धिनी।**
**जया च विजया चैव जयन्ती पापनाशिनी ॥**
**द्वादश्योऽष्टौ महापुण्याः सर्व्वपापहरा द्विज।**
**तिथियोगेन जायन्ते चतस्रश्चापरास्तथा।**
**नक्षत्रयोगाच्च बलात् पापं प्रशमयन्ति ताः॥**

*(हरि भक्ति विलास १३/२६५–२६६)*

ब्रह्मवैवर्त पुराणातील श्रीसूत–शौनक–संवादात लिहिले आहे—“हे द्विज–(१) उन्मीलनी, (२) व्यंजुली, (३) त्रिस्पृशा, (४) पक्षवर्द्धिनी, (५) जया, (६) विजया, (७) जयंती आणि (८) पापनाशिनी,–या अष्ट ‘महाद्वादश्या’ परमपवित्र आणि समस्त पापांचे हरण करणाऱ्या आहेत. त्यांच्यात प्रथम चार योग अर्थात एकादशी द्वादशीच्या विशेष योगामुळे, आणि अन्य चार विशेष नक्षत्र योग उपस्थित झाल्यावर उत्पन्न होतात.”

अशा प्रकारे आम्ही पाहतो की एकीकडे एकादशी व्रताचे पालन भगवान श्रीहरींना प्रिय आहे आणि ती त्यांच्या भक्तीला जन्म देणारी आहे. दुसरीकडे एकादशीच्या दिवशी समस्त प्रकारचे भयंकर पाप अन्नाचा आश्रय घेऊन तेथेच मुक्काम करतात. या दिवशी अन्न ग्रहण करणे पाप ग्रहण करण्यासारखेच आहे.



**श्रील गौरकिशोर दास बाबाजी महाराज**



**श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर प्रभुपाद**

# श्रीएकादशी

## *(श्रीगौरपार्षद श्रील जगदानंद पंडिताद्वारे विरचित—श्रीश्रीप्रेमविवर्त्त अध्याय १८)*

एकादशीला महाप्रसादाचा सन्मान करावा पण तो सेवन करू नये. हा आदर्श श्रीचैतन्य महाप्रभूंनी भक्तांसमोर मांडला. याचे अप्रतिम वर्णन 'श्रीप्रेमविवर्त्त' या ग्रंथात श्रीचैतन्य महाप्रभूंचे नित्य-परिकर श्रील जगदानंद पंडितांनी केले आहे. 'श्रीप्रेमविवर्त्त' ग्रंथाचा प्रचार स्वतः श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी केला होता.

**एकदिन गौरहरि, श्रीगुण्डिचा परिहरि',**
**'जगन्नाथवल्लभे' बसिला।**
**शुद्धा एकादशी-दिने, कृष्णनाम सङ्कीर्त्तने,**
**दिवस रजनी काटाइला॥**

एके दिवशी गौरहरी (श्रीचैतन्य महाप्रभू) गुंडिचा मंदिरातून बाहेर पडले आणि ते श्रीजगन्नाथ-वल्लभ-वाटिकेत (श्रीजगन्नाथ स्वामींच्या प्रिय लीला-उद्यानात) येऊन बसले. ती शुद्धा-एकादशी होती आणि महाप्रभूंनी आपली संपूर्ण रात्र भगवान श्रीकृष्णांच्या नाम-संकीर्तनात व्यतीत केली.

**संगे स्वरूपदामोदर, रामानन्द, वक्रेश्वर,**
**आर जत क्षेत्रवासिगण।**
**प्रभु बले,—"एकमने, कृष्णनाम-संकीर्त्तने,**
**निद्राहार करिये वर्जन॥**

स्वरूप दामोदर, राय रामानंद, वक्रेश्वर पंडित आणि श्रीजगन्नाथ-पुरीत राहाणारे अनेक भक्त त्यांच्या सोबत होते. श्रीचैतन्य महाप्रभू म्हणाले, "आज एकादशी आहे. म्हणून सर्वांनी मन लावून आज श्रीकृष्ण-नामाचे उच्चारण करावे. आज निद्रा आणि आहाराचा त्याग करावा.

**केह कर संख्यानाम, केह दण्ड परणाम,**
**केह बल रामकृष्णकथा।"**
**यथा तथा पड़ि' सबे, 'गोविन्द' 'गोविन्द' रवे,**
**महाप्रेमे प्रमत्त सर्व्वथा॥**

"तुमच्यातील काहींनी 'हरे कृष्ण' महामंत्राचा जप करावा. काही भक्तांनी भगवंतांना दंडवत प्रणाम करावा. तुमच्यातील काही भक्तांनी श्रीकृष्ण आणि श्रीबलरामांचे गुणगान करावे."

श्रीचैतन्य महाप्रभूंची वाणी ऐकून सर्वजणांनी जेथे होते तेथूनच

आदराने आपले मस्तक झुकवून जोराने 'गोविन्द, गोविन्द' असा ध्वनी केला आणि ते सर्वजण तीव्र दिव्य प्रेमाने मत्त झाले.

**हेन काले गोपीनाथ, पड़िछा सार्व्वभौमसाथ,**
**गुण्डिचा-प्रसाद लइया आइल।**
**अन्नव्यञ्जन, पिठा, पाना, परमान्न, दधि, छाना,**
**महाप्रभु-अग्रेते धरिल॥**

त्याचवेळी गोपीनाथ आचार्य, तुलसी पडिछा आणि सार्वभौम भट्टाचार्य श्रीगुंडिचा मंदिरातून भगवान जगन्नाथांचा महाप्रसाद घेऊन आले. त्यांनी भात, थालीपीठ, भाज्या, सरबत, खीर, दही, पनीर आदी महाप्रसाद श्रीचैतन्य महाप्रभूंसमोर ठेवला.

**प्रभुर आज्ञाय सबे, दण्डवत् पड़ि' तबे,**
**महाप्रसाद वन्दिया वन्दिया।**
**त्रियामा रजनी सबे, महाप्रेम मग्नभावे,**
**अकैतवे नामे काटाइया॥**

श्रीचैतन्य महाप्रभूंच्या आज्ञेने सर्वांनी श्रीजगन्नाथ महाप्रसादाला दंडवत प्रणाम अर्पण केला आणि त्याची स्तव-स्तुती केली. त्यानंतर त्या सर्वांनी संपूर्ण रात्र उत्कटतेने भगवान श्रीकृष्णांच्या नाम-जपात व्यतीत केली.

**प्रभु-आज्ञा शिरे धरि', प्रातःस्नान सबे करि',**
**महाप्रसाद सेवाय पारण।**
**करि' हृष्ट चित्त सबे, प्रभुर चरणे तबे,**
**करजोड़े करे निवेदन॥**

श्रीचैतन्य महाप्रभूंची आज्ञा शिरोधार्य मानून सर्वांनी सकाळी अंघोळ केली. त्यानंतर त्यांनी महाप्रसाद आदरपूर्वक सेवन करून आपल्या एकादशी व्रताचे पारणे केले. अत्यंत आनंदी चित्ताने आणि हात जोडून त्यांनी श्रीचैतन्य महाप्रभूंच्या चरणी एक गोष्ट निवेदन केली.

## *श्रीपुरुषोत्तम-क्षेत्रात एकादशी व्रताचे पालन*

**"सर्व्वव्रत-शिरोमणि, श्रीहरिवासरे जानि,**
**निराहारे करि जागरण।**
**जगन्नाथ-प्रसादान्न, क्षेत्रे सर्व्वकाले मान्य,**
**पाइलेइ करिये भक्षण॥**

"सर्व व्रतांचे शिरोमणी असणाऱ्या एकादशीच्या दिवशी निराहार राहून संपूर्ण रात्रभर जागरण करायला हवे. पण आम्हाला हेसुद्धा माहिती आहे की श्रीजगन्नाथांच्या महाप्रसादाचा नेहेमी सन्मान

करायला हवा आणि तो प्राप्त होताच त्याचे भक्षण करायला हवे.

**ए संकटे क्षेत्रवासे, मने हय बड त्रासे,**
**स्पष्ट आज्ञा करिये प्रार्थना।**
**सर्ववेद आज्ञा तव, जाहा माने ब्रह्मा शिव,**
**ताहा दिया घुचाओ यातना॥**

"आम्ही श्रीक्षेत्र जगन्नाथ-पुरी धामात निवास करतो आहे. परंतु या तात्त्विक कचाटीच्या (मानसिक द्वंद्वाच्या) अवस्थेला खूपच घाबरतो. म्हणून कृपया आपण स्पष्ट आदेश प्रदान करावा. सर्व वेद म्हणजे तर आपलेच उपदेश आहेत. ब्रह्मदेव आणि शंकर त्यांचे पालन करतात. आम्ही लोकांनी यापैकी कोणती आज्ञा पालन करावी? या विषयी वेदांची काय आज्ञा आहे? याचे स्पष्टीकरण करून या दुविधामय संकटातून आमचा उद्धार करावा."

## *श्रीचैतन्य महाप्रभूंचा या विषयावरील निर्णायक विचार*

**प्रभु बले,—'भक्ति-अङ्ग, एकादशी-मान-भङ्ग,**
**सर्व्वनाश उपस्थित हय।**
**प्रसाद-पूजन करि', परदिने पाइले तरि,**
**तिथि परदिने नाहि रय॥**

श्रीचैतन्य महाप्रभू उत्तरले, "एकादशीच्या दिवशी उपवास न केल्याने त्या व्यक्तीचा सर्वनाश होतो. एकादशीच्या दिवशी तुम्हाला जर महाप्रसाद मिळाला तर त्या महाप्रसादाची फक्त पूजा करावी, परंतु त्याचे सेवन करू नये. दुसऱ्या दिवशी मोठ्या आनंदाने तो महाप्रसाद तुम्ही सेवन करू शकता. अशा रितीने तुमचे या धर्मसंकटातून रक्षण होईल, कारण दुसऱ्या दिवशी एकादशी तिथीचा काळ समाप्त होतो आणि द्वादशी तिथी आरंभ होते. तेव्हा महाप्रसाद घेण्यात काहीच वावगे नाही आहे.

**श्रीहरिवासर-दिने, कृष्णनामरसपाने,**
**तृप्त हय वैष्णव सुजन।**
**अन्य रस नाहि लय, अन्य कथा नाहि कय,**
**सर्वभोग करये वर्ज्जन॥**

"एकादशीच्या दिवशी शुद्ध भक्त फक्त 'श्रीकृष्ण-नामाचा रस' पान करून तृप्त होतात. ते इतर कोणताही रस स्वीकार करित नाहीत आणि इतर विषयावर चर्चासुद्धा करित नाहीत. ते सर्व भोगांचा परित्याग करतात.

**प्रसाद भोजन नित्य, शुद्ध वैष्णवेर कृत्य,**
**अप्रसाद ना करे भक्षण।**

**शुद्धा एकादशी जबे, निराहार थाके तबे,**
**पारणेते प्रसाद भोजन॥**

"फक्त प्रसाद सेवन करणे—हे एका शुद्ध वैष्णवाचे दैनंदिन कार्य आहे. ते प्रसाद सोडून इतर कोणताही पदार्थ खात नाहीत. परंतु शुद्धा एकादशीच्या दिवशी ते पुर्ण उपवास करून दुसऱ्या दिवशी व्रताचे पारणे करण्यासाठी प्रसाद सेवन करतात.

**अनुकल्पस्थानमात्र, निरन्न प्रसादपात्र,**
**वैष्णवके जानिह निश्चित।**
**अवैष्णव जन जा'रा प्रसाद–छलेते ता'रा,**
**भोगे हय दिवानिशि रत।**
**पापपुरुषेर सङ्गे, अन्नाहार कर रङ्गे,**
**नाहि माने हरिवासर–व्रत॥**

भक्तांनी हे निश्चितपणे जाणावे की फक्त अनुकल्पच (अन्नधान्ये, कडधान्ये आदी नसलेले पदार्थच) एकादशीला स्वीकारण्याजोगा आहे. अभक्त–मंडळी 'प्रसादा'च्या नावाखाली रात्रंदिवस इंद्रिय–तृप्तीतच मग्न असते. एकादशीच्या दिवशी सर्व अन्नधान्ये व कडधान्ये यांच्यात पाप–पुरुषाचा निवास असतो. तरीही अतिशय मजेत ते अभक्त एकादशीच्या दिवशी अन्नाचे सेवन करतात आणि एकादशीच्या व्रताचा सन्मान करित नाहीत.

**भक्ति–अङ्ग सदाचार, भक्तिर सम्मान कर,**
**भक्ति–देवी–कृपा–लाभ हबे।**
**अवैष्णवसङ्ग छाड, एकादशीव्रत धर,**
**नामव्रते एकादशी तबे॥**

"सर्वांनी श्रद्धापूर्वक भक्तीच्या अंगांचा सन्मान करावा व चांगल्या पद्धतीने त्यांचे पालन करावे. अशा सदाचाराद्वारेच त्यांना श्रीमती भक्ती–देवीच्या कृपेची प्राप्ती होईल. म्हणून अभक्तांच्या संगतीचा त्याग करून एकादशीच्या व्रताचे पालन करा, तसेच त्या दिवशी हरिनाम–संकीर्तनाच्या व्रतात सुद्धा पूर्णपणे मग्न राहा. मग तुमचे एकादशीचे पालन शंभर टक्के सफल होईल.

**प्रसादसेवन आर श्रीहरिवासरे।**
**विरोध न करे कभु बुझह अन्तरे॥**

"आपल्या हृदयाला याची खात्री पटवा की 'आदरपूर्वक महाप्रसाद सेवन करणे' व 'भगवान श्रीहरींच्या दिवसाचे पालन करणे म्हणजे विश्वासपूर्वक एकादशीचे पालन करणे'—ही दोन्ही भक्तीचीच अंगे आहेत. त्यामुळे त्यांच्यात कधीही विरोध किंवा संघर्ष

होण्याची संभावना नाही आहे.

**एक अङ्ग माने, आर अन्य अङ्गे द्वेष।**
**जे करे निर्ब्बोध सेइ, जानह विशेष॥**

"जे लोक भक्तीच्या एका अंगाचे पालन करतात परंतु दुसऱ्या अंगाचा अनादर व द्वेष करतात, ते सर्वजण नितांत मूर्ख आहेत. हे निश्चितपणे समजा.

**जे अङ्गेर जे देशकालविधिव्रत।**
**ताहाते एकान्तभावे हओ भक्तिरत॥**

"भक्तीच्या प्रत्येक अंगाचे पालन एकाग्र चित्ताने करावे. तसेच त्या अंगासाठी उपयुक्त अशा देश, काळ, नियम आणि विधीचा विचार करूनच त्या अंगाचे पालन करायला हवे.

**सर्वे अङ्गेर अधिपति ब्रजेन्द्रनन्दन।**
**जाहे तेँह तुष्ट ताहा करह पालन॥**

"व्रजेंद्रनंदन (श्रीनंद महाराजांचे सुपुत्र) श्यामसुंदर श्रीकृष्णच सर्व भक्तीच्या अंगांचे भोक्ता आणि अधिपती आहेत. म्हणून भक्तीची जी अंगे श्रीकृष्णांना आनंद प्रदान करतात, त्यांचे पालन करणे—हे सर्वांचे कर्तव्य आहे.

**एकादशी-दिने निद्राहार-विसर्ज्जन।**
**अन्य दिने प्रसाद निर्माल्य सुसेवन॥"**

"एकादशीच्या दिवशी निद्रेचा आणि जेवणाचा त्याग करावा. एकादशीच्या दुसऱ्या दिवशी पोटभर प्रसादाचे सेवन करावे व भगवंतांचे निर्माल्य (प्रसादी माला), चरणामृत आदी स्वीकार करावे."

**शुनिया वैष्णव सब, आनन्दे गोविन्दरव,**
**दण्डवत् पडिलेन तबे।**
**स्वरूपादि रामानन्द, पाईलेन महानन्द,**
**'उड़िया', 'गौड़िया' भक्ते सबे॥**

श्रीचैतन्य महाप्रभूंचा हा उपदेश ऐकून सर्व भक्तमंडळीने आनंदाने 'गोविन्द' नामाचे उच्चारण केले आणि त्या सर्वांनी श्रीचैतन्य महाप्रभूंना दंडवत प्रणामसुद्धा केला. स्वरूप दामोदर, राय रामानंद आणि सर्व उत्कल (ओरीसा) आणि गौड (बंगाल) या राज्यांतील भक्तांना महानंद (परमानंद) अनुभवण्यास मिळाला.

**ओहे भाई!**
**गौरांग आमार प्राणधन।**
**अकैतवे भज ताँ'रे, जाबे तबे भवपारे,**

**शीतल हईबे तनुमन॥**

या दिव्य काव्यात्मक प्रबंधाचे रचनाकार श्री जगदानंद पंडित म्हणतात, “हे भाऊ! श्रीगौरांग महाप्रभू माझे जीवन व समृद्धी म्हणजे ‘प्राणधन’ आहेत. त्यांची निष्कपट भावनेने व इमानदारीने सेवा करावी. मग तुम्ही हा भौतिक जगाचा अथांग दुःखमय महासागर लीलया पार करून जाल. तसेच तुमच्या शरीर व मनाला सुशीतलता व प्रसन्नतेची प्राप्ती होईल.

## *श्रीनाम भजन आणि एकादशी–व्रत—हे दोन्ही एकच*

**श्रीनामभजन आर एकादशी व्रत।**
**एकतत्त्व नित्य जानि’ हओ ताहे रत॥**

“श्रीहरिनामाची सेवा आणि एकादशी व्रत—हे दोन्ही एकच तत्त्व आहेत—असे जाणून या दोन्ही भक्तीच्या अंगांचे काळजीपूर्वक अनुशीलन करा.”



# श्रीएकादशी व्रत-भक्तीचे नववे अंग

श्रीभक्ति-रसामृत-सिन्धु-बिन्दू या ग्रंथात भक्तीच्या चौसष्ट अंगांचे वर्णन केले गेले आहे. श्रीएकादशी व्रत भक्तीचे नववे अंग आहे. शुद्धा एकादशीचे नाव हरिवासर आहे. विद्धा एकादशीचा त्याग करायला हवा. महाद्वादशी उपस्थित झाल्यास एकादशी सोडून महाद्वादशीचे पालन केले पाहिजे. उपवासाच्या आदल्या दिवशी ब्रह्मचर्य, हरिवासराच्या दिवशी निरंबू (निर्जला, अगदी पाणीसुद्धा न पिता) उपवास आणि रात्रीच्या जागरणासोबत निरंतर भजन आणि उपवासाच्या दुसऱ्या दिवशी ब्रह्मचर्य आणि उचित वेळेवर पारणे करणेच हरिवासराचा (हरिदिनाचा) सन्मान करणे आहे. महाप्रसाद त्याग केल्याशिवाय निरंबू (जलरहित) उपवास होत नाही. सामर्थ्यहीन अथवा शक्तिहीन अवस्थेत प्रतिनिधी किंवा अनुकल्पाची व्यवस्था आहे-'नक्तं हविष्यान्नं' (हरिभक्तिविलास १२/९७ धृत वायुपुराण) वचनांद्वारे अनुकल्पाचा विधी आहे. प्रतिनिधीच्या द्वारे उपवासाचा विधी हरिभक्तिविलास १२/८२ मध्ये दिला गेला आहे.

**उपवासे त्वशक्तस्य आहिताग्नेरथापि वा।**
**पुत्रान् वा कारयेदन्यान् ब्राह्मणान् वापि कारयेत्॥**

अर्थात साग्निक ब्राह्मण यज्ञ प्रभुतीमध्ये दीक्षित होऊन उपवास करण्यास असमर्थ असल्यास पुत्रांद्वारे अथवा ब्राह्मणांद्वारे उपवास करवतील.

हविष्यान्न इत्यादी द्वारा उपवासाचा विधी हरिभक्तिविलास १२/९७ धृत वायुपुराणात आहे—"**नक्तं हविष्यान्नमनोदनं वा, फलन्तिलाः क्षीरमथाम्बु चाज्यम्। यत् पञ्चगव्यं यदि वापि वायुः, प्रशस्तमत्रोत्तरमुत्तरञ्च॥**" अर्थात रात्री हविष्यान्न, अन्न सोडून इतर द्रव्ये, फळे, दूध, पाणी, तूप, पंचगव्य, अथवा वायू—या सर्व वस्तू क्रमशः एकापेक्षा दुसऱ्या अधिक श्रेष्ठ आहेत. महाभारत उद्योग पर्वानुसार पाणी, मूळे, फळे, दूध, तूप, ब्राह्मण कामना (ब्राह्मणांची इच्छा), गुरुवचन (गुरुदेवांचा आदेश) आणि औषधे—या आठांद्वारे व्रत नष्ट होत नाही—"**अष्टैतान्य-व्रतघ्नानि आपो मूलं फलं पयः, हविर्ब्राह्मणकाम्य च गुरोर्वचनमौषधम्॥**"

हरिवासर शब्दाद्वारे असे समजायला हवे की एकादशी तथा जन्माष्टमी, रामनवमी, नृसिंह-चतुर्दशी, गौर-पौर्णिमा इत्यादी वैष्णव व्रतांचे सुद्धा पालन करायला हवे. चारी वर्ण आणि चारी आश्रमातील स्त्री-पुरूष, सर्वांसाठी एकादशी पालनाचे विधान हरिभक्तिविलासात दिले गेले आहे. स्त्रियांमध्ये विधवा आणि सधवा

(जिचा पती जिवंत आहे) सर्वांसाठी एकादशी पालनीय आहे. एकादशीच्या दिवशी अन्न भोजन केल्याने गोमांस (गायीचे मास) भोजन केल्याचे पाप लागते आहे. प्रत्येक महिन्याच्या दोन्ही पक्षातील एकादशींचे विधिवत पालन करायला हवे.

**सपुत्रश्च सभार्यश्च स्वजनैर्भक्तिसंयुतः।**
**एकादश्यामुपवसेत् पक्षयोरुभयोरपि॥**

*(हरिभक्तिविलास १२/४७)*

येथे 'स्वभार्या' शब्दाद्वारे प्रत्येक गृहस्थाला आपल्या पत्नीसोबत व्रताचे पालन करण्याचा निर्देश दिला गेला आहे. याद्वारे सधवा स्त्रियांना सुद्धा एकादशी व्रत पालन करण्याचे विधान दिले गेले आहे. एकादशी व्रत नित्य व्रत आहे, याचे पालन न केल्यास दोष लागतो. परंतु इतर कामना-मूलक उपवासच सधवा स्त्रियांसाठी निषिद्ध आहेत, एकादशी नाही.

**अत्र व्रतस्थ नित्यत्वादवश्यं तत् समाचरेत्।**
**सर्व्वपापापहं सर्व्वार्थदं श्रीकृष्णतोषणम्॥**

*(हरिभक्तिविलास १२/४)*

एकादशी व द्वादशी तिथीमध्ये व्रताच्या नित्यतेमुळे ते अवश्यच पालनीय आहेत. त्याचे अनुष्ठान केल्याने यावतीय पापध्वंस, सर्वार्थ प्राप्ती आणि श्रीकृष्णांचे प्रीती विधान होते, म्हणजे श्रीकृष्ण प्रसन्न होतात.

**श्रीश्रीचैतन्य-शिक्षामृत** ग्रंथात श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी लिहिले आहे—"भगवत्-सेवेच्या पूर्वी पाणी ग्रहण करणे, भगवंतांना अनिवेदित द्रव्य ग्रहण करणे, श्रीमूर्ती आणि त्यांच्या सेवा इत्यादीचे नित्य दर्शन न करणे, आपली प्रिय वस्तू आणि कालोचित स्वादिष्ट फळे इत्यादी द्रव्ये भगवंतांना अर्पण न करणे, हरिवासर एकादशी किंवा भगवंतांचा जन्म-दिवस इत्यादींचे पालन न करणे—ही सगळी कार्ये निष्ठा अभावाच्या अंतर्गत आहेत."

जे क्षर (जात) आणि अक्षर (जीव) या दोघांपेक्षाही श्रेष्ठ आहेत, ते पुरूषोत्तम म्हणविले जातात. त्या समस्त कारणांचे देखील मूळ कारण पर-तत्त्वाचे नामच श्रीचैतन्यदेव आहे. काळाच्या प्रभावाने आपल्या भक्तियोगाला विनष्टप्राय पाहून जे "कृष्णचैतन्य" नामक पुरुष पुन्हा त्याचा प्रचार करण्यासाठी आविर्भूत झाले आहे, त्यांच्या श्रीचरणकमळी माझा चित्तरूपी भ्रमर(भुंगा) निमज्जित होवो.

# श्रीअंबरीष महाराजांची कथा

श्रीमद्भागवतातीलच नवव्या स्कंधात शुद्धभक्त श्रीअंबरीष महाराजांनी दृढतापूर्वक एकादशीचे निराहार व्रत पालन आणि वेळेवर पारणे केल्याची कथा वर्णन केलेली आहे—"एकादशी व्रत करण्याच्या प्रभावाने कधीही प्रतिहत न होणारा (टाळला न जाऊ शकणारा) ब्रह्मशाप (ब्राह्मणांचा शाप) महाराज अंबरीषांना स्पर्श देखील करू शकला नाही.

महाराज अंबरीष मोठे भाग्यवान होते. ते भगवंताचे मोठे प्रेमी आणि उदार धर्मात्मा होते. पृथ्वीचे सार्वभौम सम्राट असूनही त्यांची आपली संपत्ती ऐश्वर्य इत्यादी मध्ये आसक्ती नव्हती. त्यांची रती श्रीकृष्ण आणि त्यांच्या प्रेमी भक्तांमध्येच होती

त्यांनी आपल्या मनाला श्रीकृष्णांच्या चरणारविंद युगुलात (दोन कमळाच्या फूलांसारख्या चरणांत), वाणीला भगवंताच्या गुण कीर्तनात, हातांना श्रीहरिमंदिर-मार्जन (स्वच्छ करण्याच्या) सेवेत आणि कानांना भगवंत अच्युत आणि त्यांच्या भक्तांच्या मंगलकारी कथा श्रवणात नियुक्त करून ठेवले होते.

एकदा कार्तिक महिन्यात अंबरीष महाराज आपल्या पत्नीसोबत मथुरा प्रदेशातील मधुवन नामक स्थानावर आले आणि त्यांनी एक वर्षापर्यंत द्वादशी-प्रधान एकादशी व्रत करण्याचा नियम ग्रहण केला. व्रताच्या समाप्ती नंतर पुढच्या कार्तिक महिन्यात त्यांनी तीन रात्री (एकादशीच्या पूर्वीपासून आणि एकादशी पर्यंत) उपवास केला. यमुनेत स्नान करून भगवान श्रीकृष्णाचे विराट पूजन करून भरपूर दूध देणाऱ्या गायींचे दान केले, वैष्णवांना स्वादिष्ट भगवद्-प्रसाद दक्षिणेसोबत अर्पण केला. आता ते स्वतः व्रताचे पारणे करण्यासाठी प्रस्तुत झाले.

त्याच वेळी अत्यंत क्रोधी स्वभावाचे दुर्वासा ऋषी तेथे आले. अंबरीष महाराजांनी त्यांचे स्वागत केले. दुर्वासांना आपल्या तपस्येचे बळ, ब्राह्मणत्व आणि श्रेष्ठतेचा मोठा अभिमान होता. महाराजांनी दुर्वासांच्या चरणी प्रणाम करून भोजनाची प्रार्थना केली. दुर्वासांनी निमंत्रण स्वीकार केले आणि स्नान वगैरे करण्यासाठी यमुना तटावर गेले. यमुनेत परब्रह्माचे ध्यान करीत ते निमग्न झाले. इकडे द्वादशी केवळ अर्धा मुहूर्तच (चोवीस मिनिटे) उरली होती. उपवासाचे पारणे करण्यासाठी अतिशय अल्प समय होता. धर्मज्ञ अंबरीष महाराजांनी चिंतित होऊन ब्राह्मणांना म्हटले, "अतिथी ब्राह्मणांना भोजन न करविता स्वतः खाऊन घेणे चुकीचे आहे आणि द्वादशी

असताना पारणे न केल्याने भक्तीची हानी होते. म्हणूनच मी केवळ भगवंताचे चरणामृताने पारणे करून घेतो.” श्रुतींमध्ये म्हटले आहे की पाणी पिल्याने पारणे होऊन जाते, आणि हे ‘भोजन करणे व न करणे’—या दोन्हीही सारखेच आहे. असा निश्चय करून अंबरीष महाराजांनी भगवंतांच्या चरणोदकाने (चरणामृताने किंवा चरणतीर्थाने) पारणे केले आणि दुर्वासा ऋषी येण्याची प्रतीक्षा करू लागले.

दुर्वासा जेव्हा वापस परतले तेव्हा त्यांनी ध्यान योगाने जाणले की राजाने पारणे केलेले आहे. ते अत्यंत क्रोधित झाले आणि म्हणू लागले—“हे ढोंगी राजा! भगवंत स्वतः ब्राह्मणांचा आदर करतात परंतु तुम्ही माझा अनादर केला आहे. तुम्ही विचार केला की पाणी प्यायल्याने हानी होणार नाही, परंतु ‘ब्राह्मणाची अवज्ञा होईल’—यावरती विचारच केला नाही. मी तुम्हाला याबद्दल दंड देतो. असे म्हणत ते क्रोधाने जळू लागले. त्यांनी आपली एक जटा उखडली आणि अंबरीष महाराजांना मारण्यासाठी कृत्या नामक राक्षसी उत्पन्न केली. ती प्रलयकालीन अग्नीच्या समान जळत हातात तलवार घेऊन अंबरीष महाराजांवर चालती झाली. अंबरीष महाराजांनी आपल्या स्थानावरून हटण्याचा किंवा स्वतःला वाचविण्याचा काहीच प्रयास केला नाही, ते शांतीपूर्वक हात जोडून तेथेच उभे राहिले. शरणागत-वत्सल श्रीभगवंतांनी आपल्या भक्ताच्या रक्षणासाठी आधीपासूनच सुदर्शन चक्र नियुक्त करून ठेवले आहे. चक्राने कृत्येला जाळून भस्म केले.

कृत्येला जाळल्यानंतर सुदर्शन चक्र दुर्वासांकडे अग्रेसर झाले. ते आपला प्राण वाचविण्यासाठी पळू लागले. ते आपल्या पाठीमागे चक्राचा ताप आणि स्पर्श अनुभव करीत होते. परंतु ते त्यांना जाळत नव्हते.

दुर्वासांनी पाहिले—“माझा सारा प्रयास विफल झाला आहे. उलट हे चक्र माझ्याच मागे लागले आहे. त्यापासून वाचण्यासाठी ते सुमेरू पर्वताच्या गुहेकडे पळाले. ते समस्त दिशा, अतल, वितल इत्यादी लोक, लोकपालांद्वारे सुरक्षित लोक आणि स्वर्गापर्यंत गेले. परंतु ते जेथे जेथे गेले तेथे तेथे असह्य तेज असलेल्या चक्राला त्यांच्या मागे लागलेले त्यांनी पाहिले. काहीही उपाय न पाहून ते ब्रह्मदेवांच्या जवळ रक्षणासाठी गेले परंतु ब्रह्मदेव म्हणाले—“या चक्राला मी वापस पाठवू शकत नाही. तेवढे माझे सामर्थ्य नाही आहे.”

ब्रह्मदेवांकडून निराश होऊन दुर्वासा शंकरांना शरण गेले, त्यांनी देखील आपली असमर्थता व्यक्त केली आणि म्हणाले—"ज्यांचे हे चक्र आहे त्यांनाच तुम्ही शरण जावे, तेच तुमचे रक्षण करतील." येथूनही निराश होऊन दुर्वासा भगवंताचे परमधाम वैकुंठात गेले. जाताच थरथर कापत श्रीभगवंतांच्या चरणी जाऊन पडले आणि म्हणू लागले—"हे अच्युत! हे अनंत! हे ब्रह्मण्यदेव! हे प्रभो, माझे रक्षण करा. आपण आपल्या चक्र पासून मला वाचवा, माझे रक्षण करा."

श्रीभगवान म्हणाले—"हे ब्राह्मण! तुम्ही मला ब्रह्मण्यदेव (ब्राह्मणांची व वैष्णवांची पूज्य देवता) म्हणत आहात, परंतु मी तुमचे रक्षण करण्यास असमर्थ आहे. 'अहं भक्तपराधीनो'—मी आपल्या भक्तांच्या पराधीन आहे, भक्त माझ्यावर प्रेम करतात आणि मी त्यांच्यावर. मला थोडीसुद्धा स्वतंत्रता नाही आहे. मी तुमचे रक्षण करण्यास समर्थ नाही आहे."

दुर्वासा—"हे ब्रह्मण्यदेव! मी उच्च श्रेणीचा ब्राह्मण आहे. आपण माझे उपेक्षा का करीत आहात? आपणच तर ब्राह्मणांचे रक्षक आहात."

श्रीभगवान—"तुम्ही माझ्या भक्ताला जाळून मारायची इच्छा केली आणि मी तुमचे रक्षण करू? मी आपल्या भक्तांच्या शत्रूचे रक्षण कशा प्रकारे करू? माझ्या भक्तांनी माझ्या साठी आपले स्त्री, पुत्र, धनसंपत्ती सर्व काही सोडून दिले आहे. हे ब्राह्मण! तुम्ही माझ्यासाठी काय सोडले? तुम्ही अंबरीष महाराजांचा वध करण्यासाठी कृत्येला सोडले आणि आता चक्र पासून रक्षणासाठी विश्वाची परिक्रमा करत आहात? ब्रह्मदेव, शंकर आदींकडे जात आहात."

दुर्वासा—"आपल्या भक्ताच्या प्रती जर माझा अपराध झाला असेल तर, तो आपल्या चरणांप्रतीच अपराध आहे. तर आपणच मला क्षमा करा."

श्रीभगवान—"काटा जर पायात गेला तर काय तो डोक्यातून निघेल? जावे आणि अंबरीष महाराजांकडे जाऊन क्षमा याचना करावी."

दुर्वासा—"आपण अंबरीष महाराजांचा दोष पाहत नाही आहात, माझाच दोष पाहात आहात. त्यांनी मला निमंत्रण देऊन स्वतः भोजन केले. माझ्या आधी खाऊन त्यांनी माझा अपमान केला आहे."

श्रीभगवान रागावून म्हणाले—"अंबरीष महाराजांनी मला प्रसन्न करण्यासाठीच एकादशीचे व्रत इत्यादी केले. केवळ चरणामृताचे सेवन केल्याने त्याची खाण्यात गणना केली जाऊ शकत नाही."

दुर्वासा—"अधिक महत्त्वपूर्ण काय आहे—एकादशीचे व्रताचे वेळेवर पारणे करणे की ब्राह्मणांना यथायोग्य सन्मान देणे?"

भगवान चिडून म्हणाले—"जावे! अंबरीष महाराजांनाच जाऊन विचारावे. तुम्ही मूर्ख आणि धर्मशास्त्राच्या तत्त्वाबद्दल अनभिज्ञ (अपरिचित) आहात. तेच तुम्हाला धर्माची शिकवण देतील. माझ्यापाशी तुमच्या निरर्थक प्रश्नांसाठी वेळ नाही आहे. श्रुती म्हणतात—अर्थात माझेच वचन आहे की—'पाणी प्यायल्याने भोजन करणे आणि न करणे दोन्हीही होते'. या नियमानुसार अंबरीष महाराजांनी ब्राह्मण व द्वादशी दोघांचाही सन्मान केला आहे. परंतु तुम्ही हे सगळे जाणत नाही आणि क्रुद्ध झाले आहात. त्यांच्याच जवळ जावे, तेच तुम्हाला क्षमा करतील, मी करू शकत नाही."

भगवंताचा आदेश ऐकून सुदर्शन चक्राच्या ज्वाळांनी तप्त झालेले दुर्वासा वापस परतून अंबरीष महाराजांच्या जवळ आले. त्यांच्या चरणी पडून म्हणू लागले—"हे महाराज, या चक्राच्या असह्य उष्णतेपासून माझे रक्षण करावे."

अंबरीष महाराज सुदर्शन चक्राची स्तुती करू लागले, त्या वेळी त्यांचे हृदय दयेमुळे अत्यंत पीडित होत होते. अंबरीष महाराजांची अनेकविध स्तव-स्तुती प्रार्थना ऐकून दुर्वासांना चारी बाजूंनी संतप्त करणारे चक्र शांत झाले. चक्राच्या उष्णतेपासून मुक्त होऊन दुर्वासांचे चित्त स्वस्थ झाले आणि ते अनेक आशीर्वाद देत अंबरीष महाराजांची प्रशंसा करू लागले.

जेव्हापासून सुदर्शन चक्राद्वारे भयभीत होऊन दुर्वासा पळाले होते तेव्हापासून ते वापस येईपर्यंत एक वर्षाचा समय व्यतीत झाला होता. इतके दिवस अंबरीष महाराजांनी त्यांच्या दर्शनाच्या आशेने केवळ पाणी पिऊनच काढले. आता अंबरीष महाराजांनी दुर्वासांना विधिपूर्वक भोजन करविले आणि तृप्त केले. दुर्वासा ऋषी गेल्यानंतर महाराजांनी त्यांच्या उच्छिष्टाचे (जेवल्यानंतर ताटात उरलेल्या अन्न-प्रसादाच्या भागाचे) भोजन केले. दुर्वासांचे कष्टात पडणे आणि नंतर आपल्या द्वारा त्यांच्या कष्टाचे दूर होणे त्यांनी भगवंतांच्या कृपेचेच एक रूप जाणले.

दुर्वासा ऋषींनी गंभीरतापूर्वक विचार केला की "जरी मी ब्रह्मवादी श्रेष्ठ ब्राह्मण आहे परंतु सुदर्शन चक्राने समस्त ब्रह्मांडात

मला पळविले. स्वतःला वाचवू शकलो नव्हतो आणि कोणी शरण सुद्धा देऊ शकले नाही. हे अवश्यच एकादशी व्रताच्या शक्तीने झाले असावे."

याच एकादशी व्रताच्या अद्भुत माहात्म्याचा प्रचार करण्यासाठी दुर्वासा ऋषी तपोलोकात निघून गेले.



## श्रीदुर्वासा मुनी

जो कौतुकी कृष्ण प्रणयिजनांना रससमूहाचा आस्वादन करीत कोण्या एका असीम मधुर रसाचा उपभोग करण्याच्या अभिलाषेने आपल्या अंगकांतीला लपवून श्रीराधेच्या अंगकांतीला ग्रहण करून चैतन्यरूपात प्रकट झाले आहेत, ते आम्हावर विशेषरूपाने कृपा करोत.

# श्रीरुक्मांगद महाराजांची कथा

पुराणांत श्रीरुक्मांगद महाराजांचे वर्णन मिळते. रुक्मांगद महाराज सार्वभौम राजा होते. ते भगवद्-भक्ति-परायण आणि एकादशी व्रत पालनात विशेष मनोयोगी (व्यासंगी आणि मन लावून प्रयत्न करणारे) होते. ते स्वतः तर व्रत करीतच असत, समस्त प्रजेला देखील राजाज्ञेने एकादशी व्रत करवित असत. महाराजांच्या या आदेशामुळे सर्व राज्यवासी एकादशी व्रत पालन करून वैकुंठाला जाऊ लागले आणि यम-लोक रिकामा झाला. यमराज आणि पाप-पुण्याचा हिशेब ठेवणारे त्यांचे सहाय्यक चित्रगुप्त यांनी देवर्षी नारदांसोबत सत्यलोकात जाऊन ब्रह्मदेवांच्या निकट हा वृत्तांत ऐकविला. ब्रह्मदेवांनी यमराजांची व्यथा ऐकून काही वेळ विचार ऐकून एक परम-सुंदरी स्त्री निर्माण केली. तिला 'मोहिनी' हे नाम प्रदान करीत रुक्मांगद महाराजांना आपल्या रूप-सौंदर्याद्वारे मोहित करण्याचा त्यांनी तिला आदेश दिला.

मोहिनीने रुक्मांगद महाराजांच्या राज्याच्या निकट गमन केले आणि अपूर्व रूप सौंदर्य पसरवित अत्यंत मधुर स्वरात ती गाऊ लागली. रुक्मांगद महाराज त्यावेळी प्रजेच्या रक्षणाच्या उद्देशाने घोड्यावर चढून भ्रमण करीत होते. तेथे अद्भुत संगीताचा ध्वनी त्याच्या कानी पडला. त्या ध्वनीद्वारे आकृष्ट होऊन पशुपक्षी सुद्धा त्याच दिशेकडे पळत होते. महाराज सुद्धा उत्कंठेने तेथे पोहोचले. त्यांनी गौर-वर्णाच्या परम सुंदरी नारीला म्हणजे 'मोहिनी'ला तेथे पाहिले. तिच्या रूप आणि संगीताद्वारे मुग्ध होऊन त्यांनी मोहिनीसमोर विवाहाचा प्रस्ताव ठेवला.

मोहिनी म्हणाली—"मी ब्रह्मदेवांची कन्या आहे, आपली यश व कीर्ती श्रवण करून आपल्याला पतिरूपात प्राप्त करण्यासाठी संगीताद्वारे शंकरांची उपासना करत होती. आपल्याशी विवाह करण्यासाठी माझी अट आहे की आपण मी सांगितलेली प्रत्येक गोष्ट मानाल."

महाराजांनी मोहिनीच्या हातावर हात ठेवून शपथ घेतली—"मोहिनी तू जी अभिलाषा करशील मी त्यास पूर्ण करेन." मोहिनीच्या सोबत महाराज आपल्या राजधानीत परतले.

आपले पुत्र धर्मांगद यांना राज्य देऊन ते मोहिनीच्या सोबत राहू लागले. काही वर्षे व्यतीत झाल्यावर सुख विलासात मग्न राहूनसुद्धा त्यांनी एकादशी व्रत पालनाची अवहेलना केली नाही. आता त्यांच्या हृदयात कार्तिक व्रत पालनाची इच्छा झाली आणि त्यांनी

मोहिनीकडून यासाठी परवानगी मागितली. त्याच वेळी महाराजांना आपले पुत्र धर्मांगदांद्वारे केलेली घोषणा ऐकू आली—"उद्या एकादशी तिथी आहे. सर्व प्रजाजन याचे पालन करतील." हे श्रवण करून रुक्मांगद महाराज मोहिनीला म्हटले—"मोहिनी तुझ्या इच्छेनुसार मी ज्येष्ठ राणी संध्यावलीला कार्तिक व्रत पालनासाठी नियुक्त केले आहे, परंतु एकादशी व्रत मी स्वतः करीन. तूसुद्धा संयमपूर्वक माझ्या सोबत हे व्रत पालन करावे."

मोहिनीने त्यांना स्मरण करवित म्हणाली—"आपण माझ्या सर्व इच्छा पूर्ण करण्याची शपथ घेतली होती".

महाराज म्हणाले—"अवश्य पूर्ण करीन, तू सांग."

मोहिनी उत्तरली—"माझे इच्छा आहे की आपण एकादशी व्रत करू नये आणि माझ्यासोबत भोजन करावे."

महाराज म्हणाले—"मोहिनी! माझे व्रत तोडू नकोस. मी तुझी अन्य कोणतीही इच्छा पूर्ण करेन. एकादशी व्रत पालन करण्याच प्रचार मी स्वतः केला आहे, मी स्वतःच हे व्रत कसे तोडू? हे कदापि शक्य नाही."

महाराजांचे उत्तर ऐकून मोहिनी अत्यंत क्रोधित झाली आणि त्यांचा उपहास करीत म्हणाली—"जर तुम्ही एकादशीचे व्रत भंग केले नाही तर तुमची प्रतिज्ञा भंग होईल आणि तुम्हाला नरकवास मिळेल आणि मी सुद्धा तुम्हाला सोडून चालली जाईल."

त्याच वेळी राजपुत्र धर्मांगद तेथे आले आणि त्यांनी समस्त वृत्तांत मोहिनीकडून श्रवण केला. त्यांनी वडिलांना विमाता (सावत्र आई) मोहिनीची इच्छा पूर्ण करण्याची विनंती केली.

रुक्मांगद महाराज उत्तेजित होऊन म्हणाले—"मोहिनी राहो किंवा निघून जावो; ती जगो किंवा मरो. मी एकादशीच्या व्रताला विराम देणार नाही."

राजपुत्र धर्मांगद आपली जन्मदात्री आई—संध्यावलीला घेऊन आले आणि तिला सावत्र आई—मोहिनीला समजावयास सांगितले. अत्यंत अनुनय-विनय केल्यावर सुद्धा मोहिनी आपल्या गोष्टीवर अडून राहिली. ती म्हणाली—"महाराज जर एकादशीला भोजन करणार नाहीत तर त्याच्या बदल्यात त्यांनी आपल्या प्रिय पुत्राचा शिरच्छेद करून त्याचे मस्तक मला प्रदान करावे." हे ऐकताच महाराणी संध्यावली कापू लागल्या. थोडे सावरल्यावर महाराणी संध्यावली महाराजांना म्हणाल्या—"हे महाराज! धर्माच्या हानीपेक्षा पुत्राचा प्राण गमावणेच कल्याणप्रद आहे. पुत्रावर मातेचा अत्यधिक

स्नेह असतो परंतु आपली प्रतिज्ञा भंग झाल्यावर धर्माच्या हानीची भीती असल्यामुळे मी मुलाप्रती असलेल्या ममतेला तिलांजली देते आहे, आपणसुद्धा स्नेह–ममतेचा परित्याग करून पुत्राचे बलिदान द्यावे." त्याच वेळी राजपुत्र धर्मांगदांनी एक धारदार तलवार राजाच्या हातात सोपविली आणि म्हटले—"बाबा! आपण विलंब करू नका आणि आपल्या प्रतिज्ञेच्या रक्षणार्थ माझा वध करा." मोहिनी पुन्हा म्हणाली—"एकादशीला भोजन करावे, अन्यथा पुत्राचा वध करावा."

रुक्मांगद महाराजांनी हातात तलवार ग्रहण केली. राजपुत्र धर्मांगदसुद्धा बळी जाण्यासाठी प्रस्तुत झाले. पृथ्वी कंपायमान होऊ लागली, समुद्राला भरती आली. त्या वेळी भगवान श्रीहरी तेथे प्रकट झाले. त्यांनी महाराजांच्या हातातून तलवार घेऊन टाकली आणि म्हणाले—"हे राजा! मी तुमच्या व्रत पालनातील दृढता पाहून अतिप्रसन्न झालो आहे. तुम्ही पत्नी आणि पुत्रासहित माझ्या सोबत वैकुंठ धामाला गमन करा." श्रीहरींनी रुक्मांगद महाराजांना स्पर्श केला आणि ते अदृश्य झाले.



**ॐ विष्णुपाद १०८ श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त वामन गोस्वामी महाराज**
**ॐ विष्णुपाद १०८ श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज**

# अपरा एकादशी

या ज्येष्ठ कृष्ण-पक्षीय 'अपरा' नामक एकादशीच्या व्रताची कथा ब्रह्मांड पुराणात युधिष्ठिर-श्रीकृष्ण संवादात वर्णिली आहे.

या ग्रंथात अशा प्रकारचे वर्णन आढळते की एकदा युधिष्ठिर महाराजांनी भगवान श्रीकृष्णांना विचारले—"हे जनार्दन! ज्येष्ठ कृष्ण-पक्षीय एकादशीचे नाव काय आहे आणि या व्रताचा महिमा काय आहे—आपण कृपा करून मला सांगावे."

युधिष्ठिर महाराजांच्या प्रश्नाच्या उत्तरात भगवान श्रीकृष्ण म्हणाले —"युधिष्ठिर महाराज! लोकांच्या कल्याणासाठी आपण फारच छान प्रश्न विचारला आहे. खरोखर ही एकादशी फारच पुण्यदायक आणि मोठमोठ्या पापांच्या ढीगांना भस्मसात करणारी आहे. ही एकादशी असीम फळ प्रदान करणारी आहे. म्हणून या एकादशीचे नाव 'अपरा' आहे.

देवपुराधिपति महाभागवत रुक्मांगद महाराजांनी आपल्या राज्यात एक सुंदर पुष्पोद्यान (फुलाचा बगीचा) तयार केले होते. हे उद्यान इतके मनोरम होते की लोकांसाठी हे एक प्रेक्षणीय स्थळ बनले. त्या उद्यानात येणारे लोक तेथे येऊन तेथे विकसित झालेली फुले तोडून घेऊन जात असत. परिणामस्वरूप रुक्मांगद महाराजांना एक सुद्धा फूल मिळणे कठीण झाले. फुलांच्या अभावात ते उद्यान उजाड झाले. उद्यानाची अशी दुर्दशा पाहून महाराज फारच उदास झाला. महाराजांनी चौकीदारांची संख्या वाढविली. लोकांनी फुले तोडणे बंद केले. तरीही फुलांची चोरी होतच राहिली, काही ठोस परिणाम निघाला नाही. याच्या व्यतिरिक्त इतर अनेक उपाय महाराजांनी केले, परंतु कोणताही प्रभाव पडला नाही. कारण फुलांची चोरी करणारे मनुष्य तर नव्हतेच की ते पकडल्या जातील. ते तर होते—स्वर्गातील देवी-देवता आणि अप्सरा. म्हणून ते पकडल्या जाऊ शकत नव्हते.

शेवटी रुक्मांगद महाराजांनी आपल्या कुलपुरोहितांकडे या समस्येचे समाधान करण्यासाठी काही करण्याची प्रार्थना केली.

कुलपुरोहितांनी यावर तोडगा सुचवीत म्हटले—"सायंकाळी उद्यानातील सर्व झाडांच्या आसपास, भगवान विष्णूंचे चरणामृत किंवा भगवंतांच्या विग्रहाच्या गळयातून उतरविलेल्या प्रसादी माळेतील फुले अथवा भगवंतांच्या चरणांवर अर्पण केलेली फुले पसरवून दिली तर संभव आहे की चोर पकडल्या जाऊ शकतील."

रुक्मांगद महाराजांनी तसेच केले.

रात्र होताच स्वर्गातील देवी–देवतांनी आणि अप्सरांनी रोज प्रमाणे त्या उद्यानात अवरोहण केले (म्हणजे ते आकाशातून जमिनीवर उतरले). त्यांच्यातील एका अप्सरेचा पाय झाडा–झुडपांच्या आजूबाजूला पसरवून ठेवलेल्या भगवंताच्या चरणी अर्पण केलेल्या फुलांवर पडला. त्यामुळे तिचे सारे पुण्य त्याच क्षणी समाप्त झाले. तिची स्वर्गात वापस परतण्याची सारी शक्ती सुद्धा संपली. अन्य देवी–देवतागण पहिले तर तिला पाहातच राहिले, परंतु तिला सोबत घेऊन जाण्याचा काहीही उपाय न पाहून हताश होऊन तिला त्याच असहाय्य अवस्थेत सोडून ते सर्वजण वापस स्वर्गात निघून गेले. ती बिचारी एकटीच राहिली, कारण पुण्य समाप्त झाल्यामुळे ती उड्डाण करू शकली नाही आणि स्वर्गाला वापस जाऊ शकली नाही. आपल्या सोबत्यांपासून अलग झाल्यावर आणि या मृत्यूलोकात (पृथ्वीवर) व्याप्त वृद्धावस्था, रोगराई इत्यादी दुःखांच्या संबंधी विचार करून ती—"हाय, मला आता या मृत्यूलोकात राहावे लागेल"—असे म्हणत दुःखी होऊन रडू लागली.

पहाट होताच उद्यानातील चौकीदारांनी व माळयांनी तिला पाहिले. ते तिचे दिव्य तेज व अद्वितीय रूप पाहून आश्चर्यचकित झाले. त्यांनी राजमहालात जाऊन महाराजांना खबर दिली. रुक्मांगद महाराज तेथे आले व त्यांनी सुद्धा त्या अप्सरेला पाहिले. तिचे अलौकिक रूप पाहाताच ते तिच्या प्रती दुर्गा, लक्ष्मी, सरस्वती इत्यादी देवींची कल्पना करून बसले आणि याच भावनेने महाराजांनी तिला नमस्कार केला.

अप्सरेला रडताना पाहून महाराजांना खूपच दया आली. महाराजांनी विचारले—"देवी! आपण का रडत आहात? आपल्याला काय त्रास आहे?"

त्या अप्सरेने सारा वृत्तांत सविस्तर सांगितला आणि म्हणाली —"मी स्वर्गात वापस जाऊ इच्छिते कारण मनुष्य–लोकात म्हातारपण फार लवकर येते. शरीर रोगग्रस्त होऊन जाते. विषय भोग सुद्धा इच्छेनुसार भोगले जात नाहीत. महाराज! जर आपल्या प्रजेतलीच कोणीतरी स्त्री अथवा पुरूष मला आपल्या एका एकादशीचे फळ दान देईल तर मी स्वर्गात वापस जाऊ शकेन. एका एकादशीच्या फळाद्वारे मी एक कल्प–काळापर्यंत (चार अब्ज, बत्तीस कोटी मानुष किंवा सौर वर्षे) स्वर्गाचे दिव्य सुख भोगू शकेन."

रुक्मांगद महाराज रुक्मांगद एकादशीच्या बाबतीत थोडी सुद्धा माहिती नव्हती. त्यांनी आपल्या राजगुरूंना या संबंधी विचारले तेव्हा त्यांनीसुद्धा अनभिज्ञता (अजाणतेपणा, अज्ञान) प्रकट केली आणि म्हणाले—"या एकादशी व्रताच्या संबंधी मी आजच ऐकत आहे." जेव्हा कुलगुरूंनाच माहिती नाही तेव्हा भली प्रजेला कशी माहिती असेल? महाराजांनी आपल्या नगरात ढोल वाजवून जाहीर घोषणा केली की जो नागरिक एका एकादशीच्या व्रताचे फळ देईल त्याला बक्षीस दिले जाईल. जेव्हा तीनचार दिवसांपर्यंत कोणीही नागरिक पुढे आला नाही, बक्षिसाची राशी वाढवत-वाढवत अर्ध्या राज्यापर्यंत केली; परंतु अनुकूल परिणाम प्राप्त झाला नाही. तेव्हा अप्सरेने मनातल्या मनात यमराजांचे गणक (हिशेबनीस, जिवांच्या पापांचा आणि पुण्यांचा हिशेब ठेवणारे) 'चित्रगुप्त' यांचे स्मरण केले. चित्रगुप्तांच्या प्रेरणेने अप्सरेला माहिती झाले की रुक्मांगद महाराजांच्या राज्यात एक शेटजी आहे ज्यांच्या पत्नीने एकदा असहाय्यतेमुळे अजाणताच एकादशीचे व्रत केले होते.

शेटजींचा पत्ता व परिचय सांगत अप्सरेने राजाला त्या शेटजींच्या बाबतीत सांगितले— "एके दिवशी त्या शेटजींची पत्नी (शेटाणी) फिरत-फिरत आपल्या घराच्या जवळच एकांतात बनविलेल्या गोदामात तेथे ठेवलेले सामान पाहायला गेल्या. शेटजींच्या नोकरांना माहिती नव्हते की शेटाणी आतमध्ये गोदामात आहेत. ते तर शेटजींच्या बोलाविण्याने गोदामाच्या दरवाज्याला कुलूप लावून निघून गेले.

नोकर तर निघून गेले परंतु शेटाणी गोदामातच अडकल्या. त्यांनी खूपच दरवाजा ठोठावला परंतु एकांतात कोणीच तो आवाज ऐकला नाही. त्रासलेल्या शेटाणी काय करू शकत होत्या? रात्री त्या तेथेच झोपल्या, हा विचार करून की सकाळी कोणीतरी गोदाम उघडेल, परंतु शेटाणींचे भाग्य असे की दुसऱ्या दिवशी दुकानाला सुट्टी होती. म्हणून गोदामाकडे कोणी फिरकलेच नाही. तहान आणि भुकेने शेटाणी व्याकूळ झाल्या. इकडे शेटजी आणि त्यांच्या घरातील लोक—सर्वच जण त्रासले. त्या सर्वांनी मिळून खूप शोध घेतला तरीसुद्धा शेटाणींचा थांगपत्ता लागला नाही. लागेल तरी कसा? त्या तेथे नव्हत्याच. गोदामाकडे कोणाचेच लक्ष गेले नाही, कारण शेटाणी तेथे कधीच जात नसत. त्या दिवशी तर त्या कुतूहलाने गोदामाकडे गेल्या होत्या.

सुट्टीच्या पुढच्या दिवशी जेव्हा शेटजींच्या नोकरांनी काही

सामानासाठी गोदामाचा दरवाजा उघडला तर आतमध्ये बेशुद्ध अवस्थेत पडलेल्या शेटाणींना त्यांनी पाहिले. ही बातमी लगेचच जाऊन त्यांनी शेटजींना दिली. शेटजी जवळच्या वैद्याला सोबत घेऊन आले. तोंडावर पाण्याचे शिंतोडे मारून (पाणी शिंपडून) आणि हात-पायांची मालीश करून त्यांना शुद्धीवर आणण्यात आले. त्यांच्यासाठी भोजनाची व्यवस्था केली गेली. हळूहळू शेटाणींना बरे वाटू लागले. योगायोग असा की ज्या दिवशी शेटाणी गोदाम पाहायला गेल्या होत्या, ती दशमी तिथी होती व त्याचा पुढचा दिवस एकादशी होता. अशा प्रकारे त्या शेटाणींद्वारे अजाणताच परम पवित्र एकादशीचे व्रत संपन्न झाले होते."

अप्सरेकडून पूर्ण कथा ऐकून रुक्मांगद महाराजांनी आपले मंत्री व सैनिकांना त्या शेटजींना व त्यांच्या पत्नीला सन्मानाने घेऊन येण्यास सांगितले. शेटजी व शेटाणींनी आल्यावर महाराजांना व त्या अप्सरेला प्रणाम केला आणि म्हणाले—"आपल्या मंत्र्यांना आम्ही सगळी गोष्ट सांगितली आहे, आता आपण आज्ञा करा की आम्ही काय करावे?"

अप्सरा शेटाणींना म्हणाली—"आपण कृपा करून आपल्या या व्रताचे फळ मला संकल्प उच्चारण करून प्रदान कराल तर मी या व्रताच्या पुण्याच्या प्रतापाने स्वर्गात वापस जाऊ शकेल."

तेव्हा महाराजांनी आपल्या राजगुरूंच्या द्वारे शेटाणीकडून संकल्प करवून स्वर्गाच्या त्या देवीला ते पुण्य प्रदान करविले. तेव्हा ती देवी रुक्मांगद महाराज व शेटजी-शेटाणींना धन्यवाद देत आणि सर्वांप्रती आभार प्रकट करीत स्वर्गाला निघून गेली. महाराजांनी आपल्या घोषणेनुसार शेटाणींना आपले अर्धे राज्य दिले. रुक्मांगद महाराजांना ही घटना प्रत्यक्ष पाहून पूर्ण विश्वास झाला की एकादशीचे माहात्म्य खूपच श्रेष्ठ आहे. तिची अत्यंत महिमा आहे. एक दिवस महाराजांनी हा विचार केला की इतक्या पुण्यदायिनी आणि कल्याणकारी एकादशीचे व्रत माझ्या राज्यातील प्रत्येक नागरिकाला अवश्यच करायला हवे. म्हणून त्याने त्याला नियमित रूपाने लागू केले.

महाराज म्हणाले—

**अष्टवर्षाधिको मर्त्यो ह्यशीतिर् नैव पूर्यते।**<br>
**यो भुङ्क्ते मामके राष्ट्रे विष्णोरहनि पापकृत्॥**<br>
**स मे वध्यश्च निर्वास्यो देशतः कालतश्च मे।**<br>
**एतस्मात् कारणाद् विप्र एकादश्यामुपोषणम्।**

**कुर्यान्नरो वा नारी वा पक्षयोरुभयोरपि॥**

*(नारदीय पुराण)*

अर्थात "जिचे वय आठ वर्षापेक्षा अधिक किंवा ऐंशी वर्षापेक्षा कमी आहे, अशी कोणी व्यक्ती जर माझ्या राज्यात एकादशीच्या दिवशी अन्न-भोजन करेल तर मी तिला मृत्युदंड देईन किंवा मी तिला आपल्या राज्यातून काढून टाकेन. कारण स्त्री असो किंवा पुरूष, सर्वांनाच शुक्ल आणि कृष्ण पक्षातील दोन्ही एकादशी तिथींना उपवास जरूर करावा लागेल. हा नियम माझे पुत्र, पिता-माता, पत्नी, मित्र, नातेवाईक कुणीसुद्धा असो, सर्वांकरिता लागू होईल. तसे न केल्यास सर्वांना दंड देईन."

अशा प्रकारची घोषणा महाराजांनी आपल्या संपूर्ण राज्यात दवंडी पिटवून करून टाकली. महाराजांच्या या आदेशाला मानत त्याच्या राज्यातले सर्व लोक एकादशी व्रत पालन करीत वैकुंठाला जाऊ लागले.

ब्रह्म पुराणात लिहले आहे—"ही एकादशी अत्यंत पुण्य देणारी आहे. महापापांचा विनाश करणारी आहे. अनंत फळ देणारी आहे. ब्रह्म-हत्या, गोहत्या, भ्रूणहत्या (गर्भातील शिशूची हत्या), परस्त्रीगमन, खोटे बोलणे, खोटी साक्ष देणे, कोणाची खोटी प्रशंसा करणे, वजन करताना कमी तोलणे, वेद शिकण्याच्या व शिकविण्याच्या नावावर दुसऱ्यांना ठकविणे व काल्पनिक ग्रंथ लिहणे इत्यादी अत्यंत मोठमोठी पापे या व्रताद्वारे समाप्त होतात.

ठक (फसवून लुबाडणारी व्यक्ती), खोटारडे-ज्योतिषी व भोंदू वैद्यकीय चिकित्सकसुद्धा खोट्या साक्षीदारांप्रमाणेच पापी आहेत, परंतु हे व्रत या सर्व दोषांना समाप्त करून टाकते. जर क्षत्रिय आपल्या क्षत्रिय धर्मास त्यागून युद्धापासून पळून जातो अथवा कोणी शिष्य आपल्या गुरूंकडून दीक्षा घेऊन भ्रम-वशतः परत त्याच गुरूंची निंदा करू लागतो तेव्हा त्यास जे पाप लागते, ते सर्व या एकादशीचे व्रत पालन केल्याने नष्ट होऊन जाते."

हे युधिष्ठिर महाराज! या एकादशीचा महिमा इतका आहे की पवित्र कार्तिक महिन्यात तीन दिवस तीर्थराज प्रयागात स्नान करण्याचे, मकर-राशीमध्ये जेव्हा सूर्यदेव अवस्थान (वास) करतात अशा माघ मासात गंगा, यमुना व सरस्वतीच्या संगम-स्थळावर स्नान केल्याने, काशीत शिवरात्रीचे व्रत व गयेमध्ये भगवान श्रीविष्णूंच्या पादपद्मांत (चरण-कमलांत) पिंड-दान केल्याने जो फळ मिळते, तेच फळ या एकादशीच्या व्रताने अनायासेच मिळते. हे राजन! हे

व्रत पापरूपी वृक्षांना कापण्यासाठी तीक्ष्ण कुऱ्हाडी सारखे , पापांना भस्म करण्यासाठी दावानलासमान (वनात लागलेल्या आगी सारखे), पाप रूपी अंधाराला मिटविण्यासाठी तेजोमय सूर्यासमान तथा पाप रूपी मृगासाठी (हरिणासाठी) सिंह स्वरूप आहे. हे राजन! अपरा एकादशीच्या दिवशी श्रद्धापूर्वक हे व्रत करीत सोबतच जो त्रिविक्रम भगवान विष्णूचे अर्चन करतो, त्यास परम मंगल प्राप्त होते व तो मृत्यूच्या पश्चात विष्णुलोक प्राप्त करतो. सिंह राशीमध्ये बृहस्पती असताना गौतमी (गोदावरी) नदीत स्नान, कुंभ-पर्वात केदारनाथांचे दर्शन, बद्रीनाथ-धामाची यात्रा, दर्शन आणि सेवा, सूर्यग्रहणात कुरुक्षेत्र स्नान तथा स्नानाच्या समयी हत्ती, गाई, घोडे व सोने व भूमीचे दान करण्याचे जे फळ आहे ते सर्व 'अपरा' एकादशीच्या पालनाने आपोआप प्राप्त होते, इतकेच काय याचे माहात्म्य ऐकल्याने सुद्धा अत्यंत पुण्य मिळते.

**ज्येष्ठ कृष्ण-पक्षीय 'अपरा एकादशी' माहात्म्य समाप्त.**



**ॐ विष्णुपाद १०८ श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराज**
**ॐ विष्णुपाद १०८ श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त वामन गोस्वामी महाराज**
**ॐ विष्णुपाद १०८ श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त त्रिविक्रम गोस्वामी महाराज**

श्रीनवद्वीप आणि श्रीवृन्दावन—हे दोन्हीं अभिन्न आहेत. श्रीकृष्णच गौर रूपाने श्रीनवद्वीपधामात आणि गौरसुन्दरच कृष्ण रूपाने श्रीवृन्दावनधामात विलास करतात.

# श्रील गुरुदेवांचा एकादशी संबंधित अनमोल उपदेश

## *कमी खा आणि अधिक जप करा*

आम्हाला वैराग्यपूर्वक एकादशीचे पालन करण्याचा प्रयत्न करायला हवा—दिवसातून अनेकदा पाणी, फळांचा रस, फळे किंवा दूध घेऊन नाही. तरुण आणि निरोगी असल्यास पूर्ण दिवस आणि पूर्ण रात्र काहीच न घेता, पाणी सुद्धा न पिता आम्ही घालवू शकतो. जर आम्ही असे करण्यास सक्षम नसल्यास, दुपारी किंवा संध्याकाळी एकदा खाऊ किंवा पिऊ शकतो. आजार किंवा अशक्तपणा असल्यास, केवळ जीवनाचा निर्वाह करण्यासाठी दिवसातून दोन वेळा थोडा अनुकल्प (उपवासासाठी योग्य असे खाद्यपदार्थ) स्वीकारण्याची आम्हाला मुभा आहे, जेणेकरून आम्ही **"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"** या महामंत्राचा जप करू शकू.

पाश्चिमात्य भक्तांसाठी अधिक सवलती दिल्या गेल्या आहेत, कारण काही भक्त शरीराने दुर्बळ (कमकुवत) आहेत. बाकी भक्त अत्यंत मजबूत आहेत. मी अनेक पाश्चिमात्य भक्तांना, खास करून महिलांना, पूर्ण दिवस आणि रात्री न झोपता उपवास करताना पाहिले आहे.

एकादशीचे पालन केल्याने बरेच फायदे होतात. कॉलेज, इस्पितळात, आणि कामाच्या विभिन्न स्थानांत विद्यार्थ्यांना आणि श्रमिकांना आठवड्यात एकदा सुट्टी दिली जाते, जेणेकरून ते आराम घेऊ शकतील आणि पुढच्या दिवशी ते पूर्ण ऊर्जेने (जोमाने) काम करू शकतील. अन्यथा, ते आपले कार्य अनेक वर्षांपर्यंत जारी राखण्यास सक्षम होणार नाहीत. त्यांना काही आराम घेण्याची सक्त आवश्यकता आहे.

हे आमच्या पोटाच्या बाबतीत सुद्धा सत्य आहे. आमच्या पोटात बॅक्टेरिया (एक पेशीय जिवाणू) आहेत, जे आमच्या आरोग्याला सहाय्यक असतात . हे जिवाणू आम्हाला पचनासाठी नेहेमी मदत करीत असतात. जर हे जिवाणू आजारी पडले किंवा थकले, तर आम्ही सुद्धा आजारी पडू. त्यांना (दर पंधरवड्यात) कमीत कमी एक दिवसासाठी आराम देण्याचा प्रयत्न आम्हाला करायला हवा, जेणेकरून पुढच्या दिवशी ते परत जोमाने काम करू शकतील.

दुसरी गोष्ट अशी की, आपण पाहू शकतो की विशेष रूपे

एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत समुद्रात फारच मोठमोठ्या प्रचंड लाटा येतात. याचे कारण हे आहे की चंद्र ग्रह सर्व पाण्याला आकर्षित करतो. जेथे जेथे पाणी आहे, चंद्र त्या पाण्याला आकर्षित करतो. आमच्या शरीरात जास्ती पाणी असल्यास, विशेष करून एकादशीच्या दिवशी चंद्र त्यास आकर्षित करेल. आमच्या शरीरात कोणताही रोग असल्यास तो खूपच वृद्धिंगत होईल. हे उत्तम होईल की आम्ही या वस्तूंचे पथ्य पाळावे. विशेष रूपे एकादशीच्या दिवशी अन्न, मका, गहू, आणि त्यापासून बनलेल्या भोजनाचा त्याग करावा.

असे सुद्धा म्हटले गेले आहे की अधूनमधून आपण पाणी पिऊ शकता; त्याच्याद्वारे काही नुकसान होणार नाही. जर आपण एक दगडावर पाणी टाकले तर तो दगड लगेच शुष्क (कोरडा) होऊन जाईल; सर्व पाणी गायब होऊन जाईल (सर्व पाण्याचे बाष्पीकरण होईल). दुसरीकडे, आपण जर काही कापसावर किंवा टिपकागदावर पाणी टाकले तर, ते पाणी शोषून घेतील आणि त्यांना सुकण्यासाठी अनेक तास लागतील.

अन्न, गहू, तांदूळ, मका आणि डाळीपासून बनवलेले पदार्थ आमच्या पोटात कापसाप्रमाणे आहे. ते पोटात जाऊन फुलतात आणि पाणी शोषून ठेवतात. चंद्र त्यांच्यातून पाण्याला आकर्षित करतो, ज्यामुळे रोगांची वृद्धी होते. अनेक लोक एकादशी पासून पौर्णिमा आणि एकादशीपासून अमावस्येच्या दरम्यान इस्पितळांमध्ये मृत्यू पावतात. रोगांना नियंत्रित करण्यासाठी एकादशीचे पालन करणे आवश्यक आहे.



**नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णूपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिरक्षक श्रीधर गोस्वामी महाराज आणि नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णूपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराज**

# चंद्राची गुरुत्वाकर्षण शक्ती व एकादशी

## [श्रील गुरुदेवांच्या ५ जून, १९९८ ला 'एकादशी' या विषयावर दिलेल्या व्याख्यानातील उतारा]

एकादशीच्या दिवशी चंद्र पृथ्वीच्या जवळ येतो, आणि म्हणून तो आपल्या गुरुत्वाकर्षण शक्तीद्वारे प्रत्येक जागेपासून–समुद्र, नद्या, आमचे शरीर इत्यादी पासून पाण्याला आकर्षित करतो. जर या दिवशी कोणी अन्न ग्रहण केले तर ते अन्न टिपकागदाचे काम करते. आम्ही जेव्हा पाणी पितो, ते अत्यंत लवकरच आमच्या शरीरातून बाहेर पडते. परंतु जर आम्ही एक सोबत अन्न आणि पाण्याचे सेवन केले तर ते अन्न ब्लॉटिंगपेपर (टिपकागद) किंवा कापसाप्रमाणे पाण्याला शोषून ठेवते.

जरी आम्ही कापूस पिळला, तरीही काही पाणी त्यात राहीलच. अशा प्रकारे जर आम्ही अन्न खातो, ते एका स्पंजसारखे होऊन जाते. ते खूप पाणी संग्रहित करून ठेवते. चंद्र पाण्याला आकर्षित करेल आणि आपल्या सर्व रोगांत वृद्धी होईल. तुम्ही समुद्र किंवा महासागरात हे पाहू शकता; अशा प्रकारे एकादशीनंतर चार दिवसांपर्यंत तेथे मोठी भरती येते आणि उत्तुंग लाटा आढळून येतात.

ही सर्व शरीराच्या संबंधित बाह्य कारणे आहेत. आपल्या शरीरात जे लोक आसक्त आहेत, त्यांच्या फायद्यासाठी मी या कारणांचा उल्लेख केला आहे.

# आस्तिक आणि नास्तिक—सर्वांनीच एकादशी पाळावी

ज्या व्यक्ती भगवंतावर विश्वास ठेवत नाहीत, त्यांनीसुद्धा एकादशीचे पालन अवश्य करायला हवे. भारतात सर्व प्रकारचे भक्त एकादशीचे पालन करतात—मायावादी (निर्विशेषवादी), शैव (श्रीशंकरांचे उपासक), शाक्त (दुर्गादेवींचे उपासक), आणि गणेश–भक्त सुद्धा या व्रताचे पालन करतात. महिला, पुरूष आणि मुले सुद्धा एकादशीचे पालन करतात, परंतु आजकाल एकादशी उपवासाची प्रवृत्ती कमी होत चालली आहे. जवळपास प्रत्येकजणच एकादशीची अवहेलना (अनादर) करू लागला आहे; जणू काही पाश्चिमात्य देशांतून एक अत्यंत मोठे वादळ भारतात आहे आणि त्या वादळाच्या झंझावाताने प्रत्येक स्थानच प्रभावित झाले आहे.

जर आम्हाला अंबरीष महाराज, श्रीकृष्णांचे आईवडील—नंद महाराज आणि यशोदा माता—यांच्यासारखे भक्त बनायचे असेल, तर आम्हा सर्वांना एकादशीचे पालन अवश्य करायला हवे. नंद महाराज आणि यशोदा मातेने श्रीवृंदावन धामात एकादशीचे पालन केले. श्रीवृंदावन धामातून ते मथुरेच्या जवळ असलेल्या अंबिका-काननात (अंबिका-वनात) गेले आणि तेथे त्यांनी एकादशीचे पालन केले. त्यांनी जसे असे केले होते, तर आम्हीसुद्धा करू नये का? आम्हाला अत्यंत काळजीपूर्वक एकादशीचे पालन करायला हवे, मग आम्हाला भक्ती अविवेचितपणे (न शोधताही) प्राप्त होईल.

आम्ही शुद्ध वैष्णवांच्या मार्गदर्शनाखाली एकादशीचे पालन करावे आणि कीर्तनाचे अनुष्ठान करावे. कारण कोणी भक्ती करत आहे तर ते ठीकच आहे. परंतु जर तो एका व्रज-भक्ती असणाऱ्या आणि व्रज-धामाशी नाते असणाऱ्या रसिक भक्ताच्या आनुगत्यात भजन करीत असेल, असा भक्त त्याचे संशय दूर करू शकतो आणि राधा, कृष्ण आणि महाप्रभू—त्याच्या हृदयात स्थापित करू शकतो. नेहमी अशा श्रेष्ठ क्षमतेच्या (दर्जेच्या) वैष्णवांच्या मार्गदर्शनात वृंदावनात राहावे आणि नेहेमी श्रीगुरुदेवांनी प्रदान केलेल्या दीक्षा मंत्रांचा जप करावा आणि भगवंताचे स्मरण करावे. सोबतच श्रीकृष्णांच्या पवित्र नामांचा जप करावा आणि त्या त्या नामांच्या संबंधित दिव्य लीलांचे स्मरण करावे.

एक दिवस श्रीराधिका श्रीकृष्णचंद्रांना म्हणाली—"हे प्राणप्रिय प्रभो! मी आपल्या श्रीविग्रहाच्या सोबत एकीभाव होऊ इच्छिते. म्हणून प्रभो! त्या दोघांचे संमिश्रित असे रूप दाखवा जे परस्परांग मध्यस्थ असावे, क्रीडा कौतुकाला मंगलदायक असावे, परस्पर दोघांच्या भावाने युक्त असावे." प्रियेची परम प्रीतिसूचक अशी वाणी ऐकून जगद्गुरू भगवान श्रीकृष्णांनी उत्साहपूर्वक आपल्या इच्छेच्या अनुसार अचिंत्य शक्तीच्या द्वारा प्रेमालिङ्गन योगाने श्रीराधेच्या भाव आणि कांतीने युक्त एकच मूर्ती प्रकाशित करून श्रीराधिकेला स्वप्नात दर्शन करविली. स्वप्नात प्रथम दर्शन करविण्याचे तात्पर्य हे आहे की जर आपल्याला ही राधाभावकान्ति-मिलित वपू (शरीर) चांगले वाटली तर मी भक्तांच्या समोर प्रकट करीन.

# फक्त अशक्त भक्तांसाठी अनुकल्पाची सवलत

विदेशातील भक्त आणि भारतातील दुर्बळ व्यक्तींसाठी एक सवलत दिली गेली आहे. जर आम्ही विधिनिषेध पालन केले नाही, तर आम्हाला सर्व पापांचे भागीदार बनावे लागेल. जर आमच्यात काही भक्ती असेल, तर तीसुद्धा नष्ट होऊन जाईल.

आम्ही सर्व आज एकादशीचे पालन करीत आहोत. आम्हाला निश्चितच एकादशीचे पालन करायला हवे. सर्व प्रकारची अन्नधान्ये जसे गहू, जव (सातू) इत्यादींपासून तयार केलेले पदार्थ—या सर्वांचा सक्तीने त्याग करायला हवा. जर आम्ही एकादशीचे पालन केले, भगवंताच्या पवित्र नामांचा जप केला, श्रेष्ठ साधूंच्या संगतीत 'हरिकथा' श्रवण केली, उन्नत भक्तांचा संग केला आणि भक्तीच्या नऊ अंगांपैकी कोणत्याही अंगाचे पालन केले, तर आमचे कधीही पतन होणार नाही.

अशक्त व्यक्ती आपल्या इच्छेनुसार काही अनुकल्प स्वीकार करू शकतात, परंतु हे पदार्थ एकादशीसाठी स्वीकारार्ह खाद्य पदार्थांच्या सूची मधलेच असावेत. मुलेसुद्धा आपल्या आवडीनुसार काही खाऊ शकतात, परंतु त्यांच्या आईवडिलांनी काळजी घ्यायला हवी की त्यांची मुले फक्त फळे आणि एकादशीला स्वीकारण्याजोगे पदार्थांचेच सेवन करतील.

कधीकधी, कलियुग आणि मायेच्या प्रभावामुळे आम्ही कमजोर होऊन जातो आणि भक्तीच्या अंगांचे पालन करू शकत नाही; हेच कारण आहे की आम्ही अधःपतित होतो. कोणत्याही स्थितीत, आम्ही मंत्रांचा जप, कृष्णाचे स्मरण आणि एकादशी व्रताचे पालन- यांना विसरू नये. भले आपण कमजोर असो, या सिद्धांतांचे पालन करण्याचा प्रयत्न जरूर करावा.

याच्याशिवाय एकादशीचे पालन करण्याचे सर्वात महत्त्वपूर्ण कारण हे आहे की एकादशी स्वयं श्रीकृष्णांचेच एक रूप आहे. स्वतः श्रीकृष्णच 'एकादशी' बनले आहेत. ते एकादशीच्या दिवशी या जगात अवतरित होतात. जे लोक एकादशीचे व्रत पालन करतात, भगवान त्यांची देखभाल स्वतः करतात आणि त्यांना विशेष कृपा प्रदान करतात. म्हणून आम्हाला एकादशीचे पालन करायला हवे.

एकदा एकादशीच्या दिवशी श्रीचैतन्य महाप्रभू आपले परिकर (पार्षद)—स्वरूप दामोदर, राय रामानंद, नित्यानंद प्रभू आणि अन्य हजारो भक्तांसोबत जगन्नाथ पुरी मध्ये होते. एकादशीला ते एक

क्षणभरसुद्धा न झोपता श्रीकृष्णांचे स्मरण, हरिकथा श्रवण आणि अहोरात्र कीर्तनात मग्न असत. यामध्ये संध्याकाळी जवळपास ८ वाजता जगन्नाथ पुरीचे पंडे (पुजारी) मोठ्या प्रमाणात स्वादिष्ट, मधुर महाप्रसाद घेऊन आले आणि तो महाप्रसाद त्यांनी महाप्रभू आणि त्यांच्या भक्तांसमोर ठेवला.

पुराणांत आणि अन्य शास्त्रांत लिहिले आहे की जर कोणी महाप्रसाद प्राप्त करतो तर एक क्षणाचाही उशीर न करता त्याचे सेवन करायला पाहिजे. जेव्हा चैतन्य महाप्रभूंनी महाप्रसाद पाहिला, ते अत्यधिक प्रसन्न झाले. त्यांनी विभिन्न प्रकारे त्या महाप्रसादाची प्रार्थना केली आणि रात्रभर त्याची परिक्रमा केली. त्यांनी शास्त्रांतून अनेक श्लोक उद्धृत केले आणि त्याची व्याख्या करत त्यांनी सांगितले की डुक्कर, कावळे आणि कुत्र्यांद्वारे घेतलेला महाप्रसाद सुद्धा महाप्रसादच आहे. तो इतका शक्तिशाली आहे. आम्ही त्याचा अनादर करू नये; उलट महाप्रसाद जरी सडलेला किंवा सुकलेला असो, दूर स्थानांवरून आणला असो, तरी सुद्धा आम्हाला त्याचा सन्मान करायला हवा.

जेव्हा सकाळ झाली, तेव्हा महाप्रभूंनी त्यांच्या सर्व परिकरांसोबत समुद्रात स्नान केले, आणि नंतर त्यांना म्हणाले, "आता ह्या प्रसादाला आम्ही विभाजित करू आणि नंतर त्यास आदरपूर्वक ग्रहण करू."

एकादशीच्या दिवशी, अन्न स्वीकार न करून आम्हाला एकादशीचा सन्मान करायला हवा. एकादशी कृष्णभक्ती, प्रेम आणि स्नेहाची जननी(आई) आहे. जर आम्ही एकादशीचे पालन केले नाही, तर कृष्णभक्ती आम्हाला कधीही प्राप्त होणार नाही.

जर आम्ही तरुण आणि सशक्त असलो, तर आम्ही फळे, भाज्या, रस तसेच पाणीसुद्धा न घेता, पूर्ण दिवसभर उपवास करू शकतो. जर आम्ही इतके सशक्त नसलो, किंवा जर आम्ही आजारी किंवा वृद्ध असाल तर आपण काही फळ, थोडा रस किंवा दूध घेऊ शकता.

एका दिवसात तीन किंवा चार वेळा मोठ्या मात्रेत रस, एक किंवा दोन किलो गोड रबडी (दुधाच्या सायीचा बासुंदीसारखा एक पदार्थ) अन्य खाद्य पदार्थ खाऊ नका. फक्त आपले जीवन चालावे म्हणून अत्यंत कमी खावे. एकादशीला आम्ही दिवसाच्या वेळी बिलकुल झोपू नये आणि नामाचार्य श्रील हरिदास ठाकूर यांच्याप्रमाणे 'हरे कृष्ण' महामंत्राचा जप करायला हवा; तरच

एकादशीचे फळ प्राप्त होईल.

## दशमी, एकादशी आणि द्वादशीचे संकल्प मंत्र

**दशमीच्या दिवशी खालील संकल्प मंत्र म्हणावा**

**दशमी दिवसे प्राप्ते व्रतस्थोऽहं जनार्दन।**
**त्रिदिनं देवदेवेश निर्विघ्नं कुरु केशव॥**

**एकादशीच्या दिवशी खालील संकल्प मंत्र म्हणावा.**

**एकादश्यां निराहारः स्थित्वाहमपरेहनि।**
**भोक्ष्यामि शरणं मे भवाच्युत॥**

**द्वादशीला पारणे केल्यानंतर खालील प्रार्थना मंत्र म्हणावा.**

**अज्ञान तिमिरान्धस्य व्रतेनानेन केशव।**
**प्रसन्न सुमुखो भूत्वा ज्ञानदृष्टिप्रदो भव॥**
**तव प्रसाद स्वीकारात् कृतं यत् पारणं मया।**
**व्रतनानेन संतुष्टः स्वस्तिं भक्तिं प्रयच्छ मे॥**

**द्वादशीला वरील प्रार्थना म्हटल्यावर खालील प्रार्थना म्हणून या व्रताद्वारे प्राप्त सर्व पुण्य भगवंतांना समर्पण करावे.**

**एकादश्युपवासेन द्वादश्यां पारणेन च।**
**यदार्जित मया पुण्यं तेन प्रीणातु केशव॥**

---

**वैवस्वतान्तरे ब्रह्मन् गंगातीरे सुपुण्यदे।**
**हरिनाम तदा दत्वा चण्डालान् हड्डिकांस्तथा॥**
**ब्राह्मणान् क्षत्रियान् वैश्यान् शतशोऽथ सहस्रशः।**
**उद्धरिष्याम्यहं तत्र तप्तस्वर्णकलेवरः।**
**संन्यासश्च करिष्यामि काञ्चनग्राममास्थितः॥**

*(ऊर्द्ध्वाम्नाय-संहितायां श्रीभगवद्वाक्यम्)*

स्वयं भगवान कृष्ण म्हणाले—"हे ब्रह्मन्! वैवस्वत-मन्वंतरात मी सुपवित्र गंगातीरावर तापलेल्या सोन्यासारखा वर्ण आणि विग्रह धारण करून हरिनाम प्रदान करून शत-सहस्र (असंख्य) ब्राह्मण क्षत्रिय-वैश्य-चांडाळ आणि नीच जातीच्या व्यक्तींचा उद्धार करीन आणि काञ्चनग्रामला जाऊन संन्यास धर्म ग्रहण करीन."

# एकादशी संबंधी प्रश्नोत्तरे (इष्ट गोष्टी)

## *एकादशीला भाज्या खाऊ नयेत*

श्यामराणी दासी—"गुरूदेव, आम्ही नेहेमी ऐकतो की एकादशीच्या दिवशी अन्नधान्यांचे सेवन करू नये, कारण की त्या दिवशी त्यांच्यात विविध पापे प्रवेश करतात, परंतु टमाटे आणि दुधी भोपळयासारख्या काही भाज्या आम्ही का खाऊ शकत नाही?"

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"या भाज्या अन्नधान्यांसारख्या नाही आहेत. त्यांच्यात अन्नधान्ये म्हणजे मका, गहू, आणि डाळींचे गुण नसतात [म्हणजे त्या भाज्या ब्लॉटिंग पेपर किंवा कापसाच्या चेंडूसारखे कार्य करत नाहीत.] आम्हाला एका विशेष पौराणिक कथेमुळे माहिती आहे की एकादशीच्या दिवशी ब्रह्महत्या (ब्राह्मणाची हत्या), मातृहत्या (आईची हत्या), गोहत्या (गाईची हत्या) इत्यादी सर्व पापे अन्नधान्यांमध्ये आणि अन्नधान्यांपासून तयार केलेल्या पदार्थांत आश्रय घेतात. याच्याशिवाय, शास्त्रे एकादशी दिवशी काही भाज्या आणि इतर खाद्यपदार्थांच्या भोजनावर सुद्धा प्रतिबंध घालतात."

## *मरणासन्न व्यक्तीच्या शाश्वत कल्याणाचा एकमेव उपाय*

इंदुलेखा दासींची पुतणी—"काल पहिल्यांदा मी एकादशीचे पालन केले. परंतु मी हे माझ्या आईसाठी केले कारण तिची जीवनयात्रा यकृताच्या कर्करोगामुळे समाप्त होणार आहे."

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"हे फारच उत्तम की तुम्ही एकादशीचे व्रत केले. एकदा रस्त्यावर पडलेली एक गाय मरायला टेकली होती. तिचे शरीर तडफडत होते, परंतु तिचा प्राण तिच्या शरीरातून बाहेर जात नव्हता.

माझ्या एका शिष्याने तिला पाहिले आणि ती म्हणाली, "हे गोमाता, मी तुला एका एकादशीचे फळ देत आहे. आता तू अत्यंत सहजतेने आपला प्राण त्यागण्यास सक्षम होशील." लगेचच, अगदी थोडाही उशीर न करता, गाईने शरीर सोडून दिले.

मागच्या वर्षी, नंदगोपाल प्रभूंच्या घोड्यांपैकी एक घोडा मरायला टेकला होता, आणि त्याचा प्राण शरीरातून बाहेर जात नव्हता. मी त्याच्या कानात 'हरे कृष्ण' महामंत्र म्हटला आणि त्याने खूपच सहजतेने प्राण सोडला. हा महामंत्राचा जप चमत्कारी आणि अत्यंत शक्तिशाली आहे."

## *एकादशीचे आध्यात्मिक स्वरूप*

राम-तुलसी दास—“काय श्रीएकादशी-देवी स्वयं श्रीमती राधिका आहे?”

श्रील नारायण गोस्वामी महाराज—“श्रीएकादशी-देवी श्रीमती राधिका नव्हे, परंतु तिला श्रीमती राधिकेचा एक प्रकाश मानले जाऊ शकते. श्रीकृष्ण स्वतः ‘एकादशी’ बनले आहेत. एकादशी आणि श्रीकृष्ण एकच आहेत, श्रीमती राधा आणि श्रीकृष्ण एकच आहेत, म्हणून असे म्हटले जाऊ शकते की एकादशी-देवी राधिकेची अभिव्यक्ती (किंवा प्रकाश) आहे.

श्रीमती राधिका ह्लादिनी-शक्ति-स्वरूपा (कृष्णाच्या सर्वोच्च आनंद-प्रदायिनी शक्तीचे सार) असल्यामुळे त्या एकादशीपेक्षा श्रेष्ठ आहेत. गोलोक वृंदावनात एकादशीचे कोणीही पालन करत नाही. एकादशीचे पालन या भौतिक जगात साधन-भक्ति-रत-जनांसाठीच आहे. श्रीगोलोक वृंदावन धामात श्रीमती राधिका श्रीकृष्णांची सर्वोच्च शक्ती आहेत. तर त्यांच्यात आणि एकादशीत थोडा फरक (भेद) आहे.”

[नोटः कोणी तर्क करू शकते की नंद महाराजांनी एकादशीचे पालन केले आणि ते तर श्रीगोलोक वृंदावन धामाचे निवासी आहेत. वास्तवात नंद महाराज केवळ ‘प्रकट किंवा भौम वृंदावनातच’ एकादशीचे पालन करतात. हे भौम-वृंदावन या जगात प्रकट झाले आहे आणि ती एक साधना-भूमी आहे. त्यांनी केवळ दुसऱ्यांना शिकविण्यासाठी असे केले. (श्रीपाद भक्तिवेदान्त माधव महाराज)]

## *फक्त पांडव निर्जल एकादशी करून चालणार नाही!*

श्रीपाद नेमी महाराज—“जर वास्तविकपणे आम्ही काही कारणास्तव इतर एकादशींचे पालन केले नाही, तर (पांडव) निर्जल एकादशीचे पालन केल्याने काय आम्ही क्षतिपूर्ती (नुकसान-भरपाई) करू शकतो का?”

श्रील नारायण गोस्वामी महाराज—“मी आत्ताच याचे उत्तर दिले आहे. आम्ही केवळ हरिनामाद्वारेच क्षतिपूर्ती (नुकसान-भरपाई) करू शकतो, केवळ उचित रितीने (पांडव) निर्जल एकादशीचे पालन करून नाही. आम्हाला प्रत्येक एकादशीचे पालन करावेच लागेल. केवळ भीमांसाठी (पांडव निर्जल एकादशीच्या उपवासाची) ही सवलत दिली गेली आहे.”

एकादशीला दात साफ जरूर करावे

बलराम दास—"काय आम्हाला निर्जल एकादशीच्या दिवशी आपले दात साफ करायला हवे की नाही?"

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"का नाही? काय आपल्याला स्नान करायला नको का? [ज्या प्रमाणे स्नान आवश्यक आहे, त्याच प्रमाणे दात साफ करणे सुद्धा आवश्यक आहे. परंतु कडुनिंबाची काडी (दंतकाष्ठ) अथवा सैंधव (शेंद) मीठ आणि तुरटीपासून बनविलेल्या घरगुती मंजनाने दात घासावे.]"

बलराम दास—"स्नान करताना पाणी प्याले जात नाही."

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"परंतु कसे तरी पाणी आपल्या शरीरात प्रवेश करतेच. निःसंशय आपल्याला स्नान करायला हवे, कारण त्या दिवशी चरणामृत घेऊ नये; केवळ चरणामृताला प्रणाम केला पाहिजे."

## *प्राचीन भक्तांच्या आदर्शाचे पालन करावे*

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"प्राचीन काळापासून श्री रूप, श्री सनातन इत्यादी सहा गोस्वामींच्या काळापर्यंत सर्व भक्त प्रत्येक एकादशीचे अनुष्ठान पाणी न पिता निर्जला एकादशी सारखेच करीत असत.

अंबरीष महाराज प्रत्येक एकादशीचे अनुष्ठान तीन दिवसांपर्यंत करीत अस्त. पहिल्या दिवशी ते आपल्या आहाराला नियंत्रित करीत असत, दुसऱ्या दिवशी ते जेवण आणि पाणी वर्ज्य करीत असत आणि तिसऱ्या दिवशी ते केवळ एकदाच खात असत."

## *एकादशीला पोटभर फराळ घेऊ नये*

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"भारतात प्रत्येक एकादशीचे पालन साधारणतः भोजन किंवा पाण्याविना केले जाते. पूज्यपाद श्रील भक्तिवेदान्त स्वामी महाराजांनी पाहिले की पश्चिमी भक्त काही सीमेपर्यंत दुर्बळ आहेत, म्हणून त्यांनी त्यांच्यासाठी काही सवलती देणे आरंभ केले.

ते म्हणाले म्हणाले की तुम्ही तीन वेळा अनुकल्प घेऊ शकता. परंतु, आता अनुकल्प ग्रहण करण्याच्या ऐवजी, ते बृहत्–कल्प (बृहत्–फलाहार किंवा भरपूर उपवासाचा फराळ) घेत आहेत. जितके ते खाऊ शकतात, तितक्या मात्रेत ते फलाहार घेत आहेत. हे चांगले नाही."

## श्रील गुरुदेवांचा उच्छिष्ट प्रसाद एकादशीला न घेता द्वादशीला घ्यावा

यशस्विनी दासी—"जर कोण्या व्यक्तीने निर्जला एकादशी करताना आपला उच्छिष्ट महाप्रसाद खाल्ला तर काय तिची एकादशी मोडेल?"

श्रील नारायण गोस्वामी महाराज—"हो."

श्रीपाद माधव महाराज—"आम्ही श्रील गुरुदेवांचा उच्छिष्ट प्रसाद वेगळा ठेवून निर्जला एकादशीनंतर येणाऱ्या द्वादशीच्या दिवशी सुद्धा खाऊ शकतो." [याद्वारे निर्जला एकादशी व्रताचे सुद्धा पालन होईल आणि भक्त गुरुदेवांच्या प्रसादाचा सुद्धा सन्मान करू शकतील.]

भक्तः "मी काही अपराध केले आहेत."

श्रील नारायण गोस्वामी महाराजः "अपराध करू नका. जर आम्ही आमचा हरिनामाचा जप वाढवला तर, अपराधांचा विनाश होऊन जाईल."



## ऑटोफॅगीः नोबल चिकित्सा पुरस्कार (वर्ष २०१६)



जपानचे डॉ. योशिनोरी ओहसुमी यांनी 'ऑटोफॅगी' च्या संबंधित त्यांच्या संशोधन कार्यासाठी २०१६ वर्षाचा नोबल चिकित्सा पुरस्कार जिंकला. या प्रक्रियेत पेशी 'स्वतःलाच खाऊन टाकतात.'

ऑटोफॅगी ही आमच्या शरीरात होणारी ती प्रक्रिया आहे ज्याच्यामुळे आमचे शरीर स्वतःलाच खाते. जर आमच्या शरीरात काही अतिरिक्त सेल्स, मेद इत्यादी असतात तर त्यांचा देखील परत वापर केला जातो किंवा कचऱ्याच्या रूपात त्याग केला जातो. जर ही प्रक्रिया ठीक रितीने आमच्या शरीरात चालत राहील, तर आमचे शरीर स्वस्थ राहील. जर ही प्रक्रिया ठीक चालू ठेवण्यासाठी आवश्यक आहे की वेळोवेळी आम्ही उपवास ठेवावा. जर आम्ही वेळोवेळी एकादशी सारखे उपवास केले नाहीत तर हे अतिरिक्त सेल्स आणि मेद आमच्या पोटात जमा होतील आणि आमच्या शरीराला हे अतिरिक्त सेल्स आणि मेद संचय करण्यासाठी अतिरिक्त भार उचलावा लागेल. याच्या शिवाय आमच्या सिस्टम मध्ये सेल्स आणि मेदाच्या या अतिरिक्त संचयामुळे रोगराई होऊ शकते. हे अतिरिक्त सेल्स आणि मेद सिस्टम मधून बाहेर काढायला पाहिजे किंवा पुन्हा उपयोगाद्वारा संरक्षित केल्या गेल्या पाहिजे.

जर ऑटोफॅगीची ही प्रक्रिया आमच्या शरीरात चांगल्या रूपात चालत राहिली, तर आमच्या शरीरात कोणताही रोग येत नाही. जपानी नोबेल पुरस्कार विजेते योशिनोरी ओहसुमी यांनी आपल्या परीक्षण समूहाच्या सदस्यांना अनेक औषधे देण्याच्या प्रयत्न केला. परंतु त्यांना हे आढळून आले की वेळोवेळी केले गेलेले एकादशी सारखे उपवासच ऑटोफॅगीच्या प्रक्रियेला प्रभावी रूपाने मदत करू शकतात. कोणतेही औषध ऑटोफॅगीच्या प्रक्रियेला तितक्या प्रभावी रूपात सहाय्य करू शकत नाही.

एकादशीचा उपवास आपल्या शरीरात चालणाऱ्या ऑटोफॅगीच्या प्रक्रियेत सुधार आणण्याचा सर्वात चांगला आणि एकमात्र उपाय

आहे. या जपानी वैज्ञानिकांनी हे शोधून काढले की एकादशी सारखा आवधिक उपवास ऑटोफॅगीच्या प्रक्रियेला गती देण्यासाठी परम लाभदायक असतो. त्यांना या शोधामुळे या महान पुरस्कारामुळे गौरवान्वित केले गेले.

एकादशी, राम-नवमी, गौर-पूर्णिमा, नित्यानन्द-त्रयोदशी, नृसिंह-चतुर्दशी, महाशिवरात्री, अद्वैत-सप्तमी, कृष्णा-जन्माष्टमी इत्यादी दिवसांमध्ये भोजन आणि पाण्याचा त्याग करून पूर्ण उपवासाचा विधी शास्त्रांमध्ये सांगण्यात आला आहे. आधुनिक विज्ञानाने देखील या उपवासांद्वारे होणाऱ्या लाभांना मान्य केले आहे.

जर आमचे शरीर स्वस्थ आहे आणि आम्ही निर्जल-एकादशी करण्यास सक्षम आहे, तरी देखील जर एकादशी तिथीची अवहेलना करीत आम्ही अनुकल्प (किंवा फळे आणि पाणी) स्वीकार केला, तर या अपराधाच्या मुळे आम्हाला एकाचा गंभीर पापमय प्रतिक्रियेचा सामना करावा लागेल.

येथे सांसारिक (लौकिक) उदाहरण प्रस्तुत करण्यात येते आहे. आपण समजा गरजू लोकांना आवश्यक खाद्य-सामग्री आणि पाणी इत्यादीची मदत करण्याची आपली ऐपत आहे. तरीही आपण भूक आणि तहानेने पीडित लोकांची उपेक्षा केली आणि त्यांना भोजन आणि पाणी दिले नाही, तर आपल्याला त्या पापाची प्रतिक्रिया मिळते. अशा प्रकारे जर आपण एकादशीच्या दिवशी पुर्ण प्रकारे उपवास करण्यास सक्षम आहोत, आणि जर आपण असे केले नाही, तर आपल्याला मोठ्या पापाचे भागीदार व्हावे लागेल.

उदाहरणासाठी जेव्हा देवानंद पंडितांच्या शिष्यांनी श्रीवास पंडितांच्या चरणी अपराध केला तेव्हा देवानंद पंडित देखील त्या अपराधात निबद्ध झाले. एकदा श्रीवास पंडितांना देवानंद पंडितांच्या मुखातून निःसृत श्रीमद्-भागवताची कथा श्रवण केल्याने भक्तीच्या अष्ट सात्त्विक विकारांचा अनुभव होऊ लागला. परंतु श्रीवास पंडितांच्या शुद्ध भक्तीच्या उन्नत स्तराशी अनभिज्ञ देवानंद पंडितांच्या अनुयायांनी श्रीवास पंडितांच्या प्रति असन्मान-जनक व्यवहार करीत त्यांना श्रीमद्-भागवताच्या कथेतून निष्कासित केले (बाहेर काढले).

आपल्या अनुयायांच्या या अनियंत्रित आचरणाच्या दरम्यान देवानंद पंडित केवळ एका मूक दर्शकाची भूमिका निभावत होते. याचा परिणाम हा झाला की श्री चैतन्य महाप्रभू देवानंद पंडितांवर रागावले. जेव्हा देवानंद पंडितांनी वक्रेश्वर पंडितांच्या चरण-कमळी आश्रय घेतला तर श्रीचैतन्य महाप्रभूंनी त्यांना श्रीवास पंडितांच्या

चरणी केलेला अपराध क्षमा केला.

तर ही घटना आम्हाला शिकवते की पूर्णपणे एकादशीचा उपवास करण्यास सक्षम असूनही, जर आम्ही त्या दिवशी फळ आणि दुधाचा महाप्रसाद स्वीकार करतो, तर आमच्याकडून एकादशी-देवीची उपेक्षाच घटित होते. याच्या द्वारा आम्हाला भगवान श्रीकृष्णाच्या आदेशाचे उल्लंघन करण्याचे पाप लागते. आम्ही गुरुदेवांची अवज्ञा या अपराधाच्या अंतर्गत दोषी मानल्या जातो. म्हणून एकादशीच्या दिवशी अनुकल्प (पाणी किंवा फळे) घेऊ नये.

अनुकल्प सर्वांसाठी नाही आहे. हा कोणासाठी आहे? जे लोक ऐंशी वर्षा पेक्षा अधिक वयाचे आहेत, जे लोक रोगी आहेत किंवा मग ज्या महिला गर्भवती आहेत, त्यांच्यासाठी शास्त्रात अनुकल्पाची व्यवस्था आहे. एकादशीच्या पालनाच्या प्रक्रियेच्या सुरुवातीला आम्ही काही फळ किंवा पाणी देखील घेऊ शकतो, कारण पाणी आणि फळात असलेले फोलिक ॲसिड आम्हाला आपल्या पोटाला साफ करण्यास मदत करतील. परंतु हळूहळू आम्ही महत्त्वपूर्ण दिवशी —जसे एकादशीचा दिवस आणि भगवान विष्णूच्या अवतारांच्या आविर्भाव तिथींमध्ये पाणी आणि फळांचा देखील त्याग करण्याचा अभ्यास करायला हवा. येथपर्यंत की सांसारिक दृष्ट्या सुद्धा समजा आम्ही कोण्या भुकेल्या (क्षुधित) आणि तहानेने पीडित व्यक्तीला पाहून देखील जर एका मूक प्रेक्षकाची भूमिका धारण केली, तर आमच्या सोबत राहाणारे लोक आम्हाला प्रश्न करतील, "अरे, तुम्ही त्यांची मदत का नाही केली? तुम्ही त्यांना पाणी किंवा अन्न प्रदान करण्याचा काही देखील प्रयास का केला नाही?"

**एकादशी-तत्त्व आणि नाम-तत्त्व यांच्यात काहीच फरक नाही आहे.** आम्ही निर्जल एकादशी व्रत करण्यास सक्षम असून देखील जर आम्ही निर्जल-एकादशी केले नाही, आणि मग विचार केला की "आम्ही पूर्णपणे सक्षम असूनही निर्जल-एकादशी प्रति आमची अनिच्छा आहे. आमच्या या पापातून सुटका मिळविण्यासाठी आम्ही अधिक संख्येत हरि-नामाचे उच्चारण करू." ही विचार-शैली पवित्र भगवद्-नामाच्या प्रति अपराधाचे कारण बनते. "मला एकादशीच्या उपवासाचे अनुष्ठान तर करायचे आहे. परंतु मी सक्षम असूनही अनुकल्प घेईन." ही एक अपराध युक्त विचारसरणी आहे.

श्रीचैतन्य महाप्रभूंनी देखील एकादशीच्या दिवशी जगन्नाथ महाप्रसादाचे सेवन केले नव्हते. महाप्रसादाचा अर्थ भगवंतांना

निवेदन केलेले फळ आणि अन्न देखील होऊ शकतो. परंतु महाप्रभूंनी एकादशीच्या दिवशी महाप्रसादाची स्तुती-प्रार्थना केली आणि द्वादशीला पारणे करण्याच्या वेळी तो महाप्रसाद आपल्या श्रीमुखात टाकला. म्हणून जर आम्ही सक्षम असू, तर आम्हाला एकादशीच्या दिवशी भगवंतांना निवेदन केलेल्या फळाचा महाप्रसाद देखील खाणे निषिद्ध आहे. एकादशीच्या दिवशी निर्जल व्रताचे पालन करून हरिनाम संकीर्तनात संलग्न राहणेच श्रीचैतन्य महाप्रभूंचे शंभर टक्के आनुगत्य म्हटले जाऊ शकते.

---

## श्रीकृष्णस्तोत्रम्

**ॐ नमो विश्वरूपाय विश्वस्थित्यन्तहेतवे।**
**विश्वेश्वराय विश्वाय गोविन्दाय नमो नमः॥१॥**
**नमो विज्ञानरूपाय परमानन्दरूपिणे।**
**कृष्णाय गोपीनाथाय गोविन्दाय नमो नमः॥२॥**
**नमः कमलनेत्राय नमः कमलमालिने।**
**नमः कमलनाभाय कमलापतये नमः॥३॥**
**बर्हापीडाभिरामाय रामायाकुण्ठमेधसे।**
**रमामानसहंसाय गोविन्दाय नमो नमः॥४॥**
**कंसवंशविनाशाय केशिचाणूरघातिने।**
**वृषभध्वजवन्द्याय पार्थसारथये नमः॥५॥**
**वेणुवादनशीलाय गोपालायाहिमर्दिने।**
**कालिन्दीकूललोलाय लोलकुण्डलधारिणे॥६॥**
**बल्लवी-नयनाम्भोज-मालिने नृत्यशालिने।**
**नमः प्रणतपालाय श्रीकृष्णाय नमो नमः॥७॥**
**नमः पापप्रणाशाय गोवर्द्धनधराय च।**
**पूतनाजीवितान्ताय तृणावर्त्तासु-हारिणे॥८॥**
**निष्कलाय विमोहाय शुद्धायाशुद्धिवैरिणे।**
**अद्वितीयाय महते श्रीकृष्णाय नमो नमः॥९॥**
**प्रसीद परमानन्द! प्रसीद परमेश्वर!**
**आधिव्याधिभुजङ्गेन दष्टं मामुद्धर प्रभो॥१०॥**
**श्रीकृष्ण रुक्मिणीकान्त गोपीजनमनोहर।**
**संसारसागरे मग्नं मामुद्धर जगद्गुरो॥११॥**
**केशव क्लेशहरण नारायण जनार्दन।**
**गोविन्द परमानन्द मां समुद्धर माधव॥१२॥**

# एकादशीचे आहार-विषयक नियम

## *अनुकल्प (एकादशीला खाण्याजोगे पदार्थ)*

(१) सर्व फळे (ताजे आणि सुके), सुके मेवे आणि त्यांच्यापासून काढलेले तेल, शिंगाडे, ऊस, गूळ आणि उसापासून बनलेले अन्य पदार्थ. साखर बनविताना गाय, डुक्कर आणि कुत्र्याच्या हाडांना ७०० डिग्री सेल्सिअस तापमानावर जाळून तयार केलेल्या कोळशाचा चुरा तिला पांढरी बनविण्यासाठी वापरण्यात येतो. म्हणून एकादशीच्या दिवशी ज्यात मैद्याची भेसळ नाही आहे अशा शुद्ध गुळाचा वापर करणे अधिक उत्तम आहे.

(२) बटाटे, रताळी, काशीफळ (भोपळा), काकडी, मुळा (Radish), स्क्वॅश, फणस, लिंबू, अवकाडो (रूचिरा, मेक्सिकोत उत्पन्न होणारे नासपाती किंवा पेअर सारखे फळ), ऑलिव्ह, नारळ, कुट्टू (Buck wheat)

(३) दूध आणि त्यापासून तयार केलेले सर्व पदार्थ. दुधाचे उत्पादन. परंतु चातुर्मासाच्या (पावसाळयाच्या) दुसऱ्या महिन्यात दही आणि तिसऱ्या महिन्यात दूध वर्ज्य आहेत.

(४) भारतीय प्रजातीच्या गाईंची लोणी कमी आचेवर गरम करून बनवलेले शुद्ध तूप, शेंगदाण्याचे शुद्ध तेल, नारळाचे तेल, बदामाचे तेल. परंतु आजकाल बऱ्याचदा तेलांमध्ये सुद्धा भेसळ असते.

## *एकादशीच्या दिवशी वापर करण्यायोग्य मसाले*

मिरी, ताजे आले, शुद्ध सैंधव मीठ (समुद्राच्या मिठाचा एकादशीच्या दिवशी वापर केला जात नाही) आणि ताजी हळद (सुकलेल्या हळकुंडांपासून घरी दळलेली, मैद्याची भेसळ नसलेली). हे सर्व नव्या आणि स्वच्छ पॅकेटमधून घेतले पाहिजे.

## *एकादशीच्या दिवशी प्रतिबंधित खाद्य पदार्थ*

(1) टमाटे, वांगी, फूल-कोबी, ब्राकोली, सिमला मिरची, मटार, चणे, काबुली चणे, चवळी, घेवढा, वाल तसेच सर्व प्रकारच्या शेंगा, राजमा इत्यादी आणि यांच्या पासून बनलेले पदार्थ जसे पापड, सोयाबीनचे दही, सोयाबीनचे दूध, इत्यादी.

(2) कारले, दुधी भोपळा, पडवळ, दोडके (शिराळे), शेंगा, डंठल (जाडसर देठांच्या भाज्या), भेंडी, केळीचे फूल.

(3) सर्व प्रकारच्या पालेभाज्या-पालक, सॅलड, कोबी, गोड निंब,

कडू निंब इत्यादी.

(4) अन्न जातीय पदार्थ—बाजरी, जव, रवा, गव्हाचा भरडा (हिंदीत ज्याला दलिया म्हणतात), तांदूळ, श्यामा-तांदूळ (वरइ किंवा भगर), मका आणि समस्त प्रकारचे पीठ जसे तांदळाचे पीठ, चण्याचे पीठ (बेसन), उडदाच्या डाळीचे पीठ इत्यादी.

(5) अन्न-धान्यापासून बनवलेले तेल—मक्याचे तेल, मोहरीचे तेल, तिळाचे तेल, सोयाबीन तेल, आणि सामान्य वनस्पती तेल इत्यादी, आणि या तेलांमध्ये तळलेले पदार्थ, जसे शेंगदाणे, काजू, बटाट्याचे वेफर्स आणि इतर स्नॅक्स (फराळाचे पदार्थ).

(6) मका किंवा अन्नाचे माड आणि त्यांच्याद्वारे बनलेले किंवा त्यांच्याद्वारे मिश्रित वस्तू जसे-बेकिंग सोडा, बेकिंग पाउडर, कस्टर्ड पावडर, कस्टर्ड, केक, हलवा, क्रीम, मिठाई, साबूदाणा इत्यादी.

(7) मध.

## *एकादशी साठी अयोग्य मसाले*

हिंग, तीळ, जिरे, मेथी, मोहरी, चिंच, बडीशेप, वेलदोडा, कलौंजी (Black cumin, काळे जिरे, कृष्णजीरा), जायफळ, खसखस, ओवा, लवंग, इत्यादी

## *एकादशीचे पालन कसे करावे?*

एकादशीच्या आदल्या दिवशी, एकादशीच्या दिवशी आणि एकादशीच्या दुसऱ्या दिवशी मांस, मासळी, अंडे, कांदा, लसूण, गाजर, लाल मसूराची डाळ, हिरवी डाळ (Green Flat Lentils), मशरूम किंवा यांच्याद्वारे बनलेले उत्पादन खाऊ नये. तसेच या तीन दिवशी चहा, कॉफी, पान, गुटखा, जर्दा, विडी, सिगरेट, तंबाखूपासून बनलेले अन्य पदार्थ, सुपारी, दारू इत्यादी घेऊ नये. तसेच ब्रह्मचर्याचे पालन करावे. एकादशीच्या दिवशी स्त्रीसंग केल्यास क्षयरोग जडतो.

---

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥**

*(श्रीगीता १८/६५)*

भगवान म्हणाले, "तुम्ही तुमचे चित्त मला समर्पण करा, माझे नाम-रूप लीला इत्यादीचे श्रवण-कीर्तन इत्यादी परायण होऊन माझे भक्त बना, माझी पूजा करणारे बना आणि मला नमस्कार करा. अशा प्रकारे तुम्ही मला प्राप्त व्हाल. मी तुमच्यापाशी ही सत्य प्रतिज्ञा करतो, कारण तुम्ही मला प्रिय आहात."

# एकादशी व्रताचे पारणे करण्याचा नियम

जर एकादशी व्रताचे पालन निर्जल (पाणी सुद्धा न घेता) केले असेल तर, चरणामृताद्वारे पारणे करावे, जर फलाहार केला असेल तर अन्न–प्रसादाद्वारे पारणे करावे. वेळेवर पारणे केल्याने एकादशी व्रत संपूर्ण होते. महाद्वादशी उपस्थित झाल्यावर एकादशीच्या ऐवजी महाद्वादशी तिथीला व्रत–पालन करण्याचा नियम आहे. उपवासाच्या दुसऱ्या दिवशी वेळेवर पारणे करणे आवश्यक आहे. पारणे कधी करावे याचे विवरण गौडीय वेदांत प्रकाशनातर्फे प्रस्तुत वैष्णव व्रत व उत्सवांच्या सूचीमध्ये किंवा http://www.purebakti.com या संकेत स्थळावरून प्राप्त केले जाऊ शकते.

"गौर" शब्दाची व्युत्पत्ती—श्रीराधाभावित श्रीगोविंदांचा "गो" आणि श्रीगोविंदभावित श्रीराधेचा "रा" दोन्ही अक्षरे मिळून बनले "गौर". अथवा श्रीराधाकृष्ण प्रेमाधिक्याने एकरूप होऊन सर्वसाधारणांना हरिनामाख्य संगीत प्रदान ज्या रूपाने करतात त्यांचे नाव आहे "गौर" (ग+आ+अ+उ+र=गौर)—उक्तं चाभियुक्तैः—

**अकारो भगवान् विष्णुः आकारो राधिकावरा।**
**उकारः कामरूपोऽयं रेफस्तु दानमुच्यते॥**
**गकारो हरिनामाख्यं गीतमित्यर्थवाचकम्।**
**प्रेम्णा श्रीराधयाकृष्णः संगीतं हरिनामकम्॥**
**यस्मै कस्मै प्रराततीति स गौरो गदितो बुधैः॥**

*(परतत्वगौरे)*

सप्तम वैवस्वत मन्वंतराच्या अठ्ठाविसाव्या कलियुगाच्या प्रथम संध्येत आपल्या आह्लादिनी शक्तीशी एकता धारण करून अवतीर्ण होऊन आपल्या पार्षदांशी मिळून "हरे कृष्ण" इत्यादी आपल्या महामंत्राचा उपदेश सर्वसाधारणांसाठी करतात. सज्जनांनो! अकारण करुणावरुणालय श्रीमान महाप्रभू चैतन्यदेवांशिवाय हे कार्य आणखी कोणत्या अवतारात संघटित होते? म्हणून वेदात या श्रीचैतन्यदेवांच्या अवताराचेच वर्णन आहे.

*(अथर्ववेदपुरुषबोधिन्याम्)*

# भाताचे पातेले आणि आपले पोट



समजा आमच्याकडे एक पातेले आहे ज्यात आम्ही दररोज भात शिजवितो. जर आम्ही त्या पातेल्यात नेहेमी भात शिजवला आणि ते पातेले आतून तसेच बाहेरून कधीच घासले नाही, विसळले नाही आणि साफ केले नाही, तर काय होईल? काही दिवसांनी ते पातेले पूर्णपणे खराब होऊन जाईल आणि त्यात शिजविलेला भात आरोग्याला अपायकारक ठरेल. त्याचप्रमाणे आमचे पोट सुद्धा एका पातेल्यासारखेच आहे. जर आम्ही दररोज सकाळी नाश्ता, दुपारी व रात्री भोजन केले तर आमचे पोट सुद्धा आतून खराब होऊन जाईल. त्यामुळे महिन्यातून दोनदा दोन्ही एकादशींना पाणी सुद्धा न घेता, किंवा थोडे पाणी पिऊन अथवा केवळ फळे खाऊन राहायला हवे. एकादशीला उपवास किंवा लंघन केल्याने आमच्या पोटाचे पातेले साफ होऊन जाईल. तसेच आमचा पोटाच्या विकारांपासून बचाव होईल.

**अत्र ब्रह्मपुरं नाम पुण्डरीकं यदुच्यते।**
**तदेवाष्टदलं पद्मसन्निभं पुरमद्भुतम्॥**
**तन्मध्ये दहरं साक्षात् मायापुरमितीर्यते।**
**तत्र वेश्म भगवतश्चैतन्यस्य परात्मनः॥**
**तस्मिन् यस्त्वन्तराकाशो ह्यन्तर्द्वीपः स उच्यते॥**

*(छान्दोग्यपनिषदि)*

या शरीराच्या आतमध्ये ब्रह्मपुर नामक एक कमळ आहे. ते अद्भुत पुर अष्टदल (आठ पाकळयांच्या) कमळाच्या आकाराचे आहे. या कमळाच्या मध्यवर्ती ‘दहर’ नामक स्थानच मायापुरच्या नावाने प्रसिद्ध आहे. तेच मायापुर श्रीचैतन्यस्वरूप भगवान परमात्म्यांचे निवास स्थान आहे आणि त्याच्या मध्यस्थित आकाशच (अंतराकाशच) अंतर्द्वीप म्हणविले जाते.

# उपवासाच्या दिवशी साबुदाणा का खाऊ नये?



सामान्यपणे साबुदाण्याला शाकाहारी म्हटले जाते आणि व्रत उपवासात याचा बराच उपयोग केला जातो. परंतु काय तुम्हाला ठाऊक आहे की साबुदाणा शाकाहारी असूनही पवित्र आहे? तुम्ही त्याचे खरे रूप जाणता काय?

साबुदाणा (Tapioca) 'कसावा' वनस्पतीच्या गरापासून बनविला जातो, हे तर खरे आहे, परंतु साबुदाणा बनविण्याची कृती इतकी अपवित्र आहे की याला शाकाहारी व स्वास्थप्रद म्हटलेच जाऊ शकत नाही.

साबुदाणा बनविण्यासाठी सर्वात प्रथम कसावा वनस्पतीचा गर मोकळ्या मैदानात ठेवलेल्या मोठ्या कुंडांमध्ये टाकला जातो व रसायनाच्या मदतीने तो दीर्घकाळपर्यंत सडविला जातो. अशा तऱ्हेने सडविल्यावर तयार झालेला लगदा अनेक महिने मोकळया आकाशाखाली पडलेला असतो. रात्री कुंडांना उष्णता देण्यासाठी त्यांच्या अवतीभोवती मोठमोठे बल्ब लावले जातात. यामुळे बल्बच्या जवळ उडणारे लहान-मोठे विषारी किडेदेखील कुंडांमध्ये पडून मरतात.

या लगद्यात पाणी टाकले जाते, ज्यामुळे त्यात पांढऱ्या रंगाचे कोट्यवधी लांबट कृमी उत्पन्न होतात. यानंतर हा लगदा मजुरांच्या पायाखाली तुडविला जातो. या प्रक्रियेत त्यात पडलेले किडे-पतंग व पांढरे कृमीदेखील तुडविले जातात. ही क्रिया अनेकदा केली जाते. त्यानंतर यास यंत्रांमध्ये टाकले जाते आणि मोत्यासारखे चकाकणारे दाणे बनवून साबुदाण्याचे नाव-रूप दिले जाते. परंतु या चकाकीच्या मागे किती अपवित्रता लपली आहे, हे सर्वांना दिसून येत नाही.

साबुदाण्यातील आणखी एक मोठ्ठा दोष म्हणजे शिजविल्यावर तो अत्यंत चिकट होतो. शिजवून पोटात जाऊन खळ, चिकी किंवा

गोंद तयार होते. विश्वास बसत नाही ना? साबुदाण्याची खीर तयार करा आणि पातेल्याला ती कशी चिकटून रहाते हे बघा. पातेले धुताना मोलकरणीला खूपच त्रास होतो. असा साबुदाणा पोटात चिकटला की पोट साफ करताना काय होते ते वैद्यांना विचारा.

***विनोदः साबुदाणा खायचा असेल तर खावा. निदान वैद्यांचे तरी पोट भरेल. कारण अशा आरोग्यासंबंधी टिपा म्हणजे एकाअर्थी वैद्यांच्या पोटावर पाय देणेच होय.***

साबुदाणा बनविताना त्याच्यात मैद्याची भेसळ करण्यात येते. त्यामुळे साबुदाणा एकादशीला त्याज्य (वर्जनीय) आहे.



---

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु॥**

जसा आहार सुद्धा सर्वांना तीन प्रकारचा प्रिय असतो, तसेच यज्ञ, तपस्या आणि दान सुद्धा तीन प्रकारचे असतात. त्या सर्वांच्या या भेदास ऐका.

**आयुः सत्त्व बलारोग्य सुख प्रीति विवर्द्धनाः।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः॥**

आयुष्य, उत्साह, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति वाढवणारे रसयुक्त, स्निग्ध, स्थायी, हृदयग्राही आहारसमूह सात्त्विक प्रकृती असणाऱ्यांना प्रिय आहेत.

**कट्वम्ल लवणात्युष्ण तीक्ष्ण रुक्षविदाहिनः।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः॥**

अधिक कडू, आंबट, लवणयुक्त, गरम, तिखट, रुक्ष, दाहकारक, दुःख, शोक आणि रोगप्रद आहारसमूह राजस व्यक्तीला प्रिय आहेत.

**यातयामं गतरसं पूति पर्युषितञ्च यत्।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥**

एक प्रहर आधी बनवलेले थंड, नीरस, दुर्गंधीयुक्त, शिळे, उच्छिष्ट (उष्टे) आणि अपवित्र आहारसमूह तामस पुरुषाला प्रिय आहेत. *(श्रीमद्भगवदगीता १७/७-१०)*

# एकादशीच्या दिवशी अन्न-धान्ये व भगर (वरई अर्थात श्यामा तांदूळ) निषिद्ध





गर्विष्ठ आणि दिखाऊ (आभासी, छद्म) वैष्णव भगर (वरई किंवा श्यामा तांदूळ, Little Millet), सुजी (रवा), चणे इत्यादींना अन्न-धान्य न समजून त्यांचे एकादशीला सेवन करतात. अन्न म्हणजे 'अत्तुं योग्यं अन्नम्'. या व्याख्येच्या अंतर्गत सगळया धान्यांचा समावेश होतो. खरे म्हटले तर भगवान हरींच्या दिवशी (एकादशीच्या दिवशी) अन्न-धान्य असलेले कोणतेही पदार्थ स्वीकारण्याजोगे नाहीत. फळे, मुळे, पाणी आणि दूध रूपी अनुकल्पाने उपवास मोडत नाही. जर कोणी पूर्ण उपाशी (उपवासी) राहण्यास असमर्थ असल्यास अनुकल्प स्वीकारण्याची व्यवस्था आहे. या संबंधात पद्म-पुराणात शंकर आणि पार्वती यांच्या दरम्यान झालेला संवाद आढळतो—

**अन्नन्तु धान्य-संभूतं गिरिजे यदि जायते।**<br>
**धान्यानि विविधानीह जगत्यां श्रुणु यत्नतः॥**<br>
**श्याम-मास-मसूराश्च धान्य-कोद्रव-सर्षपाः।**<br>
**यव-गोधूम-मुद्गाश्च तिल-कंगु-कोलथकाः॥**<br>
**गवेधुकाश्च निवारा आतकश्च कलायकाः।**<br>
**माण्डुको वज्रको रंक कीचको बडकस्तथा।**<br>
**तिलकश्चणकाद्यश्च धान्यानि कथितानीह॥**

"हे गिरिजे (हिमालय पर्वताची कन्या), धान्यापासून उत्पन्न झालेले पदार्थ अन्न म्हणून ओळखले जातात. या जगात अनेक प्रकारचे धान्य आहेत. त्यांची यादी मी तुला सांगतो. ध्यानपूर्वक ऐक —श्यामा तांदूळ (भगर अर्थात वरई), मसूर डाळ, धान्य, कोद्रव

(कोद-धान, एक प्रकारचे धान्य जे गोरगरीबांचे खाद्य आहे), तीळ, पंगू, कुलथ, गवेधुक (तृण-धान्य), आतक, मटार, मंडुक, बाजरी, रल्क, कीचक (बास-धान्य), बरवटी, तिलक (होम धान्य), चणे इत्यादी. 'इत्यादी' शब्दाद्वारे ज्वारी आणि मका यांचा बोध होतो. म्हणून श्यामा-तांदूळ, गव्हाचे पीठ, चणे इत्यादी पदार्थ अन्नात मोडतात आणि एकादशीला खाण्यास अयोग्य आहेत."

**इत्थं नृतिर्यगृषिदेवझषावतारैर्लोकान्**
**विभावयसि हन्सि जगत्प्रतीपान्।**
**धर्म महापुरुष पासि युगानुवृत्तं**
**छन्नः कलौ यदभवस्त्रियुगोऽथ स त्वम्॥**

*(श्रीमद्भागवते ७/९/३८)*

भक्तवर्य प्रल्हाद श्रीनृसिंहदेवांची स्तुती करताना म्हणतात- "हे पुरूषोत्तम! अशा प्रकारे आपण मनुष्य, पशू, पक्षी, ऋषी, देवता आणि मत्स्यादि अवतार घेऊन लोकांचे पालन तथा विश्व-द्रोहींचा संहार करता. या अवतारांद्वारे आपण प्रत्येक युगात युगानुरूप धर्माचे रक्षण करता, परंतु कलियुगात तर आपण लपून गुप्त-रूपाने अवतार धारण करता. म्हणून आपले एक नाम "त्रियुग" देखील आहे. येथे गुप्तावताराने श्रीकृष्ण चैतन्यावताराचा बोध पारिशेष्य न्यायाने होतो."

**आसन् वर्णास्त्रयो ह्यस्य गृह्णतोऽनुयुगं तनूः।**
**शुक्लो रक्तस्तथा पीत इदानीं कृष्णतां गतः॥**

*(श्रीमद्भागवते १०/८/१३)*

श्रीकृष्णचंद्रांच्या नामकरणाच्या वेळी श्रीनंद महाराजांना श्रीगर्गाचार्य म्हणाले--"हा तुमचा सावळा पुत्र प्रत्येक युगात श्रीविग्रह धारण करतो. सत्ययुगात याचा वर्ण श्वेत (पांढरा) होता, त्रेतायुगामध्ये रक्तवर्ण (लाल रंग) होता, कलियुगात पीतवर्ण (पिवळा वर्ण) होता आणि आता द्वापरयुगात श्यामवर्ण (काळा रंग ) आहे. म्हणून याचे नाव 'कृष्ण' होईल. या श्लोकात 'पीत' शब्द पारिशेष्य प्रमाणाने कलिपावनावतार श्रीगौरांग महाप्रभूंचाच बोधक आहे."

# द्वादशीला तुळशीची पाने तोडणे निषिद्ध



**न छिन्द्यात् तुलसीं विप्र द्वादश्यां वैष्णवः क्वचित्।**

*(हरिभक्तिविलास, ७/३५४, विष्णु–धर्मोत्तर पुराण)*

हे ब्राह्मणानों, एक वैष्णव द्वादशीच्या दिवशी कधीही तुळशीची पाने तोडू नयेत.

**भानुवारं विना दुर्वां तुलसीं द्वादशीं विना।**
**जिवितस्य अविनाशाय न विचिन्वित धर्मवित्॥**

*(हरिभक्तिविलास, ७/३५५, गरुड–पुराण)*

शास्त्राचे उत्तम अध्ययन केलेली व्यक्ती जर आपले आयुष्य कमी करू इच्छित नसेल तर तिने रविवारच्या दिवशी दुर्वादळे आणि द्वादशीच्या दिवशी तुळशीची पाने तोडू नयेत.

**द्वादश्यां तुलसी पत्रं धात्री पत्रश्च कार्त्तिके।**
**लुनति स नरो गच्छेत् निरयं अति गर्हितम्॥**

*(हरिभक्तिविलास ७/३५६, पद्म–पुराण, भगवान श्रीकृष्ण आणि सत्यभामा यांच्या दरम्यान झालेला संवाद)*

जर कोणी मनुष्य द्वादशीच्या दिवशी तुळशीची पाने तोडतो किंवा कार्तिक महिन्यात आवळयाच्या झाडांची पाने तोडतो तर त्यास अत्यंत गर्हित (घृणास्पद) नरक–लोकाची प्राप्ती होऊन दुःखाचा अनुभव करावा लागतो.

***जसा आहार तसाच विचार।***
***जसे अन्न तसेच मन।***
***जसे पाणी तशीच वाणी।***

**भोजन करताना प्रत्येक घासासोबत आणि पाणी पिताना प्रत्येक घोटासोबत ४ किंवा ८ वेळा “हरे कृष्ण" महामंत्राचे मनातल्या मनात उच्चारण करावे.**

# एकादशीचे महत्त्व विशद करणारी शास्त्र-वाक्ये

१. मनात भौतिक इच्छा बाळगणाऱ्या लोकांनी मोक्ष प्राप्त करण्यासाठी किंवा आपल्या उद्देश्य-पूर्तीसाठी प्रत्येक एकादशीला उपवास ठेवावा. परंतु एकादशीचा खरा उद्देश्य आहे भगवंतांना आनंद प्रदान करणे.

२. शुक्ल पक्ष असो किंवा कृष्ण पक्ष, भरणी नक्षत्र असो किंवा इतर कोणतेही कारण असो, भगवान श्रीहरींचे प्रेम आणि त्यांच्या धामाची प्राप्ती करण्यासाठी प्रत्येकाने एकादशीला उपवास अवश्य करावा.

३. काशी, गया, गंगा, नर्मदा, गोदावरी आणि कुरुक्षेत्र—या पैकी कोणतेही तीर्थ एकादशीची बरोबरी करू शकत नाही.

४. हजारो अश्वमेध यज्ञ करून किंवा शेकडो वाजपेय यज्ञ करून जे पुण्य प्राप्त होते, त्या पुण्याची तुलना एकादशीच्या उपवासाद्वारे प्राप्त होणाऱ्या पुण्याच्या सोळाव्या भागाशीसुद्धा होऊ शकत नाही.

५. या पृथ्वीवर भगवान पद्मनाभांच्या दिवसासारखा (एकादशीसारखा) शुद्धीकरण करणारा आणि पाप दूर करू शकणारा इतर कोणताही दिवस नसतो.

६. हे प्रभू! अकरा इंद्रियांद्वारे (डोळे, कान, नाक, जीभ आणि त्वचा ही पाच ज्ञानेंद्रिये; बोलणारे तोंड, हात, पाय, गुदद्वार आणि जननेंद्रिय ही पाच कर्मेंद्रिये आणि मन यांच्याद्वारे) केलेली सर्व पापे प्रत्येक पक्षातील अकराव्या दिवशी (एकादशीला) उपवास केल्याने नष्ट होतात.

७. हे राजा! स्वतःचे पाप नष्ट करण्यासाठी एकादशी सारखा प्रभावी उपाय दुसरा कोणताही नाही. जरी कोणी व्यक्ती फक्त दिखाव्यासाठी एकादशी करते, तरी त्या व्यक्तीला मृत्यूनंतर यमाचे दर्शन होत नाही.

८. भगवान श्रीकृष्णांचे अवतार महर्षी वेदव्यास म्हणाले—"माझ्या दिवशी (एकादशीला) जर कोणी व्यक्ती मला थोडे देखील अन्न अर्पण करेल, तर ती नरकात जाईल, मग कोणी व्यक्ती स्वतः अन्न खाईल तर तिची काय गती होईल, हे सांगायची गरज नाही."

९. स्वमातृगमन, गोमांस खाणे, ब्राह्मणाला मारणे आणि दारू पिणे ही सर्व पापे एकादशीला अन्न खाण्याच्या पापांपेक्षा क्षुद्र आहेत.

१०. जे मनुष्य एकादशीच्या पवित्र दिवशी अन्न खातात ते सर्व मनुष्यांमध्ये हीन आहेत. जर कोणी अशा मनुष्यांचा अशुभ चेहेरा पाहतो, तेव्हा त्याने सूर्याकडे बघून स्वतःला पवित्र करून घ्यावे.

११. एकादशीच्या दिवशी (श्रीहरींच्या दिनी) या पृथ्वीवरील सर्व मोठी पापे जशी ब्रह्महत्या (ब्राह्मणाला मारण्याचे पाप) अन्नात आश्रय घेतात आणि तेथे राहतात.

१२. जर स्वतःचे वडील, मुलगा, पत्नी किंवा मित्र जरी भगवान पद्मनाभांच्या दिवशी अन्न खातील तरीदेखील त्यांची गणना मोठ्या पापी व्यक्तींमध्ये होईल.

१३. दशमीच्या दिवशी एकदाच जेवावे. एकादशीच्या दिवशी पूर्ण उपवास ठेवावा. तसेच एकादशीच्या दिवशी लग्न (विवाह), श्राद्ध, तिलोदक, पिंड-प्रदान किंवा जल-तर्पण ही कार्ये करू नयेत.

१४. कोणत्याही महिलेने मासिक पाळी असली तरी (रजस्वला अवस्था असली तरी) एकादशीच्या दिवशी अन्न खाऊ नये.

१५. विधवा स्त्रीने एकादशीच्या दिवशी अन्न खाल्ल्यास ती सर्व पुण्यांनी रहित होते आणि दररोज एक गर्भपात करण्याचे पाप तिला लागते.

गौड (बंगाल) प्रदेशात यवन शासनाच्या संकीर्तन-सम्बन्धी निषेध आज्ञेने सर्वत्रच भीषण दहशत पसरली होती. भक्तजनदेखील मनातल्या मनात भयभीत होत होते. श्रीशचीनंदन गौरहरी भक्तजनांच्या मनोभावनेला समजून गेले. कुठे श्रीमद्भागवताची कथा होत होती—श्रीवराह अवताराचा प्रसंग चालू होता. त्या प्रसंगाला ऐकून श्रीगौरसुंदर श्रीवराहावेशात गर्जन करीत परम भक्त श्रीमुरारी गुप्तांच्या घरी आले आणि तेथे त्यांनी चतुर्भुज वराहमूर्ती प्रकट करून भक्तांना निर्भय होऊन संकीर्तन करण्याचा आदेश दिला. मुरारी गुप्तांनी त्यांचे पूजन आणि स्तवन करून त्यांना प्रसन्न केले. त्या दिवशी पासून भक्तजन निर्भय होऊन सर्वत्र जोर-जोराने हरिनाम-संकीर्तन करू लागले.

# उपवासाचे फायदे

अन्नातही एक प्रकारची नशा असते. भोजन केल्यानंतर आळसाच्या रूपात या नशेचा बहुधा सर्व लोक लगेचच अनुभव करतात. शिजलेल्या अन्नाच्या नशेत एक प्रकारची पार्थिव शक्ती सामावलेली असते, जी पार्थिव शरीराच्या संयोगाने दुप्पट होते. या शक्तीला शास्त्रकारांनी 'आधिभौतिक शक्ती' म्हटले आहे.

या शक्तीच्या प्राबल्यामुळे ती 'आध्यात्मिक शक्ती' जी आपण पूजा-उपासनेच्या माध्यमातून एकत्रित करू पाहतो, ती नष्ट होऊन जाते, म्हणून भारतीय महर्षींनी संपूर्ण आध्यात्मिक अनुष्ठानांमध्ये उपवासाला प्रथम स्थान दिले आहे.

**"विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः"**

गीतेनुसार एकादशीचा उपवास हे विषय-वासनेच्या निवृत्तीचे अचूक साधन आहे. ज्याचे पोट रिकामे असते त्याला व्यर्थ 'भटकंती' सुचत नाही. म्हणून शरीर, इंद्रिये आणि मनावर विजय मिळविण्यासाठी 'जितासन' आणि 'जिताहार' होण्याची परम आवश्यकता आहे.

आयुर्वेद व आजचे विज्ञान दोहोंचा एकच निष्कर्ष आहे की हरिवासर व्रत व एकादशी उपवासाद्वारे ज्याप्रमाणे अनेक शारिरीक व्याधी समूळ नष्ट होतात, अगदी त्याचप्रमाणे मानसिक व्याधींच्या प्रशमनाचाही हा एक अचूक उपाय आहे. यामुळे जठराग्नी प्रदीप्त होऊन शरीरशुद्धी होते.

फलाहाराचे तात्पर्य असे आहे की त्या दिवशी आहारात केवळ थोड्या-फार फळांचे सेवन करावयाचे आहे, परंतु आज याचा अर्थ बदलून फलाहाराचा अपभ्रंश होऊन फराळ बनला आहे आणि या फराळाच्या नावाखाली लोक ठासून साबुदाण्याची खिचडी अथवा भोजनापेक्षा पचण्यास जड, गरिष्ठ, स्निग्ध, तळलेले व मिरची-मसालेयुक्त आहार सेवन करू लागले आहेत. त्यांना विनंती आहे की त्यांनी फक्त पाणी पिऊन किंवा थोडी फळे खाऊन एकादशीचा उपवास करावा. अन्यथा 'उपवास' या पवित्र शब्दाचा तर अपमान होतोच, त्याचबरोबर शरीराचे जास्तच नुकसान होते. त्यांच्या या अविवेकी कृत्यामुळे त्यांना लाभ होण्याऐवजी हानीच होते.

पंधरवड्यातून एक दिवस तरी एकादशीला उपवास केला पाहिजे. याने आमाशय, यकृत व पचनतंत्राला आराम मिळतो व त्यांची आपोआप शुद्धी होते. या प्रक्रियेद्वारे पचनतंत्र मजबूत होते व मनुष्याच्या शक्तीबरोबरच त्याचे आयुष्यही वाढते.

भारतीय जीवनचर्येत एकादशी व्रत, जन्माष्टमी, रामनवमी, गौर-पूर्णिमा, नरसिंह चतुर्दशी, नित्यानंद त्रयोदशी, अद्वैत सप्तमी, बलदेव पूर्णिमा, महाशिवरात्री इत्यादी व्रत-उपवासांना विशेष महत्त्व आहे. त्यांचे आचरण धार्मिक दृष्टिकोणातून केले जाते, परंतु व्रतोपवास केल्याने शरीरही स्वस्थ राहाते.

'उप' म्हणजे जवळ आणि 'वास' म्हणजे राहाणे. उपवासाचा खरा अर्थ आहे—भगवंतांच्या जवळ राहाणे, उपवासाचा व्यावहारिक अर्थ आहे—निराहार राहाणे. निराहार राहिल्यास भगवद्भजन व आत्मचिंतनास मदत मिळते. वृत्ती अंतर्मुख होऊ लागते. उपवास पुण्यदायक, आमदोषहारक, अग्निप्रदीपक, स्फूर्तिदायक व इंद्रियांना प्रसन्नता देणारा मानला गेला आहे. म्हणून यथाकाल, यथाविधी एकादशीचा उपवास करून धर्म आणि स्वास्थ्यलाभ मिळविला पाहिजे.

**आहारं पचति शिखी दोषान् आहारवर्जितः।**

अर्थात पोटातील अग्नी आहाराला पचवितो व उपवास दोषांना पचवितो. उपवासाने पचनशक्ती वाढते. उपवासकाळात शरीरात नवा मल उत्पन्न होत नाही व जीवनशक्तीला जुना संचित मल बाहेर काढण्यास वाव मिळतो. मल-मूत्र-विसर्जन सुरळीत होऊ लागते. शरीरात हलकेपणा येतो व अतिनिद्रा-तंद्रेचा नाश होतो.

एकादशीच्या महतीमुळे भारतवर्षातील सनातन धर्मावलंबी बहुधा एकादशी, कृष्ण-जन्माष्टमी, रामनवमी, गौर-पूर्णिमा, नरसिंह-चतुर्दशी, नित्यानन्द-त्रयोदशी, अद्वैत-सप्तमी, बलदेव-पूर्णिमा, महाशिवरात्री इत्यादी उत्सवांनिमित्त उपवास करतात, कारण त्या दिवसांत प्राणांचे ऊर्ध्वगमन होते व जठराग्नी मंद असतो. शरीर शोधनासाठी एकादशी तिथी अधिक महत्त्वपूर्ण आहे.

हे अनुभवावरून सिद्ध झाले आहे की एकादशी ते पौर्णिमा व एकादशी ते अमावस्येपर्यंतचा काळ रोगाच्या उग्रतेस अधिक सहाय्यक असतो, कारण सूर्य व चंद्राच्या परिभ्रमणामुळे समुद्रात वरील तिथींच्या दिवशी विशेष उतार-चढाव होतो. त्याचप्रकारे वरील क्रियेमुळे आपल्या शरीरात रोगांची वाढ होते, म्हणून एकादशीच्या दिवशी उपवासाचे विशेष महत्त्व आहे.

## *शारिरीक विकार*

अजीर्ण, उलटी, मंदाग्नी, शरीर जड वाटणे, डोकेदुखी, ताप, यकृताचे विकार, दमा, लठ्ठपणा, संधिवात, संपूर्ण शरीरात सूज, खोकला, जुलाब, मलावरोध, पोटदुखी, तोंड येणे, त्वचारोग,

मूत्राशयाचे रोग, पक्षाघात इत्यादी व्याधींमध्ये एकादशी उपवास खूपच फायदेशीर आणि अत्यावश्यक आहे.

## *मानसिक विकार*

मनावरही उपवासाचा अत्यंत प्रभाव पडतो. उपवासाने चित्तवृत्ती स्थिर होतात व मनुष्य जेव्हा आपल्या चित्तवृत्तींना नियंत्रित करू लागतो तेव्हा शरीर असूनसुद्धा सुख-दुःख, हर्ष-विषाद होत नाहीत. उपवासाने सात्त्विक भाव वाढतो, राजस व तामस भावनांचा नाश होऊ लागतो, मनोबल व आत्मबलाची वृद्धी होऊ लागते, म्हणून अतिनिद्रा, तंद्रा, उन्माद (वेडेपणा), अस्वस्थता, जीव गुदमरणे, भयभीत किंवा शोकातूर राहणे, मनाची दीनता, अप्रसन्नता, दुःख, क्रोध, शोक, ईर्ष्या इत्यादी मानसिक रोगांवरील औषधोपचार असफल झाल्यास एकादशी उपवास विशेष लाभदायक ठरतो, एवढेच नव्हे तर नियमित एकादशी उपवासाद्वारे मानसिक विकारांची उत्पत्तीही नियंत्रित केली जाऊ शकते.

## *उपवासाची पद्धत*

एकादशी उपवासाच्या दिवशी पूर्ण विश्रांती घेतली पाहिजे आणि रात्रंदिवस "हरे कृष्ण" महामंत्राचा जप करायला पाहिजे. मौन राहून फक्त हरिनामाचा जप केला तर फारच उत्तम. उपवास करणे आरंभ केल्यावर पहिल्या एक-दोन एकादशीचे उपवास जड जातील. त्यानंतर मन व शरीर दोघांनाही एकादशीच्या उपवासाची सवय होऊ लागते आणि त्यात आनंद येऊ लागतो.

प्रामुख्याने चार प्रकारचे उपवास प्रचलित आहेत—निराहार, फलाहार, दुग्धाहार व रूढीगत अनुकल्प.

१. निराहार—निराहार एकादशी व्रत श्रेष्ठ आहे. ते दोन प्रकारचे असते—निर्जल व सजल. निर्जल व्रतात पाणीदेखील प्यायचे नसते. सजल व्रतात कोमट पाणी किंवा कोमट पाण्यात लिंबाचा रस मिसळून घेऊ शकता. त्यामुळे पोटात वायू बनत नाही. शरीरात कुठेही वेदना होत असल्यास लिंबाचे सेवन करू नये.

२. फलाहार—यात फक्त फळे व फळांचा रस घेतला जातो. उपवासासाठी द्राक्षे, डाळिंबे व पपया हितकर आहेत. परंतु सफरचंदे टिकवण्याची पद्धत चुकीची असल्याने ते एकादशीच्या उपवासात घेऊ नयेत. याचबरोबर कोमट पाण्यात लिंबाचा रस मिसळून घेऊ शकता. लिंबामुळे पाचनतंत्राच्या शुद्धीस मदत मिळते.

३. दुग्धाहार—अशा उपवासात दिवसातून एकदा किंवा दोनदा

थोडे सायरहित दूध घेतले जाते. देशी गाईचे दूध उत्तम आहार आहे. मनुष्यास स्वस्थ व दीर्घायुषी बनविणाऱ्या गाईच्या दुधासारखा श्रेष्ठ दुसरा कोणताही आहार नाही आहे.

देशी गाईचे दूध जीर्णज्वर, ग्रहणी, पांडुरोग, यकृताचे रोग, प्लीहेचे रोग, दाह, हृदयरोग, रक्तपित्त इत्यादीमध्ये श्रेष्ठ आहे.

४. रूढीगत अनुकल्प—चोवीस तासात एकदा अळणी, साखर, तेल-तूप विरहित थोडे उकडलेले बटाटे, रताळी, शेंगदाणे इत्यादी घेऊ शकता. याच्याशिवाय कोणत्याही पदार्थाचे सेवन करू नये. फक्त पाणी किंवा कोमट पाण्यात लिंबाचा रस मिसळून घेऊ शकता.

## *दक्षता*

ज्या लोकांना नेहमी कफ, सर्दी-पडसे, दमा, सूज, सांधेदुखी किंवा कमी रक्तदाब (Low Blood Pressure) राहतो त्यांनी लिंबाचे सेवन करू नये.

उपवासाच्या दुसऱ्या दिवशी उपवास सोडल्यावर मुगाचे पाणी प्यायला पाहिजे, तसेच उकडलेले मूग, खिचडी, भात यासारखे पचण्यास हलके अन्न खायला पाहिजे.

**अनर्पितचरीं चिरात् करुणयावतीर्णः कलौ**
**समर्पयितुमुन्नतोज्ज्वलरसां स्वभक्तिश्रियम्।**
**हरिः पुरटसुन्दरद्युतिकदम्बसन्दीपितः**
**सदा हृदयकन्दरे स्फुरतु वः शचीनन्दनः॥**

*(श्रीरूप गोस्वामी-कृत विग्धमाधवे)*

सुवर्णकान्तिसमूहाद्वारे देदीप्यमान श्रीशचीनंदन गौरहरी तुमच्या हृदयात स्फूर्ती प्राप्त करोत. त्यांनी ज्या सर्वोत्कृष्ट उज्ज्वल रसाचे दान जगाला चिरकाल पर्यंत दिले नव्हते, त्याच स्वभक्ति-संपत्तीचे दान करण्यासाठी ते कलियुगात अवतीर्ण झाले आहेत.

वेदान्तवेद्य, सर्वान्तरात्मा, पुराणपुरुष, विश्वाचे आदिकारण जे पुरूषोत्तम भगवान आहेत, त्यांना श्रीचैतन्य महाप्रभू रूपात जाणूनच जीव मृत्यूपासून सुटकारा प्राप्त करतो. त्यांना ओळखल्या शिवाय आपल्या इष्टाजवळ जाण्याचा आणखी कोणताही मार्ग नाही आहे, अर्थात श्रीकृष्ण आणि श्रीकृष्णचैतन्यदेवात किंचितही भेद नाही आहे.

# श्रीनामदेव महाराजांच्या एकादशी निष्ठेची श्रीभगवंतांद्वारे परीक्षा

**(श्रीभक्तमाल द्वितीय खंड छ. ४३ क. १४२ पृष्ठ संख्या २३६)**



संत श्रीनामदेव महाराज महाराष्ट्रातील एक महान वारकरी संतकवी होते. ते मराठी भाषेमधील सर्वाधिक जुन्या काळातील कवींपैकी एक होते. त्यांनी पंजाबी व व्रज भाषांमध्येही काव्ये रचली. शिखांच्या गुरू ग्रंथसाहिबात त्यांच्या बासष्ट काव्यरचना समाविष्ट आहेत.

**कियौ रूप ब्राह्मण को दूबरो निपट**
**अंग भयो हियै रंग व्रत परिचैको लिजिये।**
**भई एकादशी अन्न मांगत बहुत भूखो**
**आजुतौ न दैहौं भोर चाहौ जितौ दिजिये॥**
**कर्‍यो हठभारी मिलि दौऊ ताको शोर**
**पर्‍यो समझावै नामदेव याको कहा खीझिये।**
**बीते जाम चारि मरि रहे यों पसारिपांव**
**भाव पै न जानै दई हत्या नही छिजिये॥१४२॥**

## *भावार्थ*

एकदा भगवंतांच्या मनात ही इच्छा जागली की श्रीनामदेवांच्या एकादशी व्रत-निष्ठेचा परिचय प्राप्त करावा. हा विचार करून त्यांनी एका अत्यंत दुर्बळ ब्राह्मणाचे रूप धारण केले. एकादशी व्रताच्या दिवशी श्रीनामदेवांच्या जवळ पोहोचून मोठी दीनता प्रदर्शित करून ते अन्न मागू लागले—"मी खूप भुकेलेला आहे, कितीतरी दिवसांपासून भोजन प्राप्त झाले नाही, काही अन्न द्या."

श्रीनामदेव म्हणाले—"आज तर एकादशी आहे, म्हणून अन्न देणार नाही. प्रातःकाळी जितकी इच्छा असेल तितके अन्न घ्या."

दोघेही आपापल्या गोष्टीवर मोठा हट्ट करून बसले. या गोष्टीचा गवगवा चारी दिशांना पसरला. लोक एकत्र झाले. श्रीनामदेवांना समजावू लागले—"या भुकेल्या ब्राह्मणावर क्रोध का करावा, तुम्ही नमते घ्या, यांना काही अन्न देऊन टाका."

श्रीनामदेवांनी मानले नाही, दिवसाचा चौथा प्रहर संपल्यावर त्या

भुकेल्या ब्राह्मणदेवांनी अशा प्रकारे पाय पसरवले की जणू ते गतप्राण झाले आहेत. गावातले लोक श्रीनामदेवांच्या भावनेला समजत नव्हते, म्हणून त्या लोकांनी श्रीनामदेवांच्या डोक्यावर ब्राह्मण-हत्येचे खापर फोडले आणि त्यांना समाजातून बहिष्कृत केले. परंतु नामदेव अजिबात चिंताग्रस्त झाले नाहीत ॥१४२॥

## *व्याख्या*

वृद्ध ब्राह्मण रूपधारी भगवान गावातील लोकांना विचारत फिरू लागले—"अरे भाऊ! येथे कोणी 'नामा' नावाचे भगत (भक्त) आहेत? ऐकले आहे की ते भुकेलेल्या आणि दुःखी साधू व ब्राह्मणांची खूप सेवा करतात."

लोकांनी श्रीनामदेवांचे घर दाखविले.

हे तेथे पोहोचून ओरडू लागले—"मी खूपच भुकेला (क्षुधित) आहे, मला काही अन्नाची भिक्षा मिळायला हवी."

श्रीनामदेव म्हणाले—"आज तर आम्हा सगळयांचे व्रत आहे. आपण यावे आणि काही फलाहार ग्रहण करावा."

ब्राह्मण उत्तरले—"आज व्रत आहे तर तुम्ही फलाहार करा, वाटले तर निराहार करा, आम्हाला तर तुम्ही अन्नाची भिक्षा द्या."

श्रीनामदेवांनी हात जोडून म्हटले—"महाराज! आपण कृपया दूध प्राशन करा."

ब्राह्मण—"दूध शरीरात वायूचा विकार उत्पन्न करते. दूध गरिष्ठ (दुष्पाच्य, पचायला जड) असते."

नामदेव—"तर दही प्या."

ब्राह्मण—"याने तर सर्दी-खोकला होतो."

नामदेव—"परंतु आज अन्न मिळणार नाही. एकादशीच्या दिवशी अन्न देणे आणि घेणे दोन्ही पाप आहे."

हे ऐकून ब्राह्मण-देवता रागावले आणि म्हणाले—"मी तुमच्याकडे उपदेश ऐकण्यासाठी थोडीच आलो आहे. मलातर काहीही करून दोन मूठ अन्नच द्या."

नामदेव—"आज तर मी अन्न देऊ शकत नाही."

ब्राह्मण—"तर मी देखील आज तुमच्याकडून अन्नाची भिक्षा घेऊनच जाईन."

अशा प्रकारे दोघेही आपापल्या गोष्टीवर अडून राहिले. हळूहळू गावातील लोक एकत्रित झाले. लोक ब्राह्मण-देवतेला समजावू लागले, "जर नामदेव महाराज अन्नधान्य देत नसतील तर चला

आमच्या घरी. आमच्याकडून मनाला येईल त्या अन्नाची भिक्षा घ्या. सोडा यांचा पिच्छा. पाहिली यांची साधू व ब्राह्मणांच्या प्रती असलेली निष्ठा आणि अतिथी-अभ्यागत सेवा. केवळ ढोंग मात्र करतात."

ब्राह्मण—"भाऊ! जर मी खरा ब्राह्मण असेन तर घेईन तर यांच्याच कडून, नाही तर यांच्या द्वारावर प्राण देईन."

हे ऐकून लोक नामदेव महाराजांना समजावू लागले, "भाऊसाहेब! का डोक्यावर ब्रह्महत्या घेत आहात? ब्राह्मण भुकेले आहे, हट्ट करीत आहेत, देवून टाका दोन-दोन मुष्टी अन्न, याने तुमचे काय बिघडेल."

श्रीनामदेव म्हणाले—"जर मी देखील पक्का भक्त आहे, तर हे भले मरून जावोत, परंतु आज हरिवासराच्या (एकादशीच्या) दिवशी मी यांना अन्न देणार नाही." लोकांचा नाईलाज झाला आणि आपापल्या घरी परतले. ब्राह्मण-देवता मृतवत पडले.

**रचिकै चिताकौं विप्र गोद लेकैं बैठें जाई**
**दियो मुसुकाई मैं परीक्षा लीनी तेरी है।**
**देखि सो सचाई सुखदाई मन भाई मेरे भए**
**अन्तर्धान परे पाँय प्रीति हेरी है॥**

## *भावार्थ*

(आपल्या नियमानुसार रात्रभर जागरण आणि हरिनामाचे कीर्तन करीत श्रीनामदेवांनी रात्र घालवली, प्रातःकाळी) चिता रचून त्या ब्राह्मणाच्या मृत शरीराला मांडीवर घेऊन तिच्यावर बसले. त्यांनी मनोमन निश्चय केला—"ब्राह्मणाची हत्या करणाऱ्या या शरीराला जिवंत न ठेवून प्रायश्चित्त स्वरूप त्याला भस्म करणेच उत्तम आहे." (श्रीनामदेवांनी चितेला अग्नी लावली.)

त्याच वेळी भगवान प्रकट झाले आणि हसून म्हणू लागले —"मी तर तुमची परीक्षा घेतली होती. तुमच्या एकादशी व्रताच्या प्रती असलेल्या खऱ्याखुऱ्या निष्ठेचा मी प्रत्यक्ष अनुभव घेतला. ती खंबीर निष्ठा माझ्या मनाला फारच चांगली वाटली आणि मला खूपच सुख प्राप्त झाले."

अशा प्रकारे दर्शन देऊन भगवान अंतर्धान झाले. लोकांनी जेव्हा ही लीला पाहिली तर श्रीनामदेवांच्या चरणी येऊन पडले आणि प्रीतिमय चरित्र पाहून सर्वच गावकरी भगवंतांचे भक्त झाले.

## *तात्पर्य*

शुद्धा एकादशीला कोणालाही अन्न किंवा पैशाचे दान करू नये, अन्यथा याचक त्या पैश्याचा दुरुपयोग करित शुद्धा एकादशीलाच त्या दक्षिणेतून अन्न किंवा बिस्कीटे विकत घेऊन खातील आणि त्याचे पाप दात्याला लागेल, म्हणून जे सत्पात्र दान करायचे असेल ते द्वादशीलाच (उपवासाच्या दुसऱ्या दिवशी) करावे, शुद्धा एकादशीला कधीही नाही.

**इतोऽहं कृतसंन्यासोऽवतरिष्यामि सगुणो निर्वेदो निष्कामो भूगीर्वाणस्तीरस्थोऽलकनन्दायाः कलौ चतुःसहस्राब्दोपरि पंचसहस्राभ्यन्तरे गौरवर्णो दीर्घाङ्गः सर्वलक्ष्णयुक्त ईश्वरप्रार्थितो निजरसास्वादो भक्तरूपो मिश्राख्यो विदितयोगः स्याम्**।

*(अथर्वणस्य तृतीयकाण्डे ब्रह्मविभागानन्तरम्)*

भावार्थ हा आहे की देवतांद्वारे अवतारासाठी प्रार्थना केल्या गेल्यावर भगवान श्रीकृष्ण उत्तर देताना म्हणाले —कलियुगाची चार हजार वर्षे व्यतीत झाल्यावर आणि पाच हजार वर्षे पूर्ण होण्याच्या आधीच मी गंगेच्या किनाऱ्यावर ईश्वरांच्या (शंकरांच्या) अर्थात शंकरावतार श्रीअद्वैताचार्यांच्या विशिष्ट प्रार्थनेने द्रवीभूत होऊन—संन्यासरूप ग्रहण करून या गोलोकातून सगुण, निर्वेद (वैराग्य), निष्काम ब्राह्मणाच्या रूपात अवतीर्ण होईन. या वेळी माझा वर्ण गौर असेल. नेत्र, भुजा (बाहू किंवा हात) आदी अंगे लंबायमान असतील. सामुद्रिकोक्त महापुरुषांच्या लक्षणांनी युक्त निजरसास्वादाचे स्वयं रसास्वादन करणाऱ्या भक्ताकाराच्या मिश्रोपाधीने भूषित ज्ञात होईन. तात्पर्य—अधिकारीजन मला ओळखतील.

**विश्वंभर विश्वेन मां पाहि स्वाहा॥**

*(अथर्ववेदे)*

प्रेमाचे दान करून त्रिभुवनाला धारण आणि पोषण करणाऱ्या परमात्मा विश्वंभरांच्या श्रीचरणी आत्मसमर्पण करतो आहे. ते माझे विश्वापासून रक्षण करोत.

**ज्योतिरिवाऽधूमकः।**

*(कठोपनिषदि २/१/१३)*

धूर नसलेल्या अग्नीच्या समान प्रकाशमान श्री चैतन्य महाप्रभूंचे रूप आहे.

# कूर्म अवतार



भगवान विष्णूंच्या दहा अवतारांमध्ये कूर्म अवतार हा दुसरा अवतार आहे. कूर्म अवताराची कथा अशा प्रकारे आहे. ब्रह्मदेवांनी भृगू, मरीची, अत्री, दक्ष, कर्दम, पुलस्त्य, पुलह, अंगिरा आणि क्रतू —या नऊ प्रजापतींना उत्पन्न केले. महर्षी अत्रींचे पुत्र दुर्वासा खूपच तेजस्वी मुनी झाले. ते महान तपस्वी, अत्यंत क्रोधी आणि संपूर्ण जगाला क्षोभात टाकणारे होते (संपूर्ण जगाला घाबरवून सोडणारे होते) .

एक वेळेची गोष्ट आहे—दुर्वासा देवराज इंद्रांना भेटण्यासाठी स्वर्गलोकात गेले. त्या वेळी इंद्र हत्तीवर आरूढ होऊन संपूर्ण देवतांद्वारे पूजित होऊन कुठे जाण्यासाठी उद्यत (प्रस्तुत) होते. त्यांना पाहून महातपस्वी दुर्वासांचे मन प्रसन्न झाले. त्यांनी विनीत भावनेने (नम्रपणे) देवराजांना एक पारिजात फुलांची माळ भेट दिली. देवराजांनी त्या माळेला हत्तीच्या डोक्यावर टाकले आणि स्वतः नंदनवनाकडे निघून गेले. हत्ती मदाने उन्मत्त झाला होता. त्याने सोंडेने ती माळ उतरवली, कुस्करत तोडली आणि जमिनीवर फेकून दिली.

यामुळे दुर्वासा मुनींना क्रोध आला आणि त्यांनी शाप देत म्हटले —"देवराज! तुम्ही त्रिभुवनाच्या (ब्रह्मांडाच्या) राज्यलक्ष्मीने संपन्न असल्यामुळे माझा अपमान करीत आहात. म्हणून तिन्ही लोकांची लक्ष्मी नष्ट होऊन जाईल, यात थोडेही शंकेचे कारण नसावे."

दुर्वासांनी असा प्रकार शाप दिल्यावर इंद्र पुन्हा आपल्या नगरात परतले. त्यानंतर जगन्माता लक्ष्मी अंतर्धान झाल्या. ब्रह्मदेव आणि

इतर देव, गंधर्व, यक्ष, किन्नर, दैत्य, दानव, नाग, मनुष्य, राक्षस, पशू-पक्षी आणि कीटक वगैरे जगातील समस्त चराचर प्राणी दारिद्र्यामुळे दुःख भोगू लागले.

सर्व लोकांनी तहान आणि भुकेने पीडित होऊन ब्रह्मदेवांच्या जवळ जाऊन सांगितले—"हे प्रभू! तिन्ही लोक तहान व भुकेने पीडित आहेत. आपण सर्व लोकांचे स्वामी आणि रक्षक आहात. आम्ही आपल्याला शरण आलो आहोत. देवेश, आपण आमचे रक्षण करावे."

ब्रह्मदेव ही बातमी ऐकून म्हणाले—"देवता, दैत्य, गंधर्व आणि मनुष्य इत्यादी प्राण्यांनो ऐका. इंद्राच्या अनाचारामुळेच (गैरवर्तनामुळेच) हे सारे संकट उपस्थित झाले आहे. दुर्वासांच्या क्रोधामुळे आज तिन्ही लोकांचा नाश होतो आहे. ज्यांच्या कृपा-कटाक्षाने सर्व लोक सुखी होतात, त्या जगन्माता महालक्ष्मी-देवी अंतर्धान झाल्या आहेत. म्हणून आम्ही सर्वजण जाऊन क्षीरसागरात विराजमान सनातन देव—भगवान नारायणांची आराधना करू. ते प्रसन्न झाल्यावरच संपूर्ण जगाचे कल्याण होईल."

असा निश्चय करून ब्रह्मदेव, संपूर्ण देवता आणि भृगू इत्यादी महर्षींसोबत क्षीरसागराच्या (पुराणात वर्णिलेल्या दुधाच्या समुद्राच्या) किनारी गेले आणि विधिपूर्वक पुरुषसूक्ताद्वारे त्यांची आराधना करू लागले. यामुळे प्रसन्न होऊन भगवंतांनी सर्व देवांना दर्शन दिले.

तेव्हा भगवान नारायण म्हणाले—"देवांनो! अत्रिकुमार दुर्वासांच्या शापामुळे भगवती लक्ष्मी अंतर्धान झाली आहे. म्हणून तुम्ही सर्वजण मंदराचल पर्वताला उखडून क्षीरसमुद्रात ठेवा आणि त्याची रवी बनवून नागराज वासुकींना दोरीप्रमाणे त्यास गुंडाळा. नंतर दैत्य, गंधर्व आणि दानवांच्या सोबतीने समुद्राचे मंथन करा. यामुळे जगाचे रक्षण करण्यासाठी लक्ष्मीदेवी प्रकट होतील. त्यांची कृपा दृष्टी पडताच तुम्ही लोक महान सौभाग्यशाली होऊन जाल. मीच कूर्मरूपाने मंदराचल पर्वताला आपल्या पाठीवर धारण करेन आणि मीपण संपूर्ण देवतांमध्ये प्रवेश करून आपल्या शक्तीने त्यांना बलिष्ठ बनवेन."

असे म्हणून भगवान तेथून अंतर्धान झाले.

त्यानंतर सर्व देव आणि महाबलशाली दानव इत्यादींनी मंदराचलाला उखडून क्षीरसागरात टाकले. त्याच वेळी अमित पराक्रमी भगवान नारायणांनी कासवाच्या रूपात प्रकट होऊन त्या पर्वताला आपल्या पाठीवर धारण केले आणि एका हाताने त्या

सर्वव्यापी अविनाशी प्रभूंनी त्याच्या शिखरास पकडून ठेवले. त्यानंतर देव आणि असुर मंदराचल पर्वताला नागराज वासुकींच्या शरीराने गुंडाळून क्षीरसागराचे मंथन करू लागले. त्यावेळी महाबलशाली देव लक्ष्मीदेवींना प्रकट करण्यासाठी क्षीरसागराचे मंथन करू लागले. त्याच वेळी सर्व महर्षी उपवास करून मन आणि इंद्रियांच्या संयमपूर्वक श्रीसूक्त आणि विष्णु-सहस्र-नामाचे उच्चारण करू लागले. शुद्ध एकादशी तिथीला समुद्रमंथन आरंभ झाले. त्यावेळी लक्ष्मीदेवींच्या प्रकट होण्याची अभिलाषा ठेवीत श्रेष्ठ ब्राह्मणांनी आणि मुनिवरांनी भगवान लक्ष्मीनारायणांचे ध्यान आणि पूजन केले.

त्यावेळी सर्वात आधी कालकूट नामक महाभयंकर विष प्रकट झाले, जे फारच मोठ्या पिंडाच्या (गोळयाच्या) रूपात होते. ते प्रलयकालीन अग्नीच्या समान अत्यंत भयंकर वाटत होते. त्याला पाहून सर्व देव आणि दानव भीतीने पळून गेले. श्रीशंकरांनी आपल्या हृदयात सर्वदुःखहारी भगवान नारायणांचे ध्यान केले आणि त्यांनी तीन नामरूपी महामंत्राचा

भक्तिपूर्वक जप करीत भयंकर विष पिऊन टाकले. अच्युत, अनंत आणि गोविंद—हीच श्रीहरींची तीन दिव्य नावे आहेत. ॐ अच्युताय नमः, ॐ अनन्ताय नमः आणि ॐ गोविन्दाय नमः —एकाग्रचित्त होऊन या तीन नावांचा जो जप करतो, त्यास काळ आणि मृत्यूचे भय राहात नाही.

नंतर समुद्र-मंथन झाल्यावर लक्ष्मीदेवींची मोठी बहीण दरिद्रादेवी प्रकट झाल्या. त्यांनी देवतांना विचारले—“माझ्यासाठी काय आज्ञा आहे.”

तेव्हा देवांनी त्यांना सांगितले—“ज्यांच्या घरी दररोज भांडण होते, तेथेच आम्ही तुम्हाला राहण्यासाठी स्थान देतो आहे. तुम्ही ‘अमंगळा’ला सोबत घेऊन त्यांच्या घरी जाऊन राहावे. जे नेहेमी खोटे बोलतात, जेथे कठोर भाषण केले जाते त्यांच्याच घरी दुःख आणि दारिद्र्य प्रदान करीत तुम्ही नित्य निवास करावा.”

दरिद्रादेवींना अशा प्रकारे आदेश देऊन पुन्हा देवांनी क्षीरसागराचे मंथन आरंभ केले. तेव्हा सुंदर डोळयांच्या वारुणीदेवी प्रकट झाल्या, ज्यांना नागराज अनंतांनी ग्रहण केले. त्यानंतर समस्त शुभलक्षणांनी सुशोभित आणि सर्व प्रकारच्या आभूषणांनी विभूषित एक स्त्री प्रकट झाली, जिला गरुड-देवांनी आपली पत्नी बनवले. त्यानंतर दिव्य अप्सरा आणि महातेजस्वी गंधर्व उत्पन्न झाले जे

अत्यंत रूपवान आणि सूर्य व चंद्रासारखे तेजस्वी होते. त्यानंतर ऐरावत हत्ती, उच्चैःश्रवा घोडा, धन्वंतरी वैद्य, पारिजात वृक्ष आणि सर्व इच्छांना पूर्ण करणारी सुरभी गाय प्रकट झाली. या सर्वांना इंद्राने मोठ्या प्रसन्नतेने स्वीकारले.

द्वादशीच्या प्रातःकाळी महालक्ष्मी प्रकट झाल्या. त्यांना पाहून देवांना मोठा हर्ष झाला. त्यानंतर क्षीरसागरातून शीतल आणि अमृतमय किरणांनी युक्त चंद्र प्रकट झाला जो लक्ष्मी मातेचा भाऊ आहे. त्यानंतर श्रीहरीची पत्नी तुळशी-देवी प्रकट झाल्या. तुळशी-देवींचा प्रादुर्भाव श्रीहरींच्या पूजेसाठीच झाला आहे. त्यानंतर सर्व देव प्रसन्न चित्त होऊन मंदराचल पर्वताला यथास्थानी (त्याच्या पूर्वीच्याच जागी) ठेवून आले आणि लक्ष्मीदेवींची स्तुती करू लागले. तेव्हा लक्ष्मीदेवींनी प्रसन्न होऊन म्हटले—"माझ्याकडून तुम्ही मनोवांछित वर मागा."

देवता लोक म्हणाले—"हे विष्णूंची प्रियतमा लक्ष्मीदेवी! आपण आमच्यावर प्रसन्न होऊन श्रीविष्णूच्या वक्षःस्थळावर निवास करा. आपण कधीही भगवंतांपासून अलग होऊ नका आणि तिन्ही लोकांचा कधीही परित्याग करू नका."

तेव्हा ब्रह्मदेव आणि भगवान नारायण प्रकट झाले. सर्व देव हात जोडून भगवान नारायणांना म्हणाले—"महाराणी लक्ष्मीला आपण जगाचे रक्षण करण्यासाठी ग्रहण करावे."

असे म्हटल्यावर ब्रह्मदेव आणि इतर देवांनी दिव्य पीठावर (सिंहासनावर) भगवान विष्णू आणि लक्ष्मींना बसवून त्या दोघांचे पूजन केले. क्षीरसागरातून जी कोमल दळे असणारी तुळशी-देवी प्रकट झाली होती, तिच्या द्वारे त्यांनी भगवान नारायणांच्या चरण-कमलांचे अर्चन केले. याद्वारे सर्वदेवेश्वर भगवान श्रीहरींनी लक्ष्मीसहित प्रसन्न होऊन देवांना मनोवांछित वरदान दिले. तेव्हापासून देव आणि मनुष्य इत्यादी प्राणी खूप प्रसन्न राहू लागले. त्यांच्याकडे धनधान्याची प्रचुर वृद्धी झाली आणि ते निरोगी होऊन अत्यंत सुख अनुभव करू लागले.

लक्ष्मीसहित भगवान विष्णूंनी प्रसन्न होऊन संपूर्ण लोकांच्या हितासाठी महामुनी आणि देवांना सांगितले—"एकादशी तिथी परम पुण्यमयी आहे. ही सर्व उपद्रवांना शांत करणारी आहे. तुम्ही लोकांनी लक्ष्मीदेवींचे दर्शन प्राप्त करण्यासाठी या तिथीला उपवास केला आहे, म्हणून ही द्वादशी तिथी मला सदा प्रिय होईल. आजपासून जे लोक एकादशीला उपवास करतील द्वादशीला

प्रातःकाल सूर्योदय होताच मोठ्या श्रद्धेने लक्ष्मीदेवी आणि तुळशी-देवीसोबत माझी पूजा करतील, ते सर्व बंधनातून मुक्त होऊन माझ्या परम पदाला प्राप्त होतील.”

असे म्हणून भगवान विष्णू मुनींच्या द्वारे केलेली आपली स्तुती ऐकत लक्ष्मीदेवींच्या निवासस्थानी क्षीरसागरी निघून गेले. तेथे शेषनागाच्या शय्येवर लक्ष्मीदेवींसोबत राहू लागले. त्यानंतर सर्व देव कुर्मरूपधारी (कासवाचे रूप धारण केलेल्या) सनातन भगवंतांचे भक्तिपूर्वक पूजन करून प्रसन्नचित्त झाले.

भगवंताची आज्ञा मानून ब्रह्मदेव इत्यादी देव, सिद्ध, मनुष्य, योगी आणि मुनिश्रेष्ठ—हे सर्व मोठ्या भक्तीने एकादशी तिथीला उपवास आणि द्वादशी तिथीला भगवंताचे पूजन करू लागले.

**वेदाहमेतं पुरुषं महान्तमादित्यवर्णं तमसः परस्तात्।**
**तमेव विदित्वातिऽमृत्युमेतिनान्यः पन्था विद्यैतेऽयनाय॥**

*(श्वेताश्वतरोपनिषदि ३/८)*

भगवत्साक्षात्कार करणारे विशिष्ट भक्तराज म्हणतात—मी त्या पुराण-पुरुषोत्तमांना त्यांच्या कृपेने चांगलाच जाणतो. ते प्रकृतिमय लोकांच्या पलीकडील परव्योमात राहातात आणि त्यांचा वर्ण सूर्यापेक्षाही विशिष्ट देदीप्यमान आहे. त्यांना जाणूनच जीव मृत्युच्या तावडीतून सुटतो, आणि त्यांच्या प्राप्तीचा दुसरा कोणताही मार्ग नाही आहे.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्त्तिनोऽर्जुन।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते॥**

*(गीता ८/१६)*

श्रीभगवान म्हणाले, “हे अर्जुन! ब्रह्मलोकपर्यंत समस्त लोक पुनरावर्त्तनशील आहेत, परंतु मला प्राप्त होऊन पुनर्जन्म होत नाही”.

**भावानुवाद**—सगळे जीव, इतकेच काय तर महासुकृतिवान जीवसुद्धा जन्म ग्रहण करतात, परंतु माझे भक्तगण त्यांच्याप्रमाणे जन्म ग्रहण करीत नाहीत, ब्रह्मदेवांच्या सत्यलोकापर्यंत व्याप्त समस्त जीव जन्म ग्रहण करतात.

# एकादशीची मजेदार कथा

एकदा एक हरी नावाचा मुलगा एका गावात राहात असे. हरी अडाणी होता. शिक्षण न झाल्यामुळे त्याला विशेष ज्ञान नव्हते. तसेच तो आळशी सुद्धा होता. तेव्हा गावातले लोक त्याला म्हणू लागले, “हे हरी! तू तर फक्त ‘खायला काळ, भूईला भार आहेस’. तू एखाद्या मठात का जात नाहीस? तेथे तू सेवा केल्यास तुला भरपेट प्रसाद मिळेल.”

हरीला सुद्धा चांगलंचुंगले पदार्थ भरपूर खाण्याची इच्छा होती. हे ऐकून हरी अयोध्येला आला. अयोध्येत आल्यावर हरी मठ शोधू लागला. त्याला एक मठ सापडला सुद्धा. त्या मठात राहणाऱ्या संतांचे त्याने दर्शन केले. त्याला आढळले की त्या मठाचे सर्व संत जाडेजुडे आणि धिप्पाड होते. त्याने अनुमान लावले की नक्कीच या मठात उत्तम प्रकारचा प्रसाद प्रचुर प्रमाणात मिळत असेल.

त्या मठाच्या महंतांची त्याने भेट घेतली. त्याने महंतांना मठात राहण्याची परवानगी मागितली.

त्याने महंतांना विचारले, “गुरूदेव! या मठात दररोज कितीवेळा प्रसाद मिळतो?” महंतांनी उत्तर दिले, “येथे प्रसाद दिवसातून दोनदाच मिळतो. एकदा सकाळी आणि एकदा संध्याकाळी.” तेव्हा हरी म्हणाला, “मला तर दिवसातून तीनदा प्रसाद घेण्याची इच्छा आहे.” तेव्हा महंत म्हणाले, “काही चिंता करू नकोस. सकाळचा प्रसाद थोडा जास्ती घेऊन तू तो दुपारसाठी साठवून ठेव. तोच प्रसाद तू दुपारी घेऊ शकशील.”

आता हरी मठात राहू लागला. मठामध्ये हरी पडेल ती सेवा करायचा. अशा रितीने त्याचे जीवन सुखाने व्यतीत होऊ लागले.

एके दिवशी सकाळी हरीने पाहिले की मठाच्या स्वयंपाक घरात बऱ्याच उशीरापर्यंत कोणी भाजी कापायला आले नाही. तेव्हा हरीने एका मठवासीला विचारले—“आज स्वयंपाक का बनत नाही आहे? आज स्वयंपाक घरात शुकशुकाट का आहे?” मठवासी म्हणाला, “अरे हरी, तुला माहिती नाही का? आज एकादशी आहे. आज मठात स्वयंपाक बनणार नाही. आज मठातील सर्व भक्तांना एकादशीचा उपवास आहे. कोणीही काहीही खाणार किंवा पिणार नाही.”

हे ऐकून तर हरीचे धाबेच दणाणले. तो विचार करू लागला, “एकादशीचा उपवास तर माझ्यासाठी अशक्य आहे.” त्याने जाऊन

महंतांची भेट घेतली. तो म्हणाला, "गुरूदेव, माझ्यासाठी एकादशीचा कडकडीत उपवास अशक्य आहे. मी दिवसातून तीनदा जेवल्याशिवाय राहू शकत नाही. कृपया आज माझ्या जेवणाची व्यवस्था करा. अन्यथा मी दुसऱ्या मठात निघून जाईन."

तेव्हा महंत म्हणाले, "अरे हरी, आज कोणत्याही मठात तुला अन्नप्रसाद मिळणार नाही. आज सर्वच मठांमध्ये एकादशीच्या उपवासाचे पालन केले जाईल. परंतु चिंतेचे कारण नाही आहे. आम्ही तुला डाळ, तांदूळ, पीठ, तेल, मसाले, भाज्या इत्यादी सर्व स्वयंपाकाची सामग्री प्रदान करतो आहे. तू स्वतः भात, भाजी, वरण, पोळी, चटणी इत्यादी बनवून, रामाला नैवेद्य दाखव आणि स्वतःही तो प्रसाद स्वीकार कर."

गुरुदेवांनी हरीला स्वयंपाकाची सर्व सामग्री प्रदान केली. हरीने स्वयंपाक करणे आरंभ केले. हरी आज प्रथमच स्वयंपाक बनवत होता. हरीला स्वयंपाक करण्याची सवय नसल्याने त्याने बनविलेल्या पोळया थोड्या जळाल्या. परंतु त्याने गुरुजींच्या आदेशाप्रमाणे दोन थाळया तयार केल्या-एक रामासाठी आणि एक स्वतःसाठी. नंतर हरी म्हणू लागला, "हे राम, आपण लवकर या. माझ्यावर कृपा करा आणि भोग स्वीकार करा. आपल्याला भोग अर्पण केल्याशिवाय मी जेवू शकणार नाही."

तरीही राम आले नाहीत. तेव्हा तो कळकळीने रामांना म्हणाला, "अहो राम! आज एकादशी आहे, आज मठात पेढे, बर्फी, शिरा इत्यादी काहीही मिळणार नाही. मी कसाबसा काही भात, भाजी, पोळी इत्यादीचा स्वयंपाक केलेला आहे. तुम्ही जेवून घ्या." हरीने वारंवार अशी विनवणी केल्यावर भगवान श्रीराम तेथे श्रीसीतेसोबत प्रकट झाले. श्रीराम कधीही एकटे नसतात. श्रीमती सीतादेवी नेहेमी त्यांच्या सोबत असतेच. हरीने श्रीराम आणि श्रीसीतेचे दर्शन केले. परंतु श्रीसीतेला पाहून त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. तो वारंवार आलटून पालटून श्रीसीतेचे मुख आणि दुसरी जेवणाची थाळी न्याहाळू लागला.

तेव्हा श्रीरामांनी त्याला विचारले. "अरे हरी, तुला काय झाले? तू ठीक तर आहेस ना? तुला आम्हा दोघांना पाहून आनंद झाला की नाही?"

हरी म्हणाला, "हो, आपल्या दोघांना पाहून मला तर अपार आनंद झाला आहे. परंतु मी तर दोनच थाळया बनविल्या आहेत. एक आपल्यासाठी आणि एक माझ्यासाठी. परंतु श्रीसीतादेवींचे सुद्धा

आगमन होणार याची मला कल्पना नव्हती."

"स्वतःच्या वाट्याची एक थाळी श्रीसीतादेवींना सुद्धा अर्पण करणे माझे कर्तव्य आहे." असा विचार करून त्याने एक भोजनाची थाळी श्रीरामांना व एक थाळी सीतादेवींना अर्पण केली. स्वतःसाठी भोजनाची एकही थाळी न उरल्याने त्याला त्या एकादशीला कडकडीत उपवास आपोआप घडला.

पुढची एकादशी आल्यावर हरी श्रीगुरुदेवांकडे गेला आणि त्याने विनंती केली, "हे श्रीगुरुदेव, मागच्या एकादशी पेक्षा थोडा अधिक शिधा-सामग्री मला द्या." श्रीगुरुदेवांनी त्याच्या विनंतीचा मान राखून त्याला थोड्या जास्ती प्रमाणात स्वयंपाकाचे पदार्थ प्रदान केले. त्या एकादशीला हरीने तीन थाळया भोजन बनविले.

दोन थाळया श्रीराम आणि श्रीसीतेसाठी, आणि एक थाळी स्वतःसाठी. मग हरी भगवंतांना आळवू लागला, "अहो राम! श्रीमती सीतेसोबत आपण या. मी आपल्या दोघांसाठी थाळया तयार ठेवल्या आहेत. आपण दोघेही भोजन करून घ्या."

परंतु आज श्रीसीता व श्रीरामांसोबत श्रीलक्ष्मण पण हजर झाले. तेव्हा हरीच्या आश्चर्याला पारावर उरला नाही. तो आलटून-पालटून तिसरी थाळी आणि श्रीलक्ष्मणांचे मुख न्याहाळू लागला. त्याला कळले एक थाळी अवश्य लक्ष्मणांना पण द्यावी लागेल. तेव्हा श्रीरामांनी हरीला विचारले, "अरे हरी, तू चकित झालेला दिसतोस. काय आम्हा तिघांच्या आगमनाने तू संतुष्ट नाहीस का?"

तेव्हा हरी उत्तरला, "अहो भगवान श्रीरामचंद्र, मी पूर्णपणे संतुष्ट आहे. आपण तिघेही पोटभर जेवून घ्या." आता श्रीरामचंद्र, श्रीमती सीतादेवी व श्रीलक्ष्मण यांनी भोजन केले आणि ते अंतर्धान झाले.

पुढच्या एकादशीला हरीने श्रीगुरुदेवांना परत विनंती केली, "हे गुरूदेव, आज मला मागच्या एकादशीपेक्षाही अधिक शिधा-सामग्री प्रदान करा." श्रीगुरुदेवांनी त्याला मागच्या एकादशीपेक्षाही अधिक शिधा-सामग्री देऊ केली. त्या एकादशीला हरीने मागच्या एकादशीपेक्षा अधिक प्रमाणात स्वयंपाक करून चार थाळया भोजन तयार केले. एक थाळी श्रीरामांसाठी, एक श्रीमती सीतादेवींसाठी, एक श्रीलक्ष्मणांसाठी आणि एक स्वतःसाठी.

मग हरी भगवंतांना आळवू लागला, "अहो श्रीरामचंद्र, तुम्ही सर्व या आणि भोग स्वीकार करा. जेवण तयार आहे." त्याची प्रार्थना ऐकून श्रीरामचंद्र प्रकट झाले. परंतु त्यांच्यासोबत श्रीमती

सीतादेवी, श्रीलक्ष्मण आणि श्रीहनुमान सुद्धा होते. श्रीहनुमंतांना पाहून हरीला आश्चर्याचा धक्काच बसला. तो वारंवार आपली थाळी आणि श्रीहनुमंतांचे मुख न्याहाळू लागला. तेव्हा श्रीरामांनी त्याला विचारले, "अरे हरी, काय आम्हा सर्वांना बघून तू संतुष्ट नाहीस का?"

तेव्हा हरी उत्तरला, "अहो श्रीरामचंद्र, आपल्या सर्वांचे दर्शन घेऊन मला फारच आनंद होतो आहे." असे म्हणत हरीने आपल्या वाट्याची थाळी श्रीहनुमंतांना अर्पण केली आणि स्वतः कडकडीत एकादशीचा उपवास केला.

श्रीरामचंद्र त्यांच्या परिकरांसोबत अंतर्धान व्हायच्या आधी हरीने भगवंतांना विनवणी केली, "अहो राम, पुढच्या एकादशीला तुम्ही किती जणांसोबत येणार आहात हे मला आधीच सांगावे, जेणेकरून तेवढ्या जणांचा प्रसाद तयार ठेवू शकेन."

हे ऐकून श्रीरामचंद्र काहीच बोलले नाहीत आणि किंचितसे हसून ते आपल्या परिकरांसोबत तेथून अंतर्धान झाले. त्याच्या पुढच्या एकादशीला हरीने श्रीगुरुदेवांना विनंती केली, "हे गुरूदेव, मला आज मागच्या एकादशीपेक्षाही खूपच अधिक शिधा-सामग्री हवी आहे. मी जेव्हा एकासाठी भोग बनवतो, तेव्हा दोन जण येतात. दोन जणांसाठी बनवल्यावर तीनजण येतात. आणि तीनजणांसाठी बनवल्यावर चार जणांचे आगमन होते. म्हणून मला भरपूर शिधा-सामग्री द्या".

गुरुदेवांना काहीच कळले नाही का हा कोणासाठी येवढी शिधा-सामग्री मागतो आहे. त्यांना वाटले की बहुधा हरी प्रसाद कोणाला वितरण करत असेल. तरीही त्या एकादशीला गुरुदेवांनी त्यांना भरपूर शिधा-सामग्री देऊ केली. गुपचूप हरीचा पाठलाग करत श्रीगुरुदेव त्याच्या मागे चालत स्वयंपाकघरात गेले.

हरीने ती सर्व शिधा-सामग्री स्वयंपाकघरात आणून ठेवली. परंतु हरीने आज काहीही स्वयंपाक बनवला नाही. सामान तसेच स्वयंपाक घरात ठेवून तो म्हणाला, "हे सीतादेवी, हे राम, हे लक्ष्मण, हे हनुमान तुम्ही सगळे या. आज सगळी सामग्री तयार आहे."

त्यावेळी राम, सीता, लक्ष्मण, हनुमान आणि बरेचसे श्रीरामांचे परिकर —जसे जांबुवंत, नल, नील, सुग्रीव, अंगद इत्यादी तेथे प्रकट झाले. राम डाळ धुवू लागले. सीतादेवी पोळया बनविण्यासाठी कणीक तिंबू लागली, हनुमान शेगडीसाठी सरपण

घेऊन आले, लक्ष्मणांनी भाजी कापायला मदत केली, सुग्रीव आणि जांबुवंत चूल पेटवू लागले. अश्या रितीने श्रीरामांसोबत त्यांचे सगळेच परिकर स्वयंपाक बनवू लागले.

तेव्हा गुरूदेव तेथे आले. त्यांनी हरीला विचारले, “अरे काही बनवत का नाहीस? चल स्वयंपाकाला लाग.” तेव्हा हरी म्हणाला, “गुरूदेव! तुम्ही बघाना! राम, लक्ष्मण, सीता, हनुमान, अंगद, सुग्रीव, जांबुवंत आणि सगळे भगवंतांचे परिकर स्वयंपाक बनविण्यासाठी हातभार लावत आहेत.”

त्या वेळी हरीने श्रीरामांना विनंती केली, “हे राम! तुम्ही लवकर सपरिवार माझ्या गुरुदेवांना दर्शन द्या. नाहीतर ते म्हणतील की मी खोटा बोलतो आहे. ते माझ्यावर विश्वास ठेवणार नाहीत.”

तेव्हा श्रीरामांना आपल्या परिकरांसोबत हरीच्या गुरुदेवांना दर्शन दिले. तेव्हा गुरुदेवांना खूपच आश्चर्य वाटले, त्यांच्या डोळयातून अश्रू वाहू लागले. ही लीला पाहून श्रीहरीला शुद्ध–भक्तीची प्राप्ती झाली.

याच्या पूर्वी श्रीरामांचे दर्शन करून सुद्धा हरीला भक्ती प्राप्त झाली नाही. परंतु जेव्हा श्रीगुरुदेवांनी ही श्रीरामांची लीला पाहिली तेव्हा श्रीराम आणि श्रीगुरुदेवांच्या कृपेने त्याला शुद्ध भक्ती प्राप्त झाली.

याचा अर्थ असा आहे की एकादशीच्या दिवशी भगवंतांची ही इच्छा आहे की आपण सर्वांनी नऊ प्रकारची धान्ये खाऊ नये. सशक्त असल्यास काहीही न खाता आणि काहीही न पिता एकादशीचे व्रत करावे.



म्हणून रामांनी पहिल्या एकादशीला एका थाळीतील भोग स्वतः ग्रहण केला आणि दुसऱ्या थाळीतील प्रसाद सीतादेवीला देवविला. परंतु हरीसाठी काहीही अन्नप्रसाद राहू दिला नाही. त्याच्या पुढच्या एकादशीला त्यांनी एका थाळीतील भोग त्यांनी स्वीकारला आणि दोन थाळीतील प्रसाद सीतेला आणि लक्ष्मण यांना दिला. त्याच्या पुढच्या एकादशीला एका थाळीतील भोग श्रीरामांनी स्वतः स्वीकारला आणि उरलेल्या ती थाळयांमधील प्रसाद श्रीमती सीतादेवी, श्री लक्ष्मण आणि श्रीहनुमंतांना दिला. त्याच्या पुढच्या एकादशीला त्यांनी आपल्या सर्व परिकरांसोबत येऊन स्वतः स्वयंपाक करून भोग स्वीकारला आणि उरलेला सर्व प्रसाद आपल्या सर्व परिकरांना दिला. परंतु हरीसाठी प्रसादाचा एक कणही ठेवला नाही.

या कथेत बरीच तत्त्वे भरलेली आहेत. हरी आपल्या सद्गुरुदेवांच्या आनुगत्यात भजन करीत होता, परंतु एकादशी करण्याची त्याची इच्छा नव्हती. श्रीरामचंद्रांनी बऱ्याच एकादशींना सर्व भोग स्वीकार करून त्याला उपवास घडवला आणि त्याला एकादशीचा उपवास ठेवायची सवय लावली.

हरीने गुरुदेवांचा आश्रय घेतला होता म्हणून श्रीरामचंद्रांनी स्वतः लक्ष घालून हरीच्या एकादशीच्या व्रताचे रक्षण केले आणि हरीला एकादशीच्या दिवशी अन्न खाऊ दिले नाही. शेवटी हरीचा श्रीगुरुदेवांच्या चरणीचा भाव पाहून श्रीरामांनी त्याला शुद्ध भक्ती प्रदान केली.

हरीने रामाचे दर्शन करून सुद्धा त्याला भीती होती की माझी जेवणाची थाळी मला सीतादेवींना, लक्ष्मणांना किंवा हनुमंतांना द्यावी लागेल. या भीतीचे मूळ कारण होते भोग लालसा. भोग लालसा जाते भक्ती आल्यावर.

पहिल्या एकादशीला भगवंतांनी सीता आणि राम अशी दोन रूपे धारण करून भोग स्वीकारला, नंतरच्या एकादशीला त्यांनी राम, सीता, लक्ष्मण अशी तीन रूपे धारण करून भोग स्वीकारला. त्याच्या पुढच्या एकादशीला भगवंतांनी राम, लक्ष्मण, सीता आणि हनुमान अशी चार रूपे धारण करून भोग स्वीकारला. परंतु चौथ्या एकादशीला भगवंतांनी अनेक परिकरांचे रूप धारण करून स्वतःच स्वयंपाक बनविला आणि स्वीकारला सुद्धा. ही लीला पाहून हरीची भोग-वासना गेली आणि त्याला शुद्ध भक्ती प्राप्त झाली.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥** *(गीता १८/७८)*

# श्री गोपाल भट्ट गोस्वामी आणि एकादशीचा धडा



श्रीगोपालभट्ट गोस्वामी



श्रीराधारमण

श्री गोपाल भट्ट गोस्वामी प्रभूंचे एक शुद्ध भक्त होते. साधारण लोक त्यांचा कार्यकलाप समजू शकत नाहीत. जर कोणी त्यांच्या व्यवहाराप्रति संशय करेल, तर त्याचे पतन अवश्यच होईल.

गोपाल भट्ट गोस्वामींचे बरेचसे शिष्य होते—जसे श्रीनिवास आचार्य, हरिवंश व्रजवासी, विद्वान गोपीनाथ पुजारी, शंभुराम आणि गुजरातचे मकरंद.

गोपाल भट्ट गोस्वामी यांनी श्रीश्रीराधारमण विग्रहाच्या सेवेची जबाबदारी गोपीनाथ पुजारींना सोपवलेली होती. गोपाल भट्ट गोस्वामींचे शिष्य हरिवंश यांनी त्यांच्या आदेशाचे पालन केले नाही. तेव्हा गोपाल भट्ट गोस्वामी यांनी त्यांचा परित्याग केला. त्यानंतर हरिवंशांचे सारे सौभाग्य आणि चांगले गुण लुप्त झाले. या पश्चात असे घडले—

हरिवंश व्रजवासी एक प्रसिद्ध विद्वान होते. ते नेहेमी इमानदारीने (प्रामाणिकपणे) आपल्या आध्यात्मिक गुरूंची सेवा करीत असत. गोपाल भट्ट गोस्वामी यांच्यावर प्रसन्न होते. तरी देखील, दुर्भाग्य क्रमाने हरिवंशांनी आपल्या गुरूच्या आदेशाचे पालन केले नाही.

एकदा एकादशीच्या दिवशी, हरिवंश पान चघळत, आपल्या आध्यात्मिक गुरूच्या निकट आले. जेव्हा गोपाल भट्ट गोस्वामींनी त्याला पानाच्या संबंधी विचारले, तेव्हा ते म्हणाले की तो श्रीराधाचा प्रसाद आहे. गोपाल भट्ट गोस्वामी म्हणाले, “एकादशीच्या दिवशी आपण काहीही खाऊ नका. येथपर्यंत की भगवान हरीचा

महाप्रसाददेखील नाही. शास्त्र म्हणतेः प्रसादान्नम् सदा ग्राह्यं हरेर् एकादशीं विना।—'भगवान हरीच्या उच्छिष्ट महाप्रसादाचे सेवन अवश्य करायला हवे, फक्त एकादशीच्या दिवशी नाही.' परत असे करू नका; अन्यथा, हा अपराध होईल."

हरिवंशांनी त्यांना दंडवत प्रणाम केला आणि ते तेथून निघून गेले. दुर्भाग्याने त्यांना पान खायची सवय लागली होती आणि त्यामुळे ते ही सवय थांबवू शकले नाहीत. पुढच्या एकादशीला श्रीमती राधिकेला अर्पण केलेला तांबूल चघळत लाल ओठ घेऊन ते आपल्या आध्यात्मिक गुरूंना भेटण्यासाठी गेले. गोपाल भट्ट गोस्वामी म्हणाले, "तुम्ही एक सुशिक्षित व्यक्ती आहात. का आपण एका अज्ञानी व्यक्ती प्रमाणे आचरण करीत आहात? एकादशीच्या दिवशी पान चघळून आपण सर्व प्रकारच्या पापांचा संग्रह करीत आहात. सुशिक्षित विद्वान असूनही आपण माझ्या आदेशाचे पालन केले नाही. मी या अपराधामुळे आपला त्याग करतो आहे."

हरिवंशांनी अनुरोध केला, "हे प्रसादी पान आहे आणि मी ही पान चघळायची सवय सोडू शकत नाही. मी आपल्या आदेशाचे उल्लंघन करून अपराध तर केला आहे, पण मी राधिकेच्या उच्छिष्ट प्रसादी पानाची उपेक्षा करू शकत नाही."

गोपाल भट्ट गोस्वामी हा तर्क ऐकून कुपित झाले. म्हणून हरिवंश लवकरच ते स्थान सोडून निघून गेले. अशा प्रकारे ते श्रीराधारमण विग्रहाच्या सेवेपासून वंचित झाले. नंतर, हरिवंशांनी स्वतंत्र रूपाने वृंदावनात श्रीश्रीराधावल्लभ विग्रहाची प्रतिष्ठापना केली. त्यांनी पहिल्या पत्नीपासून वनचन्द्र आणि वृन्दावन-चन्द्र नामक दोन पुत्र झाले आणि दुसऱ्या पत्नीपासून कृष्णदास आणि सूर्यदास नामक दोन पुत्रांची प्राप्ती झाली. शेवटी हरिवंशांनी श्रीश्रीराधावल्लभांची सेवा आपल्या मुलांना सोपवली आणि वनात राहाण्यासाठी घर सोडून दिले.

हे समजणे कठीण आहे की नियती कशी काम करते. त्यांच्या प्रस्थानाच्या थोड्या समयानंतर, वनात लुटारूंनी हरिवंशांवर प्राणघातक हल्ला केला आणि त्यांचे डोके कापून ते यमुना नदीत फेकले.

कापलेले डोके नदीत वाहात त्या स्थानी पोहोचले जेथे गोपाल भट्ट गोस्वामी स्नान करीत होते. मोठ्या आश्चर्याची गोष्ट होती की ते कापलेले डोके अजूनही राधा-नामाचे उच्चारण करीत होते.

गोपाल भट्ट गोस्वामींना हे पाहून मोठे आश्चर्य झाले की एक कापलेले डोके "राधा, राधा" जप करीत होते. परंतु जेव्हा त्यांना हे समजले की हे कापलेले डोके हरिवंश यांचे आहे तेव्हा त्यांनी हृदयात पीडा अनुभवली. तरीही त्या कापलेल्या डोक्याचे स्वागत केले.

कापलेले डोके हळूहळू गोपाल भट्ट गोस्वामींच्या जवळ आले आणि त्याने त्यांच्या चरणकमळांना स्पर्श केला.

डोके म्हणाले, "हे गुरुदेव, कृपया मला सांगावे—काय आपण माझ्या अपराधाला क्षमा कराल?"

गोपाल भट्ट गोस्वामींनी उत्तर दिले, "हो, मी तुम्हाला माफ केले आहे."

तेव्हा गोपाल भट्ट गोस्वामी यांनी कापलेल्या डोक्यावर आपले चरणकमळ ठेवले. आपल्या गुरूच्या चरणकमळांचा आश्रय प्राप्त झाल्यानंतर, हरिवंश मुक्तीसाठी पात्र बनले. गोपाल भट्ट गोस्वामी आपल्या भजन-कुटीत आल्यावर त्यांनी घडलेल्या घटनेचा वृत्तांत सर्वांना ऐकवला.

हे निश्चितच जाणावे की कृष्ण एका अपराधीला आपली दया तेव्हाच प्रदान करतील जेव्हा ज्या वैष्णवाच्या चरणी त्याने अपराध केला आहे, तो वैष्णव त्याला क्षमा करेल. जो पर्यंत कोणी आपल्या अपराधांपासून मुक्त होत नाही, तो पर्यंत त्याला भगवंतांची दया प्राप्त करण्याचा काहीही मार्ग नाही आहे. हे एका महान भक्तासाठी सुद्धा खरे आहे.

अपराध्याची तर गोष्टच काय, येथपर्यंत की त्याची मुले देखील अपराधाच्या प्रतिक्रियांपासून वाचू शकत नाही, आणि ते नेहेमी वैष्णवांद्वारा अस्वीकार केले जातात.

**संदर्भ ग्रंथः** प्रेम-विलास (दिव्य प्रेमाच्या लीला)

**रचनाकारः** श्री नित्यानन्द दास

**प्रकाशकः** चिंतामणी (टचस्टोन) पुस्तक संस्था

**पृष्ठ-संख्याः** १८९-१९०

---

**द्वापरीयैर्जनैर्विष्णुः पाञ्चरात्रैस्तु केवलैः।**
**कलौ तु नाममात्रेण पूज्यते भगवान् हरिः॥**

*(श्रीमध्वाचार्यकृत मुण्डकोपनिषद्भाष्ये नारायणसंहितावचनम्)*

द्वापरयुगातील लोक तर केवळ पंचरात्रोक्त विधीच्या अनुसार भगवंतांचे पूजन करतात, परंतु कलियुगात तर केवळ हरिनामाद्वारेच भगवंतांचे पूजन तत्कालीन लोक करतात.

# एकादशी व्रताचे फळ प्रदान केल्याने ब्रह्म-दैत्याची मुक्ती

परम-पुज्यपाद भक्तिगौरव वैखानस गोस्वामी महाराज यांचा जन्म एका ब्राह्मण परिवारात झाला होता. ते श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर प्रभुपाद यांच्या श्रेष्ठ शिष्यांपैकी एक होते. श्रील प्रभुपादांकडून दीक्षा प्राप्त करण्याच्या आधी ते एक राजगुरू आणि राजपंडित होते. त्यांनी आपल्या निर्जल एकादशीच्या व्रताचे फळ प्रदान करून एका ब्रह्म-दैत्याचा उद्धार केला होता. श्रील भक्तिविज्ञान भारती गोस्वामी महाराज यांनी ही लीला त्यांच्या शुभ-तिरोभाव तिथीच्या दिवशी २७ जानेवारी २०१७ ला सांगितली होती.

राजाने आपल्या राजपंडितांना खूप सारी जमीन भेट दिली होती. त्या जमिनीत पिकलेले धान्य विकून पैसा घेऊन राजपंडित वापस येत होते. रस्त्यातच गारपीट, पाऊस आणि वादळ चालू झाले. राजपंडित विचार करू लागले की त्यांनी कुठे जावे. एका गावात जाऊन त्यांनी विचारले - "येथे कोठेतरी रहाण्यास स्थान मिळेल का?" राजपंडितांना त्यावेळी पान खाण्याची सवय होती. गावातल्या पानाच्या दुकानदाराने त्यांना सांगितले की जवळच एक घर खाली आहे आणि ते तेथे राहू शकतात. ते घर प्रेताने ग्रासलेले होते. ब्रह्म-दैत्याने त्याचा कब्जा घेतला होता. कोणता मनुष्य ब्रह्म-दैत्य बनतो? जर उपनयन (मुंज) संस्कार झाल्यावर पाच दिवसांच्या आत अग्नीत जळून, अपघातात किंवा अन्य कोण्या अनैसर्गिक कारणवश कोणी मनुष्य मृत्यूमुखी पडतो तेव्हा असा मनुष्य ब्रह्म-दैत्य बनतो. राजपंडित रात्री बारा वाजता त्या घरी पोहोचले. तेव्हा तो ब्रह्म-दैत्य सुद्धा तेथे पोहोचला. त्याला पाहून राजपंडित बिलकुल घाबरले नाहीत.

त्यांनी त्या प्रेताला विचारले—"तुम्ही कोण आहात?"

तो म्हणाला—"मी ब्रह्म-दैत्य आहे."

राजपंडित—"तुम्ही येथे का आला आहात?"

ब्रह्म-दैत्य—"तुम्हाला खाण्यासाठी."

राज-पंडित—"काय तुम्ही मला देखील खाऊन टाकाल? ब्रह्म-हत्येच्या पापाची भीती नाही आहे का तुम्हाला?"

ब्रह्म-दैत्य—"मी ब्रह्म-दैत्य आहे. पापाला का घाबरू?"

राज-पंडित—"कधी तुमच्या उद्धाराच्या विषयी विचार केला

आहे?"

ब्रह्म-दैत्य—"कोणती अशी महान व्यक्ती आहे जी माझ्या उद्धाराच्या विषयाचा विचार करेल?"

राज-पंडित—"तुमचा उद्धार कसा होईल?"

ब्रह्म-दैत्य—"जर कोणी व्यक्ती दशमीच्या दिवशी एकाहार (सकाळी एकदाच भोजन करून), एकादशीच्या दिवशी निराहार (काहीही आहार किंवा पाणीसुद्धा न घेता), आणि द्वादशीच्या दिवशी एकाहार करेल, आणि अशा एकादशीचे फळ मला अर्पण करेल तरच माझा उद्धार होईल."

राज-पंडित—"मी तुम्हाला माझ्या एकादशीचे फळ प्रदान करीन."

राज-पंडित प्रत्येक एकादशीचे अनुष्ठान अश्याच रितीने एकदम कडकडीत करत असत. त्यांनी हातात पाणी घेऊन आचमन केले, आणि संकल्प केला की मी एका निर्जल एकादशीचे फळ या प्रेतात्म्याला समर्पण करतो आहे. त्यांनी असे म्हटताच एक जोरदार ध्वनी झाला आणि तो ब्रह्म-दैत्य उद्धार होऊन निघून गेला. या सर्व घडामोडीत रात्रीचे दोन वाजले. त्यानंतर राज-पंडितांनी थोडा आराम केला.

सकाळी गावात गावकऱ्यांचा फारच गोंधळ उडला. ते विचार करू लागले-राजगुरु आले होते. त्यांना तर त्या स्थानीच राहण्यास सांगितले गेले जेथे ब्रह्म-दैत्याने कब्जा केला होता. जर त्यांचे काही बरेवाईट झाले तर राजा सर्वच गावकऱ्यांना मारहाण करेल. तो कोणालाही सोडणार नाही. याच्यापेक्षा उत्तम हेच होईल की आपण स्वतःहूनच ही घटना राजाच्या कानावर घालावी.

"आम्हा लोकांना अजिबात माहीत नव्हते की ही व्यक्ती राजगुरु आहे. अन्यथा आम्ही त्यांना मोठा सन्मान देत आमच्या सोबत ठेवले असते. आम्हाला तर बिलकुल खबर नव्हती की पानाच्या दुकानदारांनी त्यांना प्रेतात्म्याने ग्रासलेल्या घरी पाठविले आहे."—हा समाचार राजाला लगेच धाडावा.

तेव्हा काही वयस्कर लोकांनी समजावले की पहिले तर हे तर जाऊन पहा की त्या प्रेतात्म्याने झपाटलेल्या घरात काय झाले आहे. सर्व लोक तेथे जाऊन दरवाजा ठोठावू लागले. वारंवार दरवाजा ठोठावल्यावर राजपंडितांची झोप मोडली.

राजपंडितांनी विचारले—"काय गोष्ट आहे?"

गावकरी—"आपण या घरात काही पाहिले नाही?"

राजपंडित—"काय पाहायचे आहे?"

गावकरी—"काहीच पाहिले नाही का?"

राजपंडित—"त्या ब्रह्म-दैत्याचा उद्धार होऊन तो निघून गेला आहे."

---

**निमाईची मधुर बाल्य-लीलाः** बालक निमाई गुढगे आणि हातांच्या बळावर चालू लागला. त्याच्या बालसुलभ क्रीडांना पाहू श्रीजगन्नाथ मिश्र आणि श्रीशचीदेवी यांच्या आनंदाला सीमा राहात नसे. त्या दिवशी संध्याकाळी भारताच्या तीर्थांमध्ये भ्रमण करीत एक भक्त ब्राह्मण घरी अतिथी होते. मिश्र-दंपतीने श्रद्धापूर्वक शेणाने ओटा सारवून स्वयंपाकाची सामग्री प्रस्तुत केली. ब्राह्मण महोदयांनी आपल्या हातानी स्वयंपाक केला आणि विधिपूर्वक आपले इष्टदेव श्रीबोलगोपालांना भोग निवेदन करून त्यांचे ध्यान करू लागले. याच दरम्यान काही आवाज ऐकून ते चकित झाले. डोळे उघडल्यावर पाहिले बालक निमाई आनंदाने ओरडत भोगाच्या थाळीत हात टाकून प्रसाद ग्रहण करित आहे. ब्राह्मण देवता हाय-हाय करू लागले. मिश्र आणि त्यांची पत्नी हे पाहून फारच दुःखी झाले. त्यांनी वारंवार प्रार्थना केल्यावर ब्राह्मणांनी दुसऱ्यांदा स्वयंपाक केला आणि पुन्हा भोग लावला. परंतु या वेळी देखील चंचल निमाईने न जाणो कुठून उपस्थित होऊन भोगाला उष्टे करून टाकले. ब्राह्मणदेव पुन्हा हाय-हाय करू लागले. या वेळी मिश्र-दंपतीला खूप दुःख झाले. रात्र देखील फारच झाली होती. परंतु निमाईचे मोठे भाऊ विश्वरूपांच्या अत्यधिक आग्रहामुळे ब्राह्मणांनी तिसऱ्यांदा स्वयंपाक तयार करून नैवेद्य दाखविला. या वेळी बालक निमाईला शेजाऱ्याच्या घरात बंद करून ठेवले गेले. परंतु आश्चर्याची गोष्ट झाली की जसे ब्राह्मणांनी भोग अर्पण करून डोळे बंद केले आणि गोपाल मंत्राचा जप करणे आरंभ केले, तेव्हा लगेचच बालक निमाई हसत भोग थाळीत हात लावून खाताना दिसले. ब्राह्मणदेव पुन्हा हाहाकार करू लागले. इतक्यातच निमाई शंख-चक्र-गदा-पद्म धारण करीत चतुर्भुज रूपात आणि एक हातात लोणी घेऊन दुसऱ्याने लोणी खात अद्भुत सौंदर्य-मंडित बालगोपाल रूपात दर्शन दिले. सौभाग्यवान ब्राह्मणदेव आपल्या इष्ट देवतेचे दर्शन करून प्रेमाने विव्हळ झाले. भगवान ब्राह्मणांना आपली ही लीला गुप्त ठेवण्याचा आदेश देऊन अंतर्धान झाले. ब्राह्मण-देवता त्या रूपाचे चिंतन करीत प्रेमाने महाप्रसाद घेऊन कृतकृत्य झाले.

## *एकादशीचे अप्रतिम घरगुती दंतमंजन*

सामान्यतः हिरड्या कमजोर झाल्याने दात पडू लागतात. यापासून बचाव करण्यासाठी १०० ग्राम तुरटीची वस्त्रगाळ भुकटी, ५० ग्राम सैंधव (शेंद) मिठाची वस्त्रगाळ भुकटी आणि २ चमचे शुद्ध हळदीची वस्त्रगाळ भुकटी -या तिघांना मिसळून एक डबीत भरून ठेवावे. सकाळी आणि रात्री झोपायच्या आधी बोटाने दात आणि हिरड्या साफ केल्याने शंभर वर्षांपर्यंत दात मजबूत राहतील आणि रक्त येणे बंद होईल.

## *अंगाचा नैसर्गिक साबण*

१०० ग्राम मुलतानी माती, १०० ग्राम शिकेकाईची भुकटी, १०० ग्राम रीठ्याची भुकटी (Soap Nut Powder)—उपरोक्त तिघांचे मिश्रण एक डबीत भरून घ्या. शौचानंतर तसेच स्नानाच्या वेळी याचा वापर केल्याने प्राण्यांच्या चरबीपासून बनलेल्या अशुद्ध साबणांची गरज पडणार नाही.

## *नैसर्गिक शॅम्पू*

१ लीटर शुद्ध पाणी, २० लिंबांचा रस, २ चमचे शिकेकाईची भुकटी, २ चमचे रीठ्याची भुकटी, १ चमचा आवळकंठीची भुकटी —या सामग्रीला एकत्र करून एका बाटलीमध्ये भरून ठेवा. याने केस धुतल्याने केस लांब आणि घनदाट होतील.

**सत्ये दैत्यकुलाधिनाशसमये सिंहोर्ध्वमर्त्याकृति-**
**स्त्रेतायां दशकन्धरं परिभवन् रामेति नामाकृतिः।**
**गोपालान् परिपालयन् व्रजपुरे भारं हरन् द्वापरे**
**गौराँगः प्रियकीर्तनः कलियुगे चैतन्यनामा प्रभुः॥**

*(—नृसिंहपुराणे)*

सत्ययुगात जे प्रभू हिरण्यकश्यपूचा विनाश करण्याच्या वेळी नृसिंहाकृतीने अवतीर्ण झाले, त्रेतायुगात रावणाचा तिरस्कार करीत परममनोहर राम नामक श्रीविग्रह रूपात प्रकट झाले आणि द्वापरात पृथ्वीचा भार उतरविण्यासाठी गवळयांच्या (गोप) बालकांचे) रक्षण करीत त्रिभुवन मोहन रूपाने श्रीव्रजधामात विराजमान झाले, तेच प्रभू कलियुगात संकीर्तनप्रिय श्रीगौरांगदेव 'श्रीकृष्णचैतन्य' नामाने विख्यात होतील.

# श्रीरामनवमी-व्रत

**"वन्दामहे महेशानं हरकोदण्ड-खण्डनम्।
जानकी-हृदयानन्द-चन्दनं रघुनन्दनम्॥"**

—*पद्मपुराण*

ज्यांनी शिवांच्या (शंकरांच्या) धनुष्याची प्रत्यंचा (दोरी) तोडली आणि जे जानकींच्या (राजा जनकांची कन्या सीतेच्या) हृदयाला आनंद प्रदान करणारे चंदन-स्वरूप आहेत, त्याच सर्वेश्वर रघुनंदन श्रीरामांना वन्दन करतो. 'श्रीरामार्च्चन-चन्द्रिके'त श्रीरघुनाथांच्या जन्मोत्सव-प्रसंगात पाहिले जाते की,—"चैत्र शुक्ल नवमीला जेव्हा सूर्य, मंगळ, बृहस्पती (गुरू), शुक्र आणि शनी हे पाच ग्रह आपापल्या उच्च-स्थानात अवस्थित होते, बृहस्पती (गुरू), चंद्राच्या सोबत कर्क राशीत स्थित होते आणि सूर्य, मेष राशीत अवस्थित होते, पुनर्वसू नक्षत्र-युक्त त्यावेळी, अद्भुत गुण-रूप-विभूति-विशिष्ट अनिर्वचनीय (अवर्णनीय) मुख्यतेज भगवान् श्रीरामचंद्र समस्त राक्षस-कुल रूपी लाकडाच्या समूहाला (सरपणाच्या ढीगाला) जाळण्यासाठी अतिपवित्र अयोध्या रूपी यज्ञ-काष्ठातून (यज्ञाच्या लाकडातून) आविर्भूत झाले होते."

'विष्णुधर्मोत्तर'-ग्रंथात राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न यांना क्रमशः वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध यांच्या अवताराच्या रूपात निर्देशित केले गेले आहे. पुन्हा पद्म पुराणात रामांना नारायण, भरत आणि शत्रुघ्न यांना शंख आणि चक्र व लक्ष्मणांना शेषनागाच्या रूपात कीर्तन (वर्णन) केले गेले आहे. 'वैवस्वत'-मन्वंतरात चोविसाव्या चतुर्युगाच्या त्रेतायुगात, परब्रह्म श्रीरामचंद्र, महाराज दशरथांपासून कौशल्येच्या गर्भात आविर्भूत झाले होते. —(*लघुभागवतामृत*)

## *श्रीरामचंद्रांची जन्म-तिथी*

चैत्र महिन्याच्या शुक्ल नवमीला श्रीरामचंद्रांचा जन्म आहे. शास्त्रकारांच्या अनुसार त्यांच्या आविर्भावाची (प्रकट होण्याची किंवा जन्माची) वेळ मध्यान्ह आहे. आम्ही अगस्त्य संहिता (२८/१,३-४) मध्ये पाहू शकतो—

**चैत्रे मासि नवम्यान्तु जातो रामः स्वयं हरिः।
श्रीरामनवमी प्रोक्ता कोटिसूर्यग्रहाधिका।
चैत्रशुक्ला तु नवमी पुनर्वसुयुता यदि॥
तेन 'मध्याह्नयोगेन' महापुण्यतमा स्मृता॥**

अर्थात चैत्र महिन्याच्या शुक्ल नवमीला भगवान श्रीहरी श्रीरामचंद्रांच्या रूपातच आविर्भूत झाले होते. श्रीरामनवमी कोटी सूर्य–ग्रहणांपेक्षा अधिक फलदायिनी (फळ प्रदान करणारी) म्हटली जाते. चैत्र महिन्याच्या शुक्ल–नवमी तिथीला, 'मध्यान्ह' (सूर्य माथ्यावर येतो तो दिवसाचा तिसरा प्रहर) जर पुनर्वसु–नक्षत्र युक्त असेल, ती तिथी महापुण्यतमा होते.

## *श्रीरानवमी–व्रत पालन करण्याचे फायदे तसेच न पालन करण्याचे तोटे*

पालन करण्याचे फळ—

**मुमुक्षवोऽपि हि सदा श्रीराम–नवमीव्रतम्।**
**न त्यजन्ति सुरश्रेष्ठो देवेन्द्रोऽपि विशेषतः॥**
**तस्मात् सर्वात्मना सर्वे कृत्वैवं नवमी–व्रतम्।**
**मुच्यते सर्वपापेभ्यो याति ब्रह्म सनातनम्॥**

—*(अगस्त्य संहिता २७/३६–३७)*

अर्थात जे लोक मुक्तीची कामना करतात ते, अधिक काय सगळेच देव व देवता आणि येथपर्यंत की स्वतः देवराज इंद्रदेखील या श्रीरामनवमी–व्रताचा परित्याग करीत नाही. म्हणून सर्वच लोक पूर्ण रूपाने या रामनवमी–व्रताचे अनुष्ठान करून सर्व पापांतून मुक्त होऊन सनातन ब्रह्माला प्राप्त करतात.

न पालन करण्याचे अफल (न पालन करण्याची निष्फळता), यथा—

**प्राप्ते श्रीरामनवमी–दिने मर्त्यो विमुढधीः।**
**उपोषणं न कुरुते कुम्भीपाकेषु पच्यते॥**

—*(अगस्त्य संहिता २७/९)*

**यस्तु रामनवम्यान्तु भुंक्ते मोहाद्विमूढधीः।**
**कुम्भीपाकेषु घोरेषु पच्यते नात्र संशयः॥**

—*(अगस्त्य संहिता २८/८)*

अर्थात जी मूर्ख व्यक्ती, श्रीरामनवमीचा दिवस येऊनही त्या दिवशी उपवास करित नाही, ती कुंभीपाक नरकात सडून मरते. मूर्ख लोकांनी जर मोहाने वश होऊन रामनवमीच्या दिवशी भोजन केले तर ते घोर कुंभीपाक नरकात सडतील, याच्यात काहीही संशय नाही आहे.

उक्त चार श्लोकांद्वारे प्रमाणित होते की प्रत्येक वैष्णवासाठीच रामनवमी व्रताचे पालन करणे कर्तव्य आहे; न केल्यास नुकसान

होते, हे देखील दाखविले गेले आहे.

## *'श्रीरामनवमी'-व्रताचे माहात्म्य*

अगस्त्य-संहितेत म्हटले गेले आहे—'श्रीरामनवमी-व्रत कोट्यवधी सूर्यग्रहणांपेक्षा देखील अधिक (श्रेष्ठ) आहे; त्या महापवित्र दिवशी भक्तीने श्रीरामचंद्रांच्या उद्देश्याने थोडेसे कर्म केलेतरी ते संसारातून मुक्तीचे कारण बनून जाते. जे आळसाचा त्याग करून श्रीरामनवमीच्या दिवशी उपवास करतात, ते पुन्हा मातृगर्भात प्रवेश करित नाहीत. परंतु (किंबहुना) त्यांची श्रीरामचंद्रांच्या प्रिय भक्ताच्या रूपात गणना होते. मनुष्यांद्वारे भक्तीने एक श्रीरामनवमी व्रताचा उपवास केल्याने ते, पूर्वीचे (मागील जन्मजन्मांतरातील) कर्मे आणि समस्त पापांपासून विमुक्त होऊन जातात. म्हणून सर्व लोक, प्रत्येक प्रकारे, शरीर-मन-वाणीच्या द्वारे, हा श्रीरामनवमीचा व्रतोपवास करून, सर्व पापांपासून मुक्त होऊन सनातन ब्रह्म श्रीरामचंद्रांना प्राप्त होतात.

श्रीरामचंद्रांच्या वनवास काळात 'दंडक'-वनात मुनींनी त्यांचे दर्शन करून जेव्हा त्यांना पतीच्या रूपात प्राप्त करण्याची इच्छा व्यक्त केली, तेव्हा एक-पत्नी-व्रतधारी भगवंतांनी, त्यांची ती कामना पूर्ण करण्यासाठी बहु-वल्लभा-वल्लभ (अनेक प्रेयसींचे प्रियकर) श्रीकृष्णचंद्रांच्या प्रिय गोपींच्या रूपात, त्यांना स्वीकार केले. म्हणून श्रीरामनवमी-व्रतोपवासाच्या द्वारे भगवान श्रीरामचंद्रांना संतुष्ट केल्यावर श्रीकृष्ण-लीलेत प्रवेश करण्याचा अधिकार प्राप्त करणे बिलकुल असंभव नाही आहे.

## श्रीरामनवमी-व्रत-विधी हरिभक्तिविलासात द्रष्टव्य

आधी उल्लेखित झाले आहे की, मध्यान्ह योगात पुनर्वसू नक्षत्र-युक्त असल्यास हा दिवस महापुण्यतम होऊन जातो. हरिभक्तिविलास (१४/१७) द्वारे आम्हाला माहिती मिळते—

**शंखपात्रासनार्च्चांच कुर्यादमामेष्वतन्त्रितः।**
**यामे द्वितीये संपूज्य मध्याह्ने जन्मभावयेत्॥**

शंख, पात्र आणि आसन—प्रत्येक यामात (प्रहरात) या सर्वांची अवश्य पूजा करावी. द्वितीय यामात अशा प्रकारे पूजा करून मध्यान्हात जन्माचे चिंतन करावे (जन्माचे स्मरण करावे).

हरिभक्तिविलासात प्रत्येक यामात कशा प्रकारे व्रत करायला हवे

—हे सांगितले आहे. आणि व्रतात काय-काय करणे कर्तव्य आहे —या संबंधी देखील संपूर्ण रूपात चाळिसाव्या अध्यायात वर्णन करण्यात आले आहे. प्रबंध विस्तृत होण्याच्या भयाने त्याचा उल्लेख करत नाही आहे. व्रत पालनाचे इच्छुक वैष्णव वृंद, पूज्यपाद श्रील सनातन गोस्वामींच्या 'हरिभक्तिविलास'च्या चौदाव्या विलासातील (अध्यायातील) श्रीरामनवमी प्रसंगाची विशेष भावनेने चर्चा करतील.

## *'श्रीराम-नवमी' व्रतकाल निर्णय*

**नवमी चाष्टमीविद्धा त्याज्या विष्णुपरायणैः।**
**उपोषणं नवम्यां वै दशम्यामेव पारणम्॥**

—*(हरिभक्तिविलासधृत अगस्त संहिता २८/१४)*

अर्थात, विष्णुपरायण वैष्णवगण अष्टमी-विद्धा नवमीचा परित्याग करून नवमीला उपवास तथा दशमीलाच पारणे करतील. **येथे दशमीला पारणे करण्यावर जोर दिसून येतो.** अर्थात दशमीला पारण करणे जरुरी आहे म्हणून नवमीचा उपवास जर अष्टमी-विद्धा जरी असेल, तरी देखील त्या विद्धा दिवसातच वैष्णवांद्वारे उपवास करणे कर्तव्य आहे. परंतु जर एकादशीच्या उपवासात बाधा नसेल तर अष्टमी-विद्धा नवमीला कोणत्याही प्रकारे उपवास होणार नाही. म्हणून हरिभक्तिविलासात म्हटले गेले आहे—

**दशम्यां पारणायाश्च निश्चयान्नवमीक्षये।**
**विद्धापि नवमी ग्राह्या वैष्णवैरप्यसंशयम्॥**

—*(हरिभक्तिविलास १४/९१)*

अर्थात, दशमीला पारणाच्या निश्चयतेमुळे (निश्चिततेमुळे) नवमी क्षय झाल्यावर वैष्णवगण देखील विना कोण्या संशयाने उपवासाच्या संबंधी अष्टमी-विद्धा नवमीला ग्रहण करतील.

## *श्रीरामनवमी-व्रत-विधी*

चैत्र मासाच्या (महिन्याच्या) शुक्ल पक्षात अष्टमीला संयत-चित्त राहून दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी (पहाटे) दंत-धावन करून (दंत-मार्जन करून, म्हणजे दात घासून), यथाविधी स्नान, संध्या इत्यादी समस्त कर्मे शीघ्र पूर्ण केली पाहिजेत. यानंतर मंदिरात भगवंताच्या समक्ष व्रतोपवास-पालनाचा संकल्प ग्रहण करावा—

**"उपोष्या नवमी त्वद्य यामेष्वष्टासु राघव।**
**तेन प्रीतो भव त्वम्भोः संसारात् त्राहि मां हरे॥"**

अर्थात हे राघव, आज मी आठ-प्रहर नवमीचा उपवास करीन. या व्रताच्या द्वारा आपण माझ्याप्रती प्रसन्न व्हावे. हे श्रीहरी मला संसार सागरातून मुक्त करावे.

याच्या नंतर सपार्षद भगवान् श्रीरामचंद्रांच्या श्रीविग्रह किंवा चित्रपटाला नाना प्रकारे पत्र-पुष्प (पाने व फुले) यांनी सजवून, श्रीराम नवमी व्रत-माहात्म्य आणि दिव्य रामकथा, भक्तांसोबत श्रवण, कीर्तन आणि स्मरण करीत-करीत मध्यान्ह वेळी (दुपारी बारा वाजता) भगवंतांच्या जन्म-लीलेचे स्मरण करावे.

जन्म-भावन-विधि—

**"उच्चस्थे ग्रहपंचके सुरगुरौ सेन्द्रौ नवम्यां तिथौ**
**लग्ने कर्कटके पुनर्वसुयुते मेघं गते पूषणि।**
**निदग्धुं निखिलः पलाश-समिधो मेध्यादयोध्यारणे-**
**राविर्भूतमभूदपूर्वविभवं यत्किंचिदेकं महः॥"**

अर्थात "चैत्र-शुक्ला नवमीला जेव्हा सूर्य, मंगल, बृहस्पती, शुक्र आणि शनी हे पाच ग्रह आपापल्या उच्च-स्थानात अवस्थित होते, बृहस्पती, चंद्रासोबत कर्क राशीत स्थित होते आणि सूर्य मेष-राशीत होते, पुनर्वसू नक्षत्राने युक्त त्यावेळी अद्भुत गुण-रूप-विभूति-विशिष्ट अवर्णनीय मुख्यतेज भगवान् श्रीरामचंद्र समग्र राक्षस-कुल रूपी लाकडाच्या ढीगाला जाळण्यासाठी अतिपवित्र अयोध्या रूपी यज्ञकाष्ठातून आविर्भूत झाले होते."

अशा प्रकारे विभिन्न स्तव-स्तुतींच्या द्वारे भगवंतांच्या महिमेचे संकीर्तन करीत पूजा-अभिषेक, पुष्पांजली आणि भोग निवेदन करावा. आळशीपणाचा त्याग करून निरंतर प्रत्येक प्रहरात भगवंतांना वारंवार पुष्पांजली अर्पण करीत दिव्य भगवत्-कथेत दिवस तसेच रात्र व्यतीत करावी.

दुसऱ्या दिवशी नित्यकर्म संपन्न करीत यथाविधी भगवान श्रीरामचंद्रांचे अर्चन करून त्यांची जय-ध्वनी देत भक्तांसोबत महाप्रसाद सेवन करावा.

प्रभूंच्या तोंडावरील लव सोन्याच्या समान आहेत आणि डोक्यावरील केससुद्धा सोनेरी वर्णाचेच आहेत. आणि स्वतः प्रभूदेखील नखशिखांत सोनेरी वर्णमयच आहेत. हे सर्व लक्षण श्रीचैतन्यदेवांतच आढळतात. म्हणून या श्रुतीत (छांदोग्यपनिषदात) त्यांच्या अवताराचा बोध होतो.

# श्रीनृसिंह चतुर्दशी

**"प्रह्लाद-हृदयाह्लादं भक्ताविद्याविदारणम्।**
**शरदिन्दुरुचिं वन्दे पारीन्द्रवदनं हरिम्॥"**

*—श्रीश्रीधर स्वामी*

'जे प्रह्लादांच्या हृदयात घनीभूत आनंदाच्या रूपात विराजमान आहेत आणि भक्तांच्या अविद्येचा नाश करणारे आहेत, ज्यांची शरत्कालीन (शरद ऋतूतील) पूर्णचंद्राच्या समान अंग-कांती आहे, त्या सिंहवदन श्रीहरींना वंदन करतो.'

वैशाख शुक्ल चतुर्दशी महातिथीला संध्याकाळी, प्रह्लादांच्या प्रती अत्याचार सहन न करता आल्यामुळे परमपुरुष श्रीहरी तत्काळ त्रास-सृष्टिकारी अतिभीषण शब्दाने (आवाजाने) सर्वांना चकित करीत लीला-वेशात स्तंभातून (खांबातून) आविर्भूत झाले होते. —(हरिभक्तिविलास धृत आगमवाक्य). म्हणून 'नृसिंह-चतुर्दशी' चा आशय विशेष रूपाने प्रह्लाद-पालक तथा हिरण्यकश्यपु-नाशक —श्रीनृसिंहदेवांच्या आविर्भावालाच समजले आहे. परंतु पद्म पुराण इत्यादी मध्ये विविध वर्ण, आकृती आणि कृती-विशिष्ट भगवान् नृसिंहदेवांचे वर्णन पाहिला मिळते.

## *श्रीनृसिंह-चतुर्दशी व्रतोपवास अवश्य पालनीय*

बृहन्नारसिंह-पुराणात प्रह्लादांना स्वतः श्रीनृसिंहदेवांनी आपल्या श्रीमुखातूनच या व्रतोपवासाचे वर्णन ऐकविले आहे—'प्रह्लाद! संसार भयाने ग्रस्त मानवांना दर वर्षीच या अतिगोपनीय व्रत-राज (व्रतांचा राजा असणाऱ्या) चतुर्दशी-व्रताचे अनुष्ठान करायला हवे. माझ्या या विशेष दिवसाला जाणून देखील जी व्यक्ती उल्लंघन करते, तिला चंद्र-सूर्य असेपर्यंत नरकात वास करावा लागतो. प्रत्येक मानवच या व्रतानुष्ठानाचा अधिकारी आहे, विशेष रूपाने माझे भक्तगण आणि माझ्याप्रती निष्ठायुक्त व्यक्तींसाठी हे अवश्य पालनीय आहे.'

## *व्रत-माहात्म्य*

उक्त पुराणातच या व्रतोपवासाच्या माहात्म्य-प्रसंगात सांगितले गेले की, प्राचीन काळात अवंती-नगरात वसुशर्मा नामाचे एक वेदज्ञ ब्राह्मण राहात होते. कोणत्याही प्रकारच्या दुष्कर्मात प्रवृत्त न होता ते नियमपूर्वक समस्त प्रकारच्या वैदिक क्रियांमध्ये रत राहात होते. म्हणून देवतागण त्यांच्यावर अत्यधिक संतुष्ट होते. दुसरी कडे

सुशीला नावाची त्यांची पत्नी सदाचार आणि पातिव्रत्य-धर्मात सुविदिता (चांगलीच जाणकार आणि तरबेज) होती. त्यांना क्रमशः (एक पाठोपाठ एक असे) पाच पुत्र झाले—ते सर्व पितृ-भक्त, सदाचार-संपन्न आणि सुविद्वान होते.

परंतु त्यांच्यापैकी 'वसुदेव' नामक सर्वात छोटा मुलगाच बिघडलेला निघाला. तो एका वेश्येच्या प्रती आसक्त होऊन हळू-हळू मद्यपान आणि विभिन्न पाप कर्मांत लिप्त होऊ लागला. म्हणून त्याच्या द्वारे कोणत्याच प्रकारचे अध्ययन देखील संभव झाले नाही. शेवटी त्या विलासिनीचे घरच त्याचे निवास स्थळ बनले. एके दिवशी कोण्या कारणास्तव दोघांमध्ये खूपच भांडण झाले आणि दोघांनीही क्षुब्ध होऊन काहीही न खाता सारी रात्र जागून काढली. सौभाग्याने त्याच दिवशी भगवान् श्रीनृसिंहदेवांची आविर्भाव-तिथी (जयंती) होती. म्हणून अज्ञानतेच्या वश होऊन त्या महान पुण्यंवंत व्रतराजाचे अनुष्ठान झाल्याने त्याचा देह शुद्ध होऊन गेला. उक्त वेश्येने देखील अज्ञानतेच्या वशात ते व्रत केल्यामुळे त्रिभुवनात सुखचारिणी, येथपर्यंत की श्रीनृसिंहदेवांची प्रियपात्री सुद्धा बनली. आणि तो वेश्या-आसक्त वसुदेव भगवान् श्रीनरहरींच्या प्रती उत्तमा भक्ती लाभ (प्राप्त) करून, परवर्त्ती (पुढील) जन्मात प्रह्लाद नामाने विश्वविख्यात झाले.

या व्रताचे अनुष्ठान करूनच देवगण देवलोकात आनंद भोग करतात. ब्रह्मदेव याच उत्तम व्रताच्या प्रभावानेच चराचर जगताची (विश्वाची) सृष्टी करतात. महेश्वर (शंकर) देखील या व्रताचे अनुष्ठान करून श्रीनृसिंहदेवांच्या अनुग्रहाने (कृपेने) त्रिपुरांचा ('मय' नामक दानवाद्वारे निर्मित सुवर्ण, चांदी आणि लोखडांच्या तीन नगरांचा) विनाश करण्यात सफल झाले होते. अन्यान्य बऱ्याच देवता, प्राचीन ऋषी आणि महामती (महान बुद्धिमान) राजांनी या व्रताच्या प्रभावाने आपापल्या कार्यामध्ये सिद्धी लाभ केली आहे. या व्रताचा महिमा त्रिभुवनात व्याप्त आहे.

या व्रताचे अनुष्ठान केल्याने परत कधीही संसारात (जगात) यावे लागत नाही; परत पुत्रहीनाला (निपुत्रिक व्यक्तीला) भगवद्-भक्ति-युक्त पुत्राची प्राप्ती, दरिद्री-व्यक्तीला धनाची प्राप्ती, तेजस्कामीला (तेजाची कामना करणाऱ्यास) तेजाची प्राप्ती, आयुष्कामीस (लांब आयुष्याची कामना करणाऱ्यास) आयूची (लांबलचक आयुष्याची) प्राप्ती, राज्याकांक्षीला राज्य-लाभ होतो.

स्त्रियांसाठी हे व्रत चरित्रवान पुत्र-दायक, सौभाग्यजनक, अवैधव्यकर (ज्यामुळे विधवा व्हावे लागत नाही), पुत्रशोकनाशक, धन-धान्यप्रद आणि पतिप्रियकर आहे. सर्व नर-नारीच या व्रताच्या प्रभावाने सुख प्राप्त करतात आणि शेवटी मुक्ती लाभ करतात.

या व्रताचा इतका महिमा आहे की, स्वतः भगवान श्रीहरी किंवा शिव-ठाकूर (परम-वैष्णव शंकर) देखील याचे कीर्तन शेष (पूर्णपणे) करू शकत नाहीत. ब्रह्मदेवांनी जरी आजीवन चारी मुखांनी याचे कीर्तन केले तरीदेखील या व्रताचा महिमा पूर्ण करण्यास ते समर्थ होत नाही. या व्रतानुष्ठानाच्या प्रभावाने पापांत आसक्त असणाऱ्या व्यक्तीची मती देखील चुकीच्या मार्गावर जात नाही. महात्मा व्यक्तींनी या व्रताचे पालन केल्यास हजारो द्वादशी-व्रतांचे फळ प्राप्त होते. भक्तिपूर्वक या व्रताविषयी श्रवण केल्याने ब्रह्म-हत्या जनित (ब्राह्मणाचा खून केल्याने उत्पन्न झालेले) पाप नष्ट होऊन जाते आणि कीर्तनाने साऱ्या अभीष्ट वस्तू प्राप्त होतात.

## *व्रतोपवासाचा काल निर्णय*

'स्वाती'-नक्षत्र, शनिवार आणि सिद्धयोग--या सर्वांच्या समन्वयाने श्रीनृसिंह-चतुर्दशी-व्रत झाल्यावर ते कोट्यवधी हत्यांपासून उत्पन्न पापाला विनष्ट करून टाकते. मग मंगळवारी चतुर्दशी असल्यावर ते व्रतानुष्ठान समस्त पापांना नष्ट करून टाकते. वर सांगितलेले समस्त योग नसले तरी केवळ मात्र शुद्धा चतुर्दशीलाच उपवास करावा. परंतु त्रयोदशी विद्धा चतुर्दशीला उपरोक्त समस्त योग असूनही त्या दिवशी वैष्णवांनी उपवास करू नये.

श्रीनृसिंह चतुर्दशीच्या आदल्या दिवशी, यथाविधी संयमित राहून, व्रताच्या दिवशी प्रातःकाळी दंत-धावन (दात घासणे), स्नान, संध्या इत्यादी कार्ये उरकून भगवान् श्रीनृसिंहदेवांचे स्मरण करीत व्रताचे नियम ग्रहण करावे—

**"श्रीनृसिंह महाभीम दयां कुरु ममोपरि।**
**अद्याहं ते विधास्यामि व्रतं निर्विघ्नतां नय॥"**

अर्थात, 'हे श्रीनृसिंहदेव, आज मी तुमच्या व्रताचे पालन करीन. हे महाभीम, तुम्ही माझ्यावर दया करा—या व्रताला निर्विघ्न रूपाने संपन्न करवावे.' अशा प्रकारे संकल्प ग्रहण करावा. व्रती व्यक्तीने निराहार राहून, व्यर्थ-वाक्य (विनाकारण बोलणे), पापी व्यक्तींसोबत वार्तालाप (संभाषण), स्त्रियांसोबत संभाषण, द्युतक्रीड़ा (जुगार) इत्यादीचे वर्जन करावे. भगवंतांचा श्रीविग्रह किंवा चित्राला सुंदर

रूपाने सजवून त्यांना पुष्पांजली अर्पण करून, त्यांच्या समक्ष शास्त्रांतून व्रत-महिमा, पवित्र नृसिंह-कथेचे श्रवण, कीर्तन आणि नाम-संकीर्तन करावे.

अशा प्रकारे सारा दिवस घालवून संध्याकाळी ज्या वेळी भगवान स्तंभातून आविर्भूत झाले होते, तो काळ उपस्थित झाल्यावर नाम-संकीर्तन आणि दिव्य स्तव-स्तुती करीत-करीत भगवंताचा विशेष पूजाभिषेक करावा. भगवंतांच्या चरणांवर पुष्पांजली, कालानुसार-उपलब्ध द्रव्यांद्वारे विशेष भोगराग (प्रेमपूर्वक नैवेद्य) निवेदन, आरती इत्यादी यथाविधी संपन्न करावे. यानंतर नृत्य, गीत, वाद्य आदींच्या सोबत नाम-संकीर्तन तथा भगवत्-कथा, श्रवण-कीर्तन करून रात्रीचे जागरण करावे. प्रातःकाळी स्नान करून नियमपूर्वक भगवंतांचे अर्चन करावे. यानंतर श्रेष्ठ वैष्णव आणि ब्राह्मणांना भोजन करवून भगवंतांचे चिंतन करीत-करीत परिजनांसोबत (बंधू, भगिनी, मित्र, परिवार व आप्तेष्ट यांच्यासोबत) महाप्रसादाचे सेवन करावे.



भक्तप्रवर श्रीवास पण्डित आपल्या घरातील मंदिरात श्रीनृसिंह भगवंतांची पूजा करित होते. अकस्मात श्रीशचीनंदन गौरहरी त्या वेळी तेथे उपस्थित झाले आणि पंडित श्रीवासांचे नाव घेत-घेत हाक मारू लागले. श्रीवास पंडितांनी बाहेर डोकावून पाहिले तर पाहातच राहिले. पाहाता पाहाता श्रीशचीनंदन गौरहरींनी शंख, चक्र, गदा, पद्म धारण करून दिव्य चतुर्भुज नृसिंह रूप धारण केले. पंडित प्रेमाने व्याकूळ होऊन त्यांची विधिवत पूजा करीत विभिन्न नृसिंह मंत्र आणि स्तोत्रांनी त्यांची स्तुती करू लागले. त्यांच्या स्तुती आणि पूजेने प्रसन्न होऊन त्यांना वरदान देऊन पुन्हा हसत श्रीशचीनंदन विश्वंभरांच्या रूपात प्रकट झाले. श्रीवास पंडित त्यांच्या चरणकमळांवर पडून लोळू लागले.

# श्रीबलदेव पूर्णिमा

श्रीहरिभक्तिविलास ग्रंथ इत्यादी मध्ये श्रीबलदेव प्रभूंच्या संबंधात व्रताचा उल्लेख नसला तरीही गौडीय महाजनांच्या (श्रेष्ठ साधूंच्या) अनुभव आणि विचारानुसार श्रावण महिन्यातील पूर्णिमेला श्रीबलदेव प्रभूंच्या आविर्भावाच्या (जयंतीच्या) निमित्ताने श्रीबलदेव-व्रतोपवास साधक-भक्तांना अवश्य करायला हवा. श्रीबलदेव प्रभूच श्रीगौर अवतारात परम दयाळू श्रीमान नित्यानंद प्रभू आहेत; त्यांच्या कृपेशिवाय श्रीगौरहरी आणि श्रीराधाकृष्णांच्या चरणकमळांची प्राप्ती बिलकुलच असंभव (अशक्य) आहे—**"हेन निताई बिने भाई, राधाकृष्ण पाइते नाई, दृढ करि' धर निताइयेर पाय।"** (हे बंधू! जरा ऐका! अशा परम कृपावंत निताईंच्या मदतीशिवाय श्रीश्रीराधाकृष्णांना प्राप्त करणे कठीणच नाही तर पूर्णतः असंभव आहे. म्हणून मनाचा ठाम निश्चय करून श्रीनित्यानंदांचे चरण पकडावे).

म्हणून गौडीय महाजनांच्या निर्देशानुसार साधक-भक्तगण अतिशय प्रयत्नपूर्वक (तसेच काळजीपूर्वक) श्रीमान नित्यानंद प्रभू आणि श्रीबलदेव प्रभूंच्या आविर्भावाच्या वेळी व्रतोपवास पालन करून, त्यांच्या अहैतुकी (मातेसारख्या निष्कपट व पाऊस देणाऱ्या ढगांसारख्या निष्कारण) कृपेची प्रार्थना करतात.

## *श्रीबलदेव-तत्त्व आणि महिमा*

व्यासावतार श्रीश्रील वृंदावन दास ठाकुरांनी आपल्या 'श्रीचैतन्य भागवत'-ग्रंथात श्रीनित्यानंद प्रभू आणि श्रीबलदेव प्रभूंच्या महिमेचे विशेष रूपाने विस्तारपूर्वक कीर्तन केले आहे. जगद्गुरू श्रीश्रील भक्तिसिद्धान्त प्रभुपादांनी उपरोक्त ग्रंथावरील आपल्या 'गौडीय भाष्या'त त्या समस्त महिमेचे विस्तारपूर्वक स्पष्टीकरण दिले आहे. त्याची चर्चा केल्यावर श्रीबलदेव-तत्त्व, त्यांचे माहात्म्य आणि त्यांच्या आविर्भाव तिथीचा महिमा इत्यादीचा अनुभव संभव होईल.

'स्वयंरूप' श्रीगौरकृष्णांचे अभिन्न 'स्वयंप्रकाश' श्रीनित्यानंद-बलदेव प्रभूच 'मूल-संकर्षण' आहेत. तेच— 'संकर्षण' आणि 'कारणाब्धिशायी'-'गर्भोदकशायी'-'क्षीरोब्धिशायी' तिन्ही पुरुषावतार आणि सहस्त्र फणायुक्त 'अनंतदेव' किंवा शेष', या विष्णुतत्त्व-वर्गाचे मूळ आकर (उत्पत्ती-स्थान किंवा स्त्रोत) किंवा अंशी आहेत.

"श्रीनित्यानंद-संकर्षण प्रभू स्वयं विष्णु-परतत्त्व वस्तू आहेत, म्हणून समान धर्मवशतः 'स्वयंरूप' श्रीकृष्णांचेच प्रकाश-विशेष

आहेत. अर्थात समग्र चित्सत्ता किंवा शुद्ध-सत्वाचा प्रकाश करणाऱ्या 'संधिनी'-शक्तीचे अधिष्ठातृ-देवताच—श्रीनित्यानंद-बलराम आहेत."

**"अतएव आगे बलरामेर स्तवन। करिले से-मुखे स्फुरे चैतन्य-कीर्तन॥"** (*चैतन्य भागवत आदि-लीला १/१४*) (अर्थात सर्वप्रथम बलरामांचे स्तवन म्हणजे स्तुती केल्यावर) त्याच मुखातून चैतन्य-कीर्तन स्फुरते. "सात्त्वत-शास्त्राचे विग्रह स्वरूप श्रीमान नित्यानंद-बलरामांचे स्तवन अर्थात नाम-गुणानुकीर्तनाच्या फळानेच जिवांची अविद्या-जनित (अविद्येतून जन्मलेली) अचेतन-'उपाधी' किंवा बंधन नष्ट होते. तेव्हा शुद्ध-जीव श्रीनित्यानंदांना गुरू मानून त्यांच्याच आनुगत्यात अप्राकृत सेवोन्मुख (सेवेसाठी उन्मुख किंवा तयार असलेल्या) जिभेने आपल्या अभीष्ट-दैवत असणाऱ्या श्रीकृष्ण चैतन्यांचे कीर्तन करतो."

"जे मोक्षाचे इच्छुक सर्व व्यक्ती, श्रीगुरुदेवांच्या मुखातून श्रीअनंतदेवांचे गुणचरित्र श्रवण करून पूर्ण रूपाने त्यांचे ध्यान करतात, श्रीअनंतदेव त्यांच्या सत्त्व-रज-तमो-गुणमय हृदयात प्रविष्ट होऊन अनादी काळापासून संचित कर्मवासना-जनित संसाराला (भौतिक जगातील वारंवार होणाऱ्या जन्म आणि मृत्यूच्या चक्राला) शीघ्रच नष्ट करून टाकतात."

**"आर कब निताई चाँदेर करुणा हइबे। संसार-वासना मोर कबे तुच्छ हबे॥"** (केव्हा श्रीनित्यानंद प्रभूंच्या कृपेने माझ्या हृदयातील सांसारिक वासना दूर होतील?)—(श्रीनरोत्तम ठाकूर)

"शिवांचे (शंकरांचे) अंतर्यामी आहेत—श्रीसंकर्षण प्रभू! पार्वती आदींच्या सोबत महेश (शंकर), श्रीसंकर्षण प्रभूंचे आपल्या अभीष्ट-देवतेच्या रूपात नित्यकाळ स्तव (स्तुती) आदी द्वारा आराधना करतात (—श्रीमद्भागवत ५/१७/१६-२४ हे श्लोक पाहावे). म्हणून जे मूल संकर्षण श्रीनित्यानंद-बलदेव प्रभूंच्या चरित्राचे श्रवण किंवा कीर्तन करतात, महेश आणि पार्वती त्यांना आपल्या आराध्य देवतेचा सेवक समजून त्यांच्याप्रती संतुष्ट होतात."

**"जे श्रीबलदेवांना विषय-विग्रह-तत्त्व अर्थात श्रीविष्णु-तत्त्व न मानता त्यांच्या भोक्तृत्वाला (भोग करण्याच्या धर्माला) अस्वीकार करण्याचा प्रयास करतात, ते अनभिज्ञतेच्या (अजाणतेच्या) दोषाचे गुन्हेगार (अपराधी) ठरतात."** श्रीमद्भागवताच्या दहाव्या स्कंधाच्या ३४ व्या आणि ६५ व्या अध्यायात आणि पाचव्या स्कंधातील १७व्या आणि २५ व्या अध्यायात, सहाव्या स्कंधाच्या १६ व्या अध्यायात समस्त जिवांचे सेव्य-तत्त्व श्रीबलराम अथवा संकर्षणांची

महिमा व्यक्त झाली आहे. **त्यांच्याप्रती जे लोक उदासीन राहातात, ते देखील भक्ति-मार्गात उन्नती करून शकत नाहीत. ते आपल्या मनोधर्मापासून उत्पन्न मायिक विचारांमुळे अप्राकृत विष्णू-तत्त्वाचे आकर (स्त्रोत किंवा उत्पत्ती-स्थान)-स्वरूप श्रीबलराम किंवा संकर्षण-तत्त्वात प्रवेश करण्यास असमर्थ होतात.**"—(श्रीश्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपाद).

'संधिनी'-शक्तीचे अधिष्ठाता श्रीबलदेव-प्रभूंपासूनच श्रीकृष्णांची समस्त सेवा-उपकरणे आणि सकल 'सेवक'-तत्त्वाचा प्रकाश आहे. म्हणून त्यांच्या कृपेशिवाय श्रीकृष्णांच्या सेवेत नियुक्त होऊ शकणे असंभव आहे. मग **"नायमात्मा बलहीनेन लभ्यः"**—अर्थात 'चिद्-बलहीन कोणतीही व्यक्ती भगवंतांना प्राप्त करू शकत नाही'—या उपनिषद वाक्यात पाहिले जाते की, जीव चिद्बलाच्या अभावातच मायेद्वारे वश-योग्य होऊन जातो. म्हणून सुबुद्धिमान व्यक्ती गुरुतत्त्वाचे आधार-स्वरूप आणि विष्णु-तत्त्वाचे अंशी-स्वरूप आणि सर्व-चिद्बलाचे आधार-स्वरूप त्या बलदेव प्रभूंच्या शरणागत होतात आणि त्यांच्याकडूनच ते चिद्बलात संचारित होऊन गुणमय मायेला अतिक्रम करून 'निर्गुण'-अवस्था लाभ करतात आणि अभीष्ट भगवद् सेवा प्राप्त करून धन्यातिधन्य होतात. म्हणून भजन-चतुर व्यक्ती मात्रच बलदेव-पूर्णिमेला आदराने व्रतोपवास पालन करीत श्रीबलदेव प्रभूंच्या संतोष विधानात व्रती होतात.

## *श्रीबलदेवांची आविर्भाव-लीला*

'वैवस्वत'-मन्वंतराच्या अठ्ठाविसाव्या चतुर्युगात द्वापर आणि कलियुगाच्या संधि-क्षणात, एकोणिसावे अवतार भगवान श्रीबलराम आणि विसावे अवतार भगवान् श्रीकृष्णांनी वृष्णिवंशात (यदुवंशात) अवतीर्ण होऊन पृथ्वीचा भार हरण केला होता. श्रीबलदेवांनी पहिले देवकी देवींच्या सप्तम गर्भात आविर्भूत होऊन सात मास अवस्थान केले होते. तेव्हा स्वतः भगवान श्रीकृष्णांनी योगमायेला असा आदेश दिला—

**"देवक्यां जठरे गर्भं शेषाख्यं धाम मामकम्।**
**तत् सन्निकृष्य रोहिण्या उदरे सन्निवेशय॥"**

*—(श्रीमद्भागवत १०/२/८)*

अर्थात, 'देवकींच्या गर्भात 'शेष' नामक माझा जो अंश अवस्थित आहे, त्याला आकर्षण करून रोहिणींच्या गर्भात स्थापित

करा.' श्रील विश्वनाथ चक्रवर्ती ठाकुरांनी या श्लोकाच्या व्याख्येत सांगितले आहे की,—"माझा अंश बलदेव आहे. त्यांना 'शेष' नामाने जाणले जाते, कारण ते आपलाच अंश असणाऱ्या 'शेषां'द्वारे पृथ्वीला धारण करतात. रोहिणी देवी या बलदेव-स्वरूपाची नित्य माता (आई) आहे. मी देवकींच्या गर्भात प्रविष्ट होईन, म्हणून त्यांनी आधीच देवकी मातेच्या गर्भात प्रवेश केला आणि शैय्या-आसन-स्वरूप आपला अंश असणाऱ्या 'शेषां'ना तेथे स्थापित करून त्यांनी स्वतः आपली माता रोहिणींच्या गर्भात प्रवेश केला."

योगमायेने श्रीहरींच्या आदेशाने देवकी देवींच्या त्या सप्तम गर्भाच्या सप्तम मासात (माघ मासात) उक्त गर्भाला श्रीरोहिणी देवींच्या गर्भात स्थानांतरित (स्थलांतरित) केले. श्रीरोहिणी देवी, त्यावेळी कंसाच्या भीषण, अत्याचाराने पीडित—श्रीवसुदेव महाराजांद्वारे प्रेरित होऊन, गोकुळातील नंदभवनात अवस्थान (निवास) करीत होत्या. त्यावेळी त्या देखील सप्तम मासाच्या गर्भवती होत्या. एक दिवस मध्यरात्री गाढ झोपेदरम्यान स्वप्नात आपल्या गर्भाला पडताना पाहून त्या शोक करू लागल्या. तेव्हा योगमाया त्यांना म्हणाली,—"हे शुभे, दुःख करू नका, देवकींचा गर्भ आकर्षित होऊन तुमच्या गर्भात स्थापित झाला आहे. म्हणून तुमच्या या पुत्राचे नाम होईल **संकर्षण.**"

श्रीबलदेव, श्री रोहिणी देवींच्या गर्भात सात महिने निवास करून, पुर्ण चौदा महिन्यांच्या गर्भवासानंतर श्रीकृष्णांचे अग्रजांच्या (मोठ्या भावांच्या) रूपात आविर्भूत झाले. श्रीचैतन्य-चरितामृत आदिलीलेत (५/१४९-१५४) श्रीबलदेवांच्या या अग्रज-भूमिकेचे (थोरले बंधूंचे रूप धारण करण्याचे) कारण वर्णित झाले आहे—

**"नित्यानन्द-स्वरूप पूर्वे हञा लक्ष्मण।**
**लघुभ्राता हञा करे रामेर सेवन॥**
**रामेर चरित्र सब,—दुखेर कारण।**
**स्वतंत्र-लीलाय दुःख सहेन लक्ष्मण॥**
**निषेध करिते नारे, जाते छोट भाइ।**
**मौन धरि' रहे लक्ष्मण, मने दुःख पाई॥**
**कृष्ण-अवतारे ज्येष्ठ हैइला सेवार कारण।**
**कृष्णके कराइल नाना सुख-आस्वादन।**
**राम-लक्ष्मण—कृष्ण-रामेर अंश-विशेष।**
**अवतारे-काले दोंहे दोहाँते प्रवेश॥**
**सेई अंश लञा ज्येष्ठ-कनिष्ठाभिमान।**

**अंशांशी–रूपे शास्त्रे करये व्याख्यान॥"**

(श्रीनित्यानंद–स्वरूप, पूर्व युगात लक्ष्मणांच्या रूपात आले. छोटे भाऊ बनून रामाची बरीच सेवा केली. श्रीरामांचे संपूर्ण चरित्र दुःखाने भरलेले आहे आणि स्वतंत्र लीलेत श्रीलक्ष्मणांनी त्या सर्व दुःखांना सहन केले. छोटा भाऊ असल्यामुळे ते श्रीरामांच्या कृतींचा निषेध करू शकत नव्हते, म्हणून मनातल्या मनात दुःख प्राप्त करून चूप राहात. (आपल्या या) सेवेमुळे कृष्णावतारात लक्ष्मण मोठे भाऊ बनून आले आणि श्रीकृष्णांची अनेक प्रकारची सेवा करून त्यांना सुखाचे आस्वादन करविले. राम–लक्ष्मण—कृष्ण–बलरामांचे अंश विशेष आहेत. श्रीकृष्ण अवताराच्या वेळी श्रीकृष्णांमध्ये राम आणि बलरामांत लक्ष्मणांनी प्रवेश केला. त्याच अंशाला घेऊन ज्येष्ठ–कनिष्ठ अभिमान विद्यमान राहातो, म्हणून शास्त्र अंशी आणि अंशाच्या रूपात व्याख्या करतात.)

श्रीजीव–गोस्वामी द्वारा रचित 'श्रीगोपाल–चंपू'–ग्रंथाच्या श्रीबलदेवांच्या आविर्भाव–प्रसंगाचे अशा प्रकारे वर्णन झाले आहे —**"अत योगमाया रोहिण्याः साप्तमासिक गर्भं स्त्रस्तं विधाय देवक्याः तद्विधं तं (गर्भं) तस्यां नियोजमास। ततश्च लब्ध सर्वसमय–सम्पद्देशे चतुर्दशे मासि श्रावणतः प्राक् श्रवणर्क्षे समस्त सुख–रोहिणी रोहिणी गुणगणनया सुषंमं सितसुषमं सुतं सुषाव॥"**

अर्थात योगमायेने रोहिणी–देवींच्या सप्तम महिन्याच्या गर्भाला नष्ट करून देवकी–देवींच्या सप्तम महिन्याच्या गर्भाला त्यांच्यात स्थापित केले. यानंतर समस्त शुभ–काळ–सूचक चौदाव्या महिन्यात, श्रावण महिन्याच्या प्रथम अर्ध भागात (पहिल्या पंधरवड्यात), श्रवण–नक्षत्र–युक्त काळात (अर्थात पूर्णिमेला) सर्व सुखे ज्यांना प्राप्त झाली आहेत अशा रोहिणींनी गुण–गण–समन्वित (अनेक उत्तमोत्तम गुण ज्यांच्यात विराजमान आहेत अशा) परमसुंदर श्वेत वर्णाच्या (पांढऱ्या रंगाच्या) एका पुत्राला जन्म दिला.

**"शुभ्रांशुवक्त्रं तडिदालि–लोचनं**
**नवाब्दकेशं शरदभ्र–विग्रहम्।**
**भानुप्रभावं तमसूत रोहिणी**
**तत्तच्च युक्तं स हि दिव्यबालकः॥"**

*(गोपाल चंपू पूर्व ३/७०)*

रोहिणींच्या गर्भातून पुत्र उत्पन्न झाला, त्यांचे चंद्राच्या समान श्रीमुखमंडल, विद्युतपुंजाच्या समान नयनज्योती, काळया ढगांसमान समान केशराशी, शरद काळातील मेघांच्या समान श्वेत वर्ण देह, सूर्याच्या समान तेज होते. हे समस्तच उपयुक्त आहे, कारण ते तर दिव्य-बालक (मूलसंकर्षण) आहेत.

या श्रावण-पूर्णिमेनंतर जो कृष्णपक्ष आरंभ झाला होता, त्याच्याच अष्टमी तिथीला पूर्णचंद्र श्रीकृष्णचंद्र, एक सोबत (संयुक्त रूपाने) श्रीयशोदा-माता आणि श्रीदेवकी-देवींच्या गर्भातून आठव्या महिन्यात आविर्भूत झाले. श्रीबलदेव श्रीकृष्णांपेक्षा फक्त सात दिवसांनी मोठे आहेत—म्हणून दोन्ही भावांचे गर्गमुनींच्या द्वारे सोबतच (एकत्रच) नामकरण, नंदालय-अंगणात गुडघ्यांच्या बळावर चालण्याची लीला आदी दिसून येते.

**एकादशी-व्रताच्या आदल्या दिवशी, व्रताच्या दिवशी आणि पुढच्या दिवशी एकादशीचे विधि-विधान ज्या प्रकारे पालनीय आहेत, त्याच प्रकारे या पौर्णिमेच्या आदल्या दिवशी, व्रताच्या दिवशी आणि दुसऱ्या दिवशी देखील समस्त विधी पाळायला हवे.** व्रताच्या दिवशी, सकाळी केले जाणारे नित्य-कर्मे आणि संध्या-वन्दन इत्यादी नंतर उपवास ठेवून श्रीबलदेव-प्रभूंच्या सुशोभित (उत्तम रितीने सजविलेल्या) चित्राच्या समक्ष त्यांना पुष्पांजली प्रदान करून, अशा प्रकारे उपवासाचा संकल्प घ्यावा, यथा—'हे बलदेव प्रभू, हे कृपामय, आज तुमच्या आविर्भाव-तिथीच्या निमित्ताने व्रतोपवास करीन. तुम्ही मला यथाशक्ती (आवश्यक ते बळ) प्रदान करून नित्य भगवत् सेवेत नियुक्त करावे.' यानंतर बलदेव-महिमा, त्यांच्या आविर्भाव इत्यादी लीला, श्रीमद्भागवतम्, श्रीचैतन्य-भागवत, श्रीचैतन्य-चरितामृत इत्यादी ग्रंथांची चर्चा, महाजन पदावलीचे कीर्तन इत्यादी अनुष्ठान करणे कर्तव्य आहे. अशा प्रकारे संध्याकाळी यथायोग्य नियमाप्रमाणे श्रीबलदेव प्रभूंना विशेष पूजाभिषेक, भोगराग आणि पुष्पांजली निवेदन करावी. नाम-संकीर्तन इत्यादी सोबत रात्रभर जागरण करीत सकाळी त्यांचे अर्चन केल्यानंतर श्रेष्ठ वैष्णवांना महाप्रसादाचे सेवन करवून स्वतः महाप्रसाद सेवन करावा.

> हे नारद! कलिकाळाच्या अज्ञानरूपी घोर अंधकाराने आच्छन्न, आचार-विचार वर्जित सर्व जनांना मी श्रीशचीदेवी पासून प्रकट होऊन संसारसागरातून पार करून टाकीन.

## श्रीकृष्ण-जन्माष्टमी



'जन्माष्टमी'-शब्द श्रीकृष्णांच्या आविर्भाव दिवसासाठी प्रयुक्त होतो (वापरला जातो). सिंह राशीत सूर्य, वृषभ राशीत चंद्र, रोहिणी-नक्षत्रात, बुधवारी, भाद्रपद महिन्याच्या कृष्णाष्टमी-तिथीला मध्य रात्री करुणेचे सागर स्वयं-भगवान श्रीकृष्ण आपल्या इच्छेने आविर्भूत झाले. सर्व-मंगल-मंगला ती तिथी सर्व मनुष्यांसाठी नित्य पालनीय आहे.

जागतिक विचाराने 'जयंती'-शब्दाला कोण्या प्रसिद्ध व्यक्तीच्या जन्माच्या संबंधात उपयोग होताना पाहिला जातो. वास्तवात श्रावणी कृष्ण-पक्षाच्या अष्टमीला रोहिणी-नक्षत्राचा योग असल्यावरच उपरोक्त सर्वपापहारिणी त्या तिथीला 'जयंती' म्हटले जाऊ शकते. **"रोहिणी च यदा कृष्णपक्षेऽष्टम्यां द्विजोत्तम। 'जयन्ती' नाम सा प्रोक्ता सर्वपापहरा तिथिः॥"** (विष्णु-धर्मवाक्य). ही विशेष तिथी 'जयन्ती' नामाने सुपरिचित असल्यामुळे हे आहे की, सर्व कारणांचे कारण सर्वेश्वरेश्वर स्वयं-भगवान् श्रीकृष्णचंद्र या तिथीला अवलंबन करूनच भूलोकात अवतीर्ण होतात. **"जयं पुण्यंच कुरुते जयन्ती तेन सा स्मृता"**—(ब्रह्मवैवर्त्त पुराण). ही जन्माष्टमी (तिथी), व्रत पालन करणाऱ्याला जय आणि पुण्य प्रदान करते, म्हणून हिला 'जयंती' नाव दिले गेले आहे. म्हणून हा 'जयंती'-शब्द केवळ श्रीकृष्णांच्या जन्माष्टमी-प्रसंगातच वापरला जातो.

श्रीकृष्णचंद्रांनी आपल्या अचिंत्य-शक्तीच्या बळावर गोकुळात यशोदा-मातेंच्या गर्भातून ज्या प्रकारे गोपाळाच्या रूपात जन्म ग्रहण केला, त्याच प्रकारे सोबतच मथुरेत देवकी-मातेंच्या गर्भातून चतुर्भुज वासुदेवांच्या रूपात आविर्भूत झाले. **"गर्भकाले त्वसम्पूर्णे अष्टमे मासि ते स्त्रियौ। देवकी च यशोदा च सुषुवाते समं तदा॥"**—(हरिवंश). गौडीय भक्तांसाठी जन्माष्टमी-तिथी—विशेष रूपाने यशोदानंदन श्रीकृष्णांच्या जन्म-तिथीच्या रूपातच विशेष आदरणीय आहे.

### *श्रीजन्माष्टमी-व्रताची उत्पत्ती*

भविष्योत्तर-पुराणात श्रीकृष्ण-युधिष्ठिर-संवादात या व्रताच्या

उत्पत्तीची कथा वर्णित आहे. महाराज युधिष्ठिरांचा प्रश्न—"हे अच्युत, मला जन्माष्टमी-व्रताचे विस्तारपूर्वक वर्णन ऐकवावे—कोणत्या काळी या व्रताची उत्पत्ती झाली, याचे फळ काय आहे तथा याचा विधी काय आहे?"

याच्या उत्तरात श्रीकृष्ण म्हणू लागले,—"मथुरेत रंग-स्थळात कंसाचा वध झाल्यावर मल्लयुद्ध समाप्त झाल्यावर 'कुकुर' वंश आणि 'अंधक' वंशाचे सर्व लोक देवकी-देवी आणि श्रीवसुदेवांच्या जवळ गेले आणि खूपच आनंदाने अनेक दिवसांनंतर ते सर्वजण त्या दोघांना भेटले. त्या आत्मीय-परिजनांनी (जिवलग नातेवाईकांनी) घेरलेल्या देवकी-वसुदेवांच्या जवळ जेव्हा आम्ही पोहोचलो तर त्या दोघांनी मला आणि बलभद्रांना मांडीवर बसवून रडणे आरंभ केले. श्रीवसुदेव रडतरडत दाटलेल्या स्वराने म्हणू लागले,—"आज माझा जन्म सफल झाला, माझ्यात प्राण परत आले, कारण आज आपल्या दोन पुत्रांसोबत माझे मिलन झाले आहे." तेव्हा वसुदेव-देवकी यांच्या आनंदाला पाहून सर्व लोकदेखील अत्यंत प्रफुल्लित झाले. प्रसन्नतेने ते म्हणू लागले—

"हे जनार्दन, आमचा आनंद आजच संपूर्ण रूपाने उदय झाला आहे. दुष्ट कंसाचा वध झाला आहे. म्हणून आम्हा सर्वांना आज खूपच आनंद होत आहे. आपण आमच्या प्रती प्रसन्न व्हा. हे वैकुंठ! ज्या दिवशी देवकी मातेने आपल्याला प्रसूत केले होते (अर्थात जन्म दिला होता) , तो दिवस आम्हाला सांगा. आम्ही त्या दिवसाचे महोत्सवाच्या रूपात पालन करू. हे केशव, आम्ही आपल्या चरणी शरणागत आहोत, म्हणून आमच्यावर प्रसन्न व्हावे."

लोक जेव्हा अशा प्रकारे म्हणू लागले तर पिता वसुदेव, आनंदाने रोमांचित होऊन माझ्या आणि बलभद्रांकडे पाहून म्हणू लागले,—'तुम्ही सर्व या समस्त लोकांची इच्छा पूर्ण करा.' तेव्हा मी पित्याच्या आदेशानुसार जन्माष्टमी व्रताच्या विषयात सांगितले, —सूर्य सिंह राशीत अवस्थित झाल्यावर, भाद्रपद मासाच्या कृष्णपक्षाच्या अष्टमीला मेघाच्छन्न (ढगांनी आच्छादित) मध्यरात्रीत, चन्द्र वृषभ राशीत 'रोहिणी' नक्षत्र-युक्त झाल्यावर, मी वसुदेवांच्या द्वारे देवकींपासून आपल्या इच्छेनुसार जन्म ग्रहण केला. माझ्या या जन्म-दिवसाच्या व्रताचे आठ वर्षापासून ऐंशी वर्षांपर्यंतच्या सर्व लोकांनी पालन करावे—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि येथपर्यंत की, अन्य धर्मांच्या सर्व लोकांनी देखील या व्रताचे अनुष्ठान करावे. देवी भगवतीचा (योगमायेचा) महोत्सव देखील त्याच

दिवशी पालन करावा. हे जन्माष्टमी-व्रत पहिले मथुरेत, नंतर समस्त जगात प्रचारित होईल. हे ऐकून लोकांनी तेव्हापासून जन्माष्टमी-व्रत पालन करणे आरंभ केले.

## *श्रीजन्माष्टमी-व्रताचे माहात्म्य*

भविष्योत्तर-पुराणात, श्रीकृष्ण-युधिष्ठिर संवादात, श्रीजन्माष्टमी-व्रताचे माहात्म्य वर्णित आहे,—'हे पांडव! ज्या स्थानावर मानवगण वर्णमालेत लिखित माझे नाव किंवा चित्रपटात अंकित माझ्या श्रीमूर्तीला चंदनचूर्ण इत्यादीने सजवून आणि सर्वालंकारांनी भूषित करून माझ्या पुण्य-जन्म-दिवशी सर्वदा पूजा करतात, त्या देशात कधीही शत्रु सेनेचे भय राहात नाही, वेळेवर पाऊस पडतो आणि अतिवृष्टी (अधिक पाऊस), अनावृष्टी (दुष्काळ), कीटक-पतंग (कीडे व पतंग), उंदीर इत्यादींच्या भयाची संभावना राहात नाही. देवकी-देवींचे चरित्र आणि माझ्या जन्माचा वृत्तांत ज्या घरात लिहिलेला असतो आणि पूजित होतो, त्या स्थानावर सर्व प्रकारच्या समृद्धीचा समागम होतो आणि कोणत्याही प्रकारच्या उपद्रवाचे भय राहात नाही. कोणत्याही प्रकारे देखील, कोणी व्यक्ती जर जन्माष्टमी-व्रताचे पालन करते तर निःसंदेह (निःसंशय) तिला विष्णु-लोकाची प्राप्ती होते. हे पार्थ! नंद-गोपांची आनंद प्रदान करणारी ही जन्माष्टमी तिथी जिवांना देखील परमानंद प्रदान करते, त्यांचे समस्त पाप त्याच क्षणी हरण करते. म्हणून त्या दिवशी नंद-यशोदेंच्या सोबत त्यांच्या पुत्राची पूजा केल्यास विष्णूंचे परमपद लाभ होते.'

'जन्माष्टमीच्या दिवशी भोजन केल्याने त्रिभुवनातील समस्त पापांचेच भोजन होते. तिळमात्र देखील पोट भरल्याने यमदूतांद्वारे ती व्यक्ती तीळ-तीळ करून यातना प्राप्त करते. द्वादशी-व्रतानुष्ठान करून सुद्धा तिचा नरकातून उद्धार नाही आहे.' जयन्ती-व्रताच्या (जन्माष्टमी-व्रताच्या) प्रती जो विमुख आहे, त्याला ब्रह्म-हत्या, सुरापान, गोहत्या, स्त्रीहत्या इत्यादी महापापांमध्ये लिप्त होऊन पडावे लागते—हा लोक आणि परलोक, कोणत्याही लोकात त्याला सुख मिळत नाही. जी नारी प्रत्येक वर्षी या परम पवित्र व्रताचे पालन करीत नाही, ती साप बनून वनवास करते आणि या व्रताच्या प्रती विमुख पुरुष, क्रूर-राक्षसाच्या रूपात जन्म ग्रहण करतो. श्रीजन्माष्टमी-व्रताचा त्याग करून जर कुणी अन्य व्रत करतो तर त्या-त्या व्रताचे कोणतेही पुण्य (फळ) त्याला प्राप्त होत नाही.

आपल्या धनाच्या अनुसार आणि येथपर्यंत की, कमी खर्चात देखील या व्रताचे पालन करावे लागेल—नाही तर चौदा इंद्रांच्या शासन-काळापर्यंत नरकात राहावे लागेल—(विष्णु-रहस्यात ब्रह्म-नारद संवाद).

'कलियुगात जी सर्व भाग्यशाली व्यक्ती सर्व पापांचे हरण करणाऱ्या श्रीकृष्ण-जन्माष्टमी तिथीमध्ये उपवासी (उपाशी) राहून श्रीहरीची पूजा करते, संसारात (जगात) तिला कोणापासून कोणतेही भय राहात नाही आणि जेथे ती निवास करते, तेथे कली राहात नाही'—(ब्रह्मपुराण, पूर्वखंडात श्रीसूतवाक्य). 'कंस आदी असुरांच्या विनाशासाठी श्रीहरी ज्या दिवशी आविर्भूत झाले होते, तो दिवस परम पवित्र आहे आणि सर्व प्रकारच्या मंगलाची खाण आहे. सनातन पुराण-पुरूषोत्तम—श्रीकृष्णांची पृथ्वीवर साक्षात अवतरणाची ती महातिथी, अनायासेच मुक्ती प्रदान करण्यास समर्थ आहे, याच्यात आश्चर्याची काय गोष्ट आहे? या व्रताला करणेच परम मंगलमय आहे, हीच आहे परम तपस्या आणि हाच आहे परम धर्म'—(ब्रह्मपुराणात श्रीशुक-जनमेजय संवाद)

'श्रावणी कृष्ण-अष्टमी तिथी धर्म-अर्थ-काम-मोक्ष प्रदान करणारी आहे. जे लोक हे व्रतानुष्ठान स्वतः करतात आणि दुसऱ्यांकडून देखील करवितात, लक्ष्मीदेवी त्यांच्या घरात अचल (स्थिर) होऊन अवस्थान (निवास) करते. या व्रताला केल्याने जे फळ प्राप्त होते, त्याच्या समान किंवा त्याच्यापेक्षा अधिक फळ वेद किंवा पुराणांमध्ये देखील पाहिले जात नाही—अर्थात श्रीकृष्णप्रेमच पंचम-पुरुषार्थ आहे, ज्याच्या समक्ष मोक्षदेखील हीन प्रतीत होतो. हे कृष्णप्रेम शुद्ध भक्तांच्या आनुगत्यात या व्रताचे पालन केल्याने प्राप्त होते.' 'यथाविधी श्रीकृष्ण-जन्माष्टमी-व्रत अनुष्ठित झाल्यावर श्रीयमराज दुःखी मनाने उपरोक्त व्यक्तीची पापांची सूची यादी खोडून टाकतात. जी व्यक्ती जन्माष्टमीच्या दिवशी देवकी-देवींच्या सोबत श्रीहरींची आराधना करते, ती भीषण यमपथावर (नरकाच्या मार्गावर) न जाऊन विष्णूंच्या परमपदी (श्रीचरणी) आश्रय लाभ करते. हे व्रत केल्याने सर्व कार्य सिद्ध होऊन जातात आणि मृत्यूच्या वेळी श्रीकृष्णांचे स्मरण होते. म्हणून हे नारद! परम मंगल लाभ करण्यासाठी माझ्या आज्ञेने जयन्ती-व्रताचे (जन्माष्टमी-व्रताचे) पालन करा.'—(स्कंद पुराणात ब्रह्म-नारद संवाद)।

## *जन्माष्टमी-व्रतकाल निर्णय*

गंगा जलाने भरलेल्या कलशात फक्त एक थेंब दारू मिसळल्याने जसे ते वर्जनीय होऊन जाते, त्याच प्रकारे एक पळ मात्र देखील सप्तमी-विद्ध असल्यास पवित्र अष्टमी तिथी परित्यज्य होऊन जाते (पद्मपुराण). तरी देखील वह्नि-पुराण इत्यादी तामसिक शास्त्रांमध्ये सप्तमी-विद्धा अष्टमी-व्रत पालन करण्याची जो विधी वर्णित आहे, त्याचा अवैष्णवगण देवमायेने मोहित होऊनच पालन करतात (याज्ञवल्क्य). देवता आणि ऋषींनी आपापल्या पदाला हरविण्याच्या (गमवण्याच्या) भीतीने अशा प्रकारे मोहजालाची निर्मिती करून शुद्धा-अष्टमी तिथीला गुप्त ठेवले होते (स्कंदपुराण). गौतमीय-तंत्राच्या या प्रसंगात वर्णित झाले आहे की,—सप्तमी-विद्धा अष्टमी व्रत केल्याने पूर्व-अर्जित समस्त पुण्य क्षय होऊन जाते. हरि-विमुखतेमुळे अशा प्रकारे अष्टमीचा उपवास केल्यावर देखील त्यापासून ब्रह्म-हत्येचे फळ भोगावे लागते; कोणत्याही प्रकारचे शुभ फळ उदय होत नाही.

'सप्तमी-विद्धा अष्टमी' म्हटल्याने येथे 'सूर्योदय-विद्ध'-अवस्थेलाच समजले जाते, अर्थात सूर्योदयाच्या नंतर एक क्षण देखील सप्तमी राहिल्यास उपरोक्त अष्टमी, सप्तमी-विद्धा मानली जाते. एकादशी व्रताच्या संबंधात 'अरुणोदय-विद्धत्व' त्याज्य आहे, परंतु जन्माष्टमी, रामनवमी इत्यादी अन्यान्य समस्त तिथी 'सूर्योदय-विद्ध' असल्यावरच परित्यज्य आहेत. श्रीहरिभक्तिविलासात श्रील सनातन गोस्वामी कृत व्याख्येत म्हटले गेले आहे—"एकादशी तराशेष-तिथीनां रव्युदयतः प्रवृत्तानामेव सम्पूर्ण-त्वेनारुणोदय-वेधासिद्धेः" अर्थात 'एकादशी' तिथीच्या संबंधात ज्या प्रकारे 'अरुणोदय-विद्धा-नियम' प्रयोग केला जातो, अन्य सर्व तिथींच्या संबंधात असे नाही आहे—अन्य समस्त तिथ्या सूर्योदयाच्या वेळेपासून आरंभ झाल्यावरच संपूर्ण मानल्या जातात, म्हणून तेथे 'अरुणोदय-विद्धा'चा नियम वापरला जाऊ शकत नाही.

श्रावणी (शुद्धा) अष्टमीच्या, रात्रंदिनाच्या आत, रोहिणी नक्षत्राचा योग, क्षणभरासाठी मात्र देखील असल्यास, उक्त पुण्य तिथीमध्येच उपवास करायला हवा—(विष्णुरहस्य). विशेष रूपाने ती रोहिणी युक्ता अष्टमी जर बुधवार किंवा सोमवार अथवा नवमी-युक्ता असते तर ती कोट्यवधी कुळांना मुक्ती प्रदान करते—(पद्म-पुराण). नवमी-युक्ता अष्टमीमध्ये (अर्थात 'उमा-माहेश्वरी' तिथीमध्ये)

रोहिणीचा योग न राहिला तरी देखील व्रत पालन केले जाईल; परंतु उक्त नक्षत्र-युक्ता असून देखील सप्तम-विद्धा अष्टमी कधीही ग्रहण योग्य नाही आहे. तिथी विशुद्ध असल्यावरच विभिन्न योगांचा विचार आदरणीय आहे—अन्यथा नाही.

## *श्रीजन्माष्टमी-व्रत पालन करण्याची विधी*

श्रीएकादशी व्रतोपवासाच्या उपलक्षात (उपलक्षणात) दशमी, एकादशी आणि द्वादशी या तीन दिवसांमध्ये साधारण पद्धतीने व्रताचे जे नियम सांगितले गेले आहेत, त्याच सर्व नियमांचे जन्माष्टमी-व्रतात सप्तमी, अष्टमी आणि नवमीमध्ये पालन करायला हवे. व्रताच्या दिवशी दात घासणे इत्यादी समस्त पहाटेची कृत्ये संपन्न करून संकल्प घ्यावा.

**संकल्प-मंत्र—**

**“अद्य स्थिता निराहारः श्वोभूते परमेश्वर।**
**भोक्ष्यामि देवकीपुत्र अस्मिन् जन्मष्टमीव्रते॥”**

अर्थात ‘हे परमेश्वर देवकीनंदन, या जन्माष्टमी व्रतात आज निराहार राहून उद्या भोजन करीन.’ यानंतर सकाळी श्रीकृष्णांना तीळ-पाण्याच्या द्वारे स्नान आदी करवून शिष्टाचारानुसार नवे वस्त्र इत्यादी समस्त अर्पण करावे.

या व्रतात शुद्ध-भक्तगण निराहार राहून, रात्रंदिवस श्रीकृष्ण-नाम-संकीर्तन, रूप-कीर्तन, गुण-कीर्तन, लीला-कीर्तन आदीत निमग्न राहतात. **“यज्ञैः संकीर्तन-प्रायैर्यजन्ति हि सुमेधसः”** (श्रीमद्भागवत ११/५/३२)-’सुबुद्धिमान व्यक्ती संकीर्तन-रूपी यज्ञाच्या द्वारे पूजा करतात’—या भागवतीय निर्देशानुसार ते ग्रंथराज ‘श्रीमद्भागवत’ अथवा श्रीगौर-पार्षद श्रीरघुनाथ भागवत-आचार्यांद्वारे रचित ‘श्रीकृष्णप्रेम-तरंगिणी’ ग्रंथाच्या दशम स्कंधातून श्रीकृष्णांचा आविर्भाव तथा बाल्य-लीला-विषयक कथांची चर्चा करतात. जगद्गुरू श्रीश्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपाद या दिवशी ‘श्रीचैतन्य भागवत’ आणि ‘श्रीचैतन्य चरितामृत’ ग्रंथातून ‘श्रीराधाकृष्ण-मिलित-तनू’ (श्रीराधाकृष्णांचे मिलित रूप) शचीनंदन श्रीगौरसुंदरांची आविर्भाव इत्यादी लीलांची चर्चा करण्याचा विशेष उपदेश देत असत.

व्रताच्या उपलक्षात भगवंतांच्या मंदिराला सामर्थ्यानुसार विविध पाने-फुले आणि विविध रंगांच्या कागदी पताका, तोरणे इत्यादीने सजवावे. समर्थ असल्यास गोप-गोपी आणि गाईंनी घेरलेल्या

गोकुळाचे चित्र बनवून त्याच्यात माता यशोदेच्या मांडीवर (कुशीत) स्थित श्रीकृष्ण, नंदबाबा, रोहिणी-माता, बलदेव इत्यादींना स्थापित करावे.

यानंतर अर्ध्या रात्री भगवंतांच्या आविर्भाव-लीलेचे स्मरण आणि कीर्तन करीत पंचामृत, दूध इत्यादींच्या द्वारे आणि शुद्ध गंगेच्या पाण्याद्वारे नृत्य-गीत-वाद्य आदी सोबत श्रीयशोदेसोबत श्रीकृष्णांची सोळा-उपचारांनी स्नान आदी करवून पूजा करावी. आणि विविध खाद्य सामग्री, फळे आणि तांबूल (पान) अर्पण करावे.

यानंतर गीत, नृत्य आदी सोबत भगवंतांच्या बाल्य-लीला इत्यादीचे श्रवण करीत आनंदाने रात्रभर जागरण करावे. जन्माष्टमीच्या रात्री जागरण केल्याने आजन्म-अर्जित पापे (जन्मल्यापासून केलेली सर्व पापे) त्याच क्षणी ध्वंस होऊन जातात. दुसऱ्या दिवशी सकाळी नित्यकर्म संपन्न करून श्रीभगवंतांचे अर्चन (पूजा) करून, पारणे-उत्सव करावा.

## *श्रीजन्माष्टमीचे पारणे करण्याचा विधी*

पारणाच्या वेळी नियम हाच आहे की, व्रतोपवासाच्या दुसऱ्या दिवशी, तिथीच्या शेवटी आणि नक्षत्राच्या शेवटी पारणे करणे कर्तव्य आहे. असमर्थ व्यक्ती कोणत्याही पक्षात पारण करू शकते. परंतु ब्रह्मवैवर्तामध्ये सांगितले गेले आहे—'अष्टमी तिथी आणि रोहिणी नक्षत्र वर्तमान असताना पारणे केल्याने अष्टगुण (आठपट) पुण्य क्षय होते आणि नक्षत्राच्या आत पारण केल्याने चतुर्गुण (चारपट) पुण्य क्षय होते. म्हणून प्रयत्नपूर्वक दोघांच्या अंतीच (शेवटीच) पारणे करावे.'

भक्तगण या दिवशी श्रीनंद-महाराजांद्वारे अनुष्ठित "श्रीनंद-महोत्सव"-लीलेच्या स्मरणात चर्व्य-चुष्य-लेह्य-पेय भोजन आदी द्वारे यथाशक्ती महोत्सवाचे आयोजन करून सर्वसाधारणांना महाप्रसाद सेवा करवितील.

श्रीकृष्णचंद्र स्वतः म्हणतात की—"मी कलियुगात संकीर्तनाच्या आरंभ काळात श्रीचैतन्यरूपाने प्रकट होईन. या अवतारात श्रीहरिनामाचे दान करून सर्वसाधारण जीवांचा उद्धार करून टाकीन." या श्लोकात 'निस्तारयामि' ही वर्तमान काळाची क्रिया 'वर्तमान सामीप्ये वर्तमानवद्धा' या सूत्राने श्रीकृष्णावतारानंतर भावी समीपवर्ती अवताराची सूचिका भविष्यदर्थात आहे.

# श्रीवामन-द्वादशी

**"लब्धा वैरोचनाद्भूमिं पद्भ्यां द्वाभ्यामतीत्य यः।**
**आब्रह्म भुवनं क्रांतं वामनं तं नमाम्यहम्॥"**

*—(बृहन्नारदीय पुराण)*

'ज्यांनी विरोचनाचे पुत्र—'बली महाराजांकडून त्रिपाद स्थान (तीन पाऊले जमीन) दान घेऊन, दोन पावलांद्वारे भूलोक पार करून ब्रह्मलोकपर्यंन्त अधिकार केला होता, त्या श्रीभगवान वामनदेवांना नमस्कार करतो.' या कल्पात तीन वेळा वामनदेवांचा आविर्भाव झाला. सर्वात आधी त्यांनी 'स्वायंभुव' मन्वंतरात वास्कली नामक दैत्याच्या यज्ञात आणि दुसऱ्यांदा 'वैवस्वत' मन्वंतरात धुंधू नामक असुराच्या यज्ञात गमन केले. तथा शेवटी या 'वैवस्वत' मन्वंतराच्या सातव्या चतुर्युगात कश्यप ऋषींपासून आदितींच्या गर्भात आविर्भूत झाले आणि त्यानींच 'बली' महाराजांच्या यज्ञात गमन केले. या तीन वामन-मूर्तीनींच अनुग्रहासाठी त्रिविक्रम रूप प्रकट केले होते —(लघु-भागवतामृत).

श्रीमद्भागवत (८/१८/५,६) मध्ये भगवान् श्रीवामनदेवांच्या आविर्भावाच्या प्रसंगात वर्णित आहे,—

**'श्रोणायां श्रवणद्वादश्यां मुहुर्त्तेऽभिजिति प्रभुः।**
**सर्वे नक्षत्रताराद्याष्चक्रुस्तज्जन्म दक्षिणम्॥**
**द्वादश्यां सविताऽतिष्ठन्मध्यन्दिन-गतो नृप।**
**विजया नाम सा प्रोक्ता यस्यां जन्म विदुर्हरेः॥'**

'हे राजा! भाद्रपद महिन्याच्या शुक्ल पक्षाची श्रवण द्वादशी तिथी होती, चंद्र श्रवण नक्षत्रात स्थित होता, अभिजित मुहूर्त होता—त्याच शुभ लग्नात भगवान अवतीर्ण झाले. त्या वेळी सर्व ग्रह, नक्षत्र अनुकूल होऊन शुभ स्थानांवर आले होते, जे भगवंतांच्या जन्माला मंगलमय सूचित करित होते. परीक्षित! ज्या द्वादशी तिथीला भगवान श्रीहरी प्रकट झाले, ती विजय-द्वादशीच्या नावाने प्रसिद्ध आहे. त्यावेळी सूर्य मध्य आकाशात स्थित होते. ही गोष्ट सर्व विद्वान जाणतात.'

म्हणून भाद्रपद महिन्याच्या शुक्ल द्वादशी तिथीला श्रवण नक्षत्राचा योग आल्यावर, त्या दिवशी उपवासी राहून श्रीवामनदेवांची पूजा करायला हवी. परंतु द्वादशीला कोणत्याही वेळी श्रवण नक्षत्राचा योग नसल्यास अथवा एकादशी आणि द्वादशी—दोन्ही दिवशी श्रवण नक्षत्र

अप्राप्त असल्यास (म्हणजे उपलब्ध नसल्यास) एकादशीला उपवास ठेवून द्वादशीला श्रीवामनदेवांची पूजा करायला हवी.

## *श्रीवामन-द्वादशी-व्रत-माहात्म्य*

श्रीवामन-द्वादशी व्रत केल्याने भगवान इच्छुकांच्या सर्व सत्-कामना पूर्ण करून टाकतात. श्रीवराहपुराणात या व्रत-माहात्म्याच्या प्रसंगात वर्णित आहे की, पुत्रहीन (निपुत्रिक) राजा 'हर्यश्च'ने पुत्र प्राप्तीची कामनेने या व्रताचे अनुष्ठान केल्यावर त्यांना उग्राश्व-नामाचा एका महाबलशाली व पराक्रमी पुत्राची प्राप्ती झाली होती. जो नंतर चक्रवर्ती सम्राट बनला होता. या व्रताच्या अनुष्ठानाने पुत्रहीन व्यक्तीस पुत्र, धनार्थीस (धनाची कामना करणाऱ्यास) संपत्ती, राज्य-च्युतास (ज्याने राज्य गमावले आहे त्यास) राज्य-सुख प्राप्त होऊन शेवटी विष्णुलोकाची प्राप्ती होते. परंतु शुद्ध-भक्तगण कोणत्याही प्रकारची जागतिक प्राप्तीची आशा किंवा अपेक्षा न बाळगता केवळ श्रीहरींच्या संतुष्टीसाठीच या समस्त हरिवासर व्रतांचे अनुष्ठान करतात.

## *श्रीवामन-द्वादशी-व्रत-विधी*

व्रताचा **संकल्प-मंत्र**—

**"एकादश्यां निराहारः स्थित्वा चैवापरेऽहनि।**
**भोक्ष्ये श्रीवामनानन्त शरणागत-वत्सलः॥"**

अर्थात, हे श्रीवामनदेव, हे अनंत, हे शरणागत-वत्सल या श्रीवामन-व्रताच्या उपलक्ष्यात मी एकादशीला उपवासी (उपाशी) राहून दुसऱ्या दिवशी भोजन करेन.' म्हणून या व्रतामध्ये एकादशी-व्रताप्रमाणेच उपवास करण्याचा विधी आहे. परंतु उक्त भाद्रपद मासाच्या शुक्ल-द्वादशीला 'श्रवण'-नक्षत्राचा योग असल्यास ज्या श्रवण-महाद्वादशीचा उदय होतो, त्याच द्वादशीमध्ये तेव्हा उपवास करायला हवा. उपवासासोबत भगवान श्रीवामनदेवांच्या चित्राला सुंदररीत्या सजवून शास्त्रातून त्यांच्या संबंधित कथांचे श्रवण-कीर्तन करावे. ग्रंथराज श्रीमद्भागवतात आठवे स्कंधात सोळाव्या अध्यायापासून तेविसाव्या अध्यायापर्यंत श्रीवामनदेवांची लीला वर्णित आहे. संभव असल्यास श्रीवामन-पुराणातून त्यांच्याबद्दल अध्ययन केले जाऊ शकते.

या व्रताच्या दुसऱ्या दिवशी यथाविधी भगवान श्रीवामनदेवांची पूजा अवश्य करायला हवी. खूपच कमी वेळेसाठी द्वादशी

असल्यावर देखील उक्त पूजेला द्वादशीमध्येच संपन्न करावे लागेल. जर रात्र असतानाच द्वादशी समाप्त झाली, तर ती पूजा रात्री द्वादशी असतानाच अवश्य करावी लागेल. अशा प्रकारे पूजा समाप्त केल्यानंतर सकाळी वैष्णव–ब्राह्मणांना महाप्रसाद भोजन करविल्यानंतर स्वतः पारण करावे.



**श्रीबळी महाराज श्रीवामन देवांना दान देण्याचा संकल्प घेतांना, सोबत आहे दैत्यांचे गुरू श्रीशुक्राचार्य**

# श्रीवराह-द्वादशी

**दंष्ट्रांकुशेन योऽनन्तः समुद्धृत्यार्णवाद्धराम्।**
**तस्थावेवं जगत् कृत्स्नं तं वराहं नमाम्यहम्॥**

'ज्या अव्यय देवांनी दातांच्या अग्र-भागाने समुद्रातून पृथ्वीला बाहेर काढून समग्र जगाला स्थापित केले, त्या श्रीवराह देवांना मी नमस्कार करतो.'

या कल्पात वराहदेवांचा दोन वेळा आविर्भाव झाला होता. याच्यात आधी 'स्वायंभुव'-मन्वंतरात पृथ्वीच्या उद्धारासाठी ब्रह्मदेवांच्या नाकपुडीतून आणि नंतर सहाव्या 'चाक्षुष'-मन्वंतरात हिरण्याक्षाचा वध करून पृथ्वीचा उद्धार करण्यासाठी पाण्यातून आविर्भूत झाले होते. ते कधी चतुष्पाद-मूर्ती (चार पाय असणारे रूप धारण करून) आणि कधी नर-वराह मूर्तीच्या रूपात (वराह-मुख-युक्त-नराच्या रूपात) प्रकट झाले, आणि कधी आपल्या ढगांच्या समान श्याम-वर्ण (कृष्ण-वराह) आणि कधी चंद्राच्या समान श्वेत वर्ण (अर्थात श्वेत-वराह) होतात

*—(लघु-भागवतामृतम्)*

## *वराह-द्वादशीचा व्रतकाळ आणि व्रत-विधी*

श्रीवराह-पुराणाच्या या प्रसंगात अशा प्रकारे उल्लेखित आहे की, —माघ महिन्यात शुक्ल पक्षाच्या द्वादशी तिथीला वराह-द्वादशी व्रताचे अनुष्ठान केले जाते. पहिल्या प्रमाणे विधीच्या अनुसार एकादशीच्या दिवशी उपवास ठेवून सुगंध, पुष्प, नैवेद्य आदी विविध उपचारांद्वारे भगवान श्रीहरींची पूजा करायला हवी. श्रीहरींच्या समस्त अवतारांचे कीर्तन आणि मनन करीत पूर्ण दिवस आणि रात्र व्यतीत करावी. श्रीमद्भागवताच्या तिसऱ्या स्कंधाच्या तेराव्या आणि चौदाव्या अध्यायांतून श्रीवराह-अवतार-कथेच्या या प्रसंगाची चर्चा करायला हवी. श्रीवराह-पुराणातूनही चर्चा केली जाऊ शकते. दुसऱ्या दिवशी सकाळी श्रीवराहदेवांची पूजा करायला हवी आणि पूजेनंतर विष्णु-भक्त, वेद-विद्येत पारंगत, श्रोत्रिय (श्रुती शास्त्रांमध्ये निपुण) ब्राह्मणांना पूजेच्या वस्तू दान करायल्या हव्या.

## *श्रीवराह-द्वादशी व्रत-माहात्म्य*

श्रीवराह-द्वादशीचे माहात्म्य श्रीवराह पुराणात श्रीदुर्वासा ऋषींद्वारे अशा प्रकारे वर्णित झाले आहे—संवर्त नामक ऋषींच्या वेद-अध्ययन-रत पन्नास पुत्रांनी एक दिवस वनात जाऊन पाहिले की,

एक हरिणीने पाच पिल्लांना (पाडसांना) जन्म दिला आणि त्याच वेळी त्यांना सोडून निघून गेली. मुनि-पुत्रांनी हे पाहून हरिणीच्या त्या नवजात पाडसांना जसे मांडीवर तर तेथेच त्या सर्वांचा मृत्यू झाला. दुःखी मनाने ऋषिपुत्रांनी पित्याच्या जवळ येऊन साऱ्या घटनेची माहिती दिली आणि प्रायश्चित्तासाठी प्रार्थना केली. संवर्त ऋषींनी याच्या उत्तरात म्हटले,—"माझे पिता एक जीव-हिंसक (जिवांची हिंसा करणारे) होते आणि त्यांच्यापेक्षाही अधिक हिंसक मी होतो. म्हणून तुम्ही लोकांनी हे पाप कार्य केले आहे. आता तुम्ही सर्वजण हरिणाची कातडी घालून पाच वर्षांपर्यंत व्रत करा."

ऋषि-पुत्र, त्यानुसार वनात जाऊन हरिणाची कातडी घालून ब्रह्म-ध्यानात निमग्न झाले. अशा प्रकारे एक वर्ष झाल्यावर राजा वीरधन्वा हरिणाची शिकार करण्यासाठी त्या वनात उपस्थित झाला. राजाने हरिणाची कातडी घालून ब्रह्म-ध्यान-रत त्या ऋषि-पुत्रांना मृग (हरिण) समजून मारून टाकले. जेव्हा राजाला समजले की, त्यांनी वास्तवात ब्रह्म-हत्या (ब्राह्मणांची हत्या) केली आहे, तेव्हा राजा भयाने कापू लागला आणि शोकाकुल होऊन दुःखाने व्याकूळ होऊन गेला. रडतरडत त्यांनी मुनिवर (श्रेष्ठ मुनी) देवरातांच्या आश्रमात येऊन त्यांना सारा वृत्तांत सांगितला आणि त्याचा उपाय जाणण्याची इच्छा व्यक्त केली.

देवरात ऋषींनी राजाला पश्चात्तापाने अत्यंत व्याकूळ झालेले पाहून त्यांना आश्वासन प्रदान केले की—"राजा! भयाची गोष्ट नाही आहे, तुम्ही ब्रह्म-हत्येच्या पापातून मुक्त होऊन जाल. पृथ्वीदेवी पाताळ-तळात निमज्जित झाल्यावर (बुडाल्यावर) देवादिदेव श्रीविष्णूंनी वराह-रूपात ज्या प्रकारे तिचा उद्धार केला होता, त्याच प्रकारे तुमचादेखील ते या पापातून उद्धार करतील." असे म्हणून त्यांनी राजाला वराह-द्वादशी व्रताची कथा ऐकविली.

या व्रतानुष्ठानाच्या फलस्वरूप राजा ब्रह्म-हत्येच्या पापातून मुक्त झाला. एवढेच नाही नाना प्रकारचे सुख भोगल्यानंतर मृत्यूच्या वेळी सोन्याच्या विमानात विराजमान होऊन जेव्हा इंद्रलोकात (स्वर्गात) पोहोचला, तेव्हा स्वतः इंद्र त्यांचे अभिनंदन करण्यासाठी आले. परंतु भगवान् विष्णूंच्या सेवकांनी इंद्राला थांबवत म्हटले,—"देवराज! वीरधन्वासोबत साक्षात भेटण्यासाठी आपले तपोबल पर्याप्त नाही आहे." लोकपालगण देखील वीरधन्वाला भेटण्याची इच्छा केल्यावर अशाच प्रकारे तिरस्कृत झाले होते. अशाच प्रकारे क्रमशः राजा वीरधन्वा सत्यलोकात उपस्थित झाले—जेथे मृत्यू किंवा प्रलय-अग्नी

प्रवेश करित नाही. यज्ञपुरुष नारायण प्रसन्न झाल्याने अशा प्रकारची घटना होणे असंभव नाही. नारायण-व्रत यथायोग्य विधीनुसार अनुष्ठित झाल्याने जेव्हा या जन्मात सौभाग्य, दीर्घायुष्य, आरोग्य आणि संपदा प्राप्त केल्यानंतर परलोकात देखील अमृत प्राप्त होते, तेव्हा यथार्थ भक्तीने व्रत पालन केल्याने श्रीनारायण आपले दास्यपद प्रदान करतील, याच्यात आश्चर्य काय आहे?



# श्रीअद्वैत-सप्तमी

**महाविष्णूर्जगतकर्ता मायया: यः सृजत्यदः।**
**तस्यावतार एवायमद्वैताचार्य ईश्वरः॥**
**अद्वैतं हरिणाद्वैतादाचार्यं भक्तिशंसनात्।**
**भक्तावतारमीशं तमद्वैताचार्यमाश्रये॥**

*—श्रीस्वरूप-गोस्वामी कडचा (हस्तलिखित पोथी)*

**"अद्वैत-आचार्य गोसाञि साक्षात् ईश्वर।**
**जाँहार महिमा नहे जीवेर गोचर॥**
**महाविष्णु सृष्टि करेन जगदादि-कार्य।**
**ताँर अवतार साक्षात् अद्वैत-आचार्य॥**
**महाविष्णुर अंश—अद्वैत गुणधाम।**
**ईश्वरे अभेद, तेंइ 'अद्वैत' पूर्णनाम॥**
**वैष्णवेर गुरु तेंह 'अद्वैत' पूर्णनाम।**
**वैष्णवेर गुरु तेंह जगतेर आर्य।**
**दुइनाम-मिलने हैल 'अद्वैत-आचार्य'॥"**

*—(श्रीचैतन्यचरितामृत आदि-लीला सहावा परिच्छेद)*

(अर्थात अद्वैत-आचार्य प्रभू साक्षात ईश्वर आहेत—त्यांचा महिमा, जीव जाणू शकत नाही. जे महाविष्णू जग इत्यादीची सृष्टी करतात, त्यांचेच साक्षात अवतार आहेत—श्रीअद्वैत-आचार्य. महाविष्णूंचे अंश श्रीअद्वैत प्रभू—समस्त गुणांचे आधार आहेत. ईश्वरापेक्षा अभिन्न असल्यामुळे त्यांचे नाम 'अद्वैत' सार्थक आहे. ते वैष्णवांचे गुरू आहे आणि जगाचे 'आर्य' आहेत. म्हणून दोन नामांच्या मिलनाने त्यांचे नाम झाले 'अद्वैताचार्य').

या समस्त शास्त्र प्रमाणांनी हे प्रमाणित होते की, श्रीअद्वैताचार्य प्रभू 'विष्णु-तत्त्व' आहेत. परंतु विष्णू-तत्त्व असून देखील कृष्ण-दास्याचे माधुर्य आस्वादन करण्याच्या लोभामुळे भक्त-भावला स्वीकार करतात, म्हणून ते **'भक्तावतार'** आहेत.

**"कृष्णेर समता हइते बड भक्तस्पद।**
**आत्मा हैते कृष्णेर भक्त हय प्रेमास्पद॥**
**कृष्णसाम्ये नहे ताँर माधुर्यास्वादन।**
**भक्तभावे करे ताँर माधुर्य चर्वण॥**
**भक्तभाव अंगीकरि' बलराम, लक्ष्मण।**
**अद्वैत, नित्यानन्द, शेष, संकर्षण॥**
**कृष्णेर माधुर्यरसामृत करे पान।**

**सेइ सुखे मत्त, किछु नाहि जाने आन॥"**

—*(चैतन्य चरितामृत आदि-लीला सहावा परिच्छेद)*

(अर्थात कृष्णांच्या समान असल्याच्या विचारापेक्षाही मोठे आहे त्यांच्या 'भक्ता'चे पद; कारण कृष्णांसाठी त्यांचे भक्त त्यांच्या आत्म्यापेक्षाही अधिक प्रिय असतात. कृष्णांची समता केल्याने त्यांच्या माधुर्याचे आस्वादन होऊ शकत नाही. श्रीबलराम, श्रीलक्ष्मण, श्रीअद्वैत प्रभू, श्रीनित्यानंद प्रभू, श्रीशेष (श्रीअनंतदेव) आणि श्रीसंकर्षण भक्तभावाला स्वीकार करून कृष्णाचे माधुर्य-रसामृत पान करतात. ते त्याच सुखात मत्त राहिल्यामुळे आणखी काही जाणत नाहीत.)

म्हणून भक्तांसारखे आचरण पाहून त्यांना कोणत्याही प्रकारे 'शक्ति-तत्त्वा'च्या रूपात मानले जाऊ शकत नाही. वास्तवात ते विष्णु-तत्त्वच आहेत. म्हणून ते ज्या तिथीचे अवलंबन करून या जगात अवतीर्ण होतात, ती 'हरिवासर' किंवा 'हरितिथी' इत्यादी नामाने नोंदल्या जाते. म्हणून त्या तिथींमध्ये व्रतोपवास करणे कर्तव्य होऊन जाते. शुद्ध-भक्तीची अभिलाषी (इच्छुक) व्यक्तीच या समस्त तिथींना परम आदराने व्रतोपवास करतात.

श्रीअद्वैताचार्य माघ मासाच्या शुक्ल-सप्तमी-तिथीला 'वारेंद्र'-ब्राह्मण वंशात श्रीकुबेर पंडित आणि श्रीमती नाभा देवींचा आश्रय करून पूर्व बंगालमध्ये श्रीहट्टच्या नवग्रामात आविर्भूत झाले.

**"माघे शुक्लातिथि, सप्तमीते अति,**
**उथलाय महा-आनन्द-सिन्धु।**
**नाभागर्भ धन्य, करि अवतीर्ण,**
**हैल शुभक्षणे अद्वैत-इन्दु॥"**

—(भक्तिरत्नाकर बारावा तरंग)

(अर्थात् माघ मासाच्या शुक्ल सप्तमी तिथीला परमानंद रूपी समुद्राला भरती आली. नाभा देवीच्या गर्भाला धन्य करीत शुभ क्षणी श्रीअद्वैतचंद्र अवतरित झाले)

"अद्वैताचार्यांनी गुरुवर्गासोबत प्रकट होऊन पाहिले की,—जगत अत्यंत कृष्ण-भक्ति-हीन झाले आहे. या अवस्थेत कोणताही अंश-अवतार अवतीर्ण होऊन जगाचे मंगल करू शकत नाही, साक्षात कृष्णांना अवतीर्ण केले गेल्यावरच जगाचे कल्याण होईल. असा विचार करून गंगाजल आणि तुळशीची पाने कृष्णांच्या चरणकमळांवर प्रदान करून ते निरुपाधिक कृष्णतत्व (स्वयं

कृष्णांना) अवतीर्ण करण्यासाठी हुंकार (गर्जना) करू लागले.”

**“शुन, श्रीनिवास, गंगादास, शुक्लाम्बर।**
**कराइब कृष्णे सर्वनयन-गोचर॥**
**जबे नाहि पाँरो, तबे एइ देह हैते।**
**प्रकाशिया चारिभुज चक्र लइमु हाते॥**
**पाषण्डीरे काटिया करिमु स्कन्धनाश।**
**तबे कृष्ण प्रभु मोर, मुञि ताँर दास॥”**

*—(चैतन्य भागवत आदी द्वितीय अध्याय)*

अर्थात् हे श्रीनिवास! गंगादास! शुक्लांबर! ऐका, मी कृष्णांना सर्वांच्या समोर आणीन. जर असे करू शकलो नाही तर या देहातून चतुर्भुज प्रकट करून चक्र हातात घेईन. पाखंडी व्यक्तींची मस्तके धडावेगळी करीन. तेव्हाच कृष्ण माझे प्रभू आहेत आणि मी त्यांचा दास आहे—श्रीअद्वैत प्रभूंच्या या वाक्याने दोन गोष्टीची माहिती मिळते की,—ते वास्तवात ‘विष्णु-तत्त्व’ आहेत आणि सोबतच कृष्णदास्य-आस्वादनकारी ‘भक्तावतार’ आहेत. त्यांच्या आव्हानामुळेच श्रीकृष्ण गौरांग रूपात अवतीर्ण झाले. म्हणून श्रीअद्वैत प्रभू गौडीय भक्तांसाठी “गौर-आना-ठाकुर” ("गौरांग महाप्रभूंना आणणारे ठाकूर) या रूपात परम आदरणीय आहेत. श्रीमान महाप्रभूंनी देखील या कारणामुळे त्यांना “नाडा” (हलविणारे) नाम देऊन, श्रीअद्वैतचंद्रांची आपल्या अवताराच्या कारणाच्या रूपात घोषणा केली आहे. **“अद्वैत-आचार्य बलि’ कथा कह जार। सेइ ‘नाडा’ लागि’ मोर एइ अवतार!!”**—(चैतन्य भागवत मध्य —५/५१) अर्थात् ज्या अद्वैत-आचार्यांची गोष्ट तुम्ही लोक करता, त्या हलविणाऱ्यांमुळे माझा हा अवतार झाला आहे.

शुद्ध-भक्तगण श्रीगौरचंद्रांचे सेवाभिलाषी होऊन ‘गौर-आना-ठाकुर’ (गौरांग महाप्रभूंना आणणारे ठाकूर) श्रीअद्वैताचार्यांना शरण जाऊन धन्य होऊन जातात. श्रीमन्महाप्रभूंनी असे म्हणत श्रीअद्वैत प्रभूंना वर प्रदान केला होता,—**“तिलार्ध्देको जे तोमार करये आश्रय। से केने पतंग, कीट, पशु, पक्षी नय॥ यदि मोर स्थाने करे शत अपराध। तथापि ताँहारे मुञि करिब प्रसाद॥”** —(चैतन्य भागवत १९/१६८, १६९)

अर्थात अर्ध्या क्षणासाठी देखील जो तुमचा आश्रय करेल, तो पतंग, कीटक, पशू, पक्षी कोणीही का नसो, जर माझ्याप्रती शंभर अपराध देखील त्याने केलेत, तरीही मी त्याच्यावर कृपा करीन.

म्हणून श्रीअद्वैताचार्य समग्र गौडीय भक्त समाजासाठी महा-वटवृक्षाच्या समान महा-आश्रय-स्वरूप आहेत; तो आश्रय यथार्थ रूपात ग्रहण केल्यावर, श्रीअद्वैत प्रभूंच्या आकर्षणाने अतिशीघ्र जिवाच्या हृदयात श्रीचैतन्य महाप्रभू प्रकट होऊन जातात.

---

**ब्रह्मण्यः सर्वधर्मज्ञः शान्तो दान्तो गतक्लमः।**
**श्रीनिवासः सदानन्दी विश्वमूर्तिर्महाप्रभुः॥**

*(संमोहनतंत्रे)*

ही सर्व नावे श्रीचैतन्य महाप्रभूंमध्ये सांगोपांग संघटित होतात. जसे-कुष्ठरोगाने पीडित ब्राह्मणाला आलिंगन प्रदान करताच त्याचा देह सुवर्णमय बनवून टाकला आणि यज्ञोपवीत तोडून शाप देणाऱ्या ब्राह्मणाचा शाप सहर्ष स्वीकार करून दाखविल्यामुळे ब्रह्मण्यदेव प्रसिद्धच आहेत. पंडित श्रीनिवास आणि सदानंद आपले पार्षद प्रसिद्धच आहेत, म्हणून आपले नाव श्रीनिवास आणि सदानंदी आहे. विश्वरूप आपले अग्रज (ज्येष्ठ भ्राता) असल्यामुळे विश्वमूर्ती देखील आपले नावे आहे. महाप्रभू शब्द तर यौगिक असूनही आपल्यातच प्राय रूढ आहे. सर्वधर्मज्ञ इत्यादी नावे तर स्पष्टच आपल्यात चरितार्थ आहेत.

---

श्रीशंकर पार्वतीदेवींना म्हणाले, "नवद्वीपात देखील तेच कृष्ण स्वयं गजेन्द्रगामिनी श्रीराधिकेला वक्षस्थळात धारण करून आनंद दान करित आहेत. अहो शिवे! ललिता आदी ज्या-ज्या सख्या वृंदावनात आपले रूप धारण करून श्रीश्रीराधाकृष्णांची सेवा करतात, नवद्वीपात त्या सर्व सख्या भक्तरूप धारण करून आनंदपूर्वक राधाकृष्णमिलित तनू (शरीर) श्रीगौरसुंदरांची आराधना करतात. हे देवी! श्रीराधाकृष्णांच्या युगुल जोडीनेच गौररूप धारण केले आहे आणि जे वृंदावनाच्या नामाने प्रसिद्ध आहे, त्यालाच नव वृंदावन-नवद्वीप जाणा.

जी व्यक्ती वृंदावन व नवद्वीपात आणि राधाकृष्ण व परमात्म-स्वरूप श्रीगौरांगदेवात भेदबुद्धी करते, ती नराधम व्यक्ती माझ्या शूळाद्वारा छिन्न-भिन्न होऊन प्रलय काळ पर्यंत घोर नरकाची यातना भोग करते." *(अनंत-संहिता)*

# श्रीनित्यानंद-त्रयोदशी

**संकर्षणः कारणतोयशायी गर्भोदशायी च पयोऽब्धिशायी।**
**शेषश्च यस्यांशकलाः स नित्यान्दाख्यरामः शरणं ममास्तु॥**

'संकर्षण, कारणाब्धिशायी विष्णू, गर्भोदशायी विष्णू, पयोब्धिशायी विष्णू आणि शेष ज्यांचे अंश आणि कला आहेत; ते 'नित्यानंद' रूप श्रीबलराम माझे शरण्य (शरण प्रदान करणारे) होवोत.' तत्त्व-विचारात श्रीकृष्णचैतन्य महाप्रभू आणि श्रीमन् नित्यानंद प्रभू —दोन्हीही परात्पर-तत्त्व आहेत. तरीही श्रीनित्यानंद प्रभू, श्रीमन्महाप्रभूंच्या प्रती सदैव सेवा-निष्ठ आहेत. **"भक्त-अभिमान मूल श्रीबलरामे। सेईभावे अनुगत ताँर अंशगणे।"** (चैतन्य चरितामृत) म्हणून त्यांच्या अंशांमध्ये देखील तो भक्त-भाव विद्यमान आहे. श्रीमान नित्यानंद प्रभू, स्वयं विषय-विग्रह असूनही मूल-विषय-विग्रहाच्या प्रती सेवक-भाव-विशिष्ट असतात म्हणून त्यांच्या द्वारा प्रकाशित बाकी सर्व स्वांश-तत्त्व (त्यांच्यातून प्रकाशित विष्णू-तत्त्व) आणि विभिन्नांश (जीव) तत्त्वांमध्ये सेवक-भाव युक्त आहे. म्हणून ते आकर (मूल) गुरुतत्त्वाच्या रूपात प्रसिद्ध आहेत. ते श्रीनित्यानंद प्रभू, श्रीचैतन्य महाप्रभूंच्या आज्ञेने त्यांच्या आधीच जगात अवतीर्ण झाले.

**"ईश्वर-आज्ञाय आगे श्रीअनन्त-धाम।**
**राढे अवतीर्ण हइला नित्यानन्द-राम॥**
**माघ-मासे शुक्ला त्रयोदशी शुभ-दिने।**
**पद्मावती-गर्भे एकचाका-नाम ग्रामे॥**
**हाडाईपण्डित नामे शुद्धविप्रराज।**
**मूले सर्वपिता, ताने करे पिता-ब्याज॥**
**कृपासिन्धु, भक्तिदाता, प्रभु बलराम।**
**अवतीर्ण हैला धरि' नित्यानन्द-नाम॥"**

*—(चैतन्य भागवत आदी २/१२८-१३१)*

अर्थात्, श्रीअनंतदेवांचे आश्रय-स्वरूप श्रीनित्यानंद-बलराम, ईश्वराच्या आदेशाने, त्यांच्या आधी, बंगालच्या 'राढ'-प्रदेशात अवतीर्ण झाले होते. माघ-मासाच्या शुक्ला त्रयोदशीच्या शुभ-दिवशी, 'पद्मावती'-देवीच्या गर्भातून एकचाका (एकचक्र) नामक ग्रामात हाडाई पंडित नामक शुद्ध ब्राह्मणराजांच्या घरी आविर्भूत झाले. ते मूलतः सर्वांचे पिता आहेत परंतु त्यांना आपले पिता मानले. कृपासिंधू, भक्तिदाता, प्रभू बलरामांनी अवतीर्ण होऊन 'नित्यानंद'-नाम धारण केले.

म्हणून माघ महिन्याची शुक्ल त्रयोदशी तिथी गौडीय भक्तांसाठी परम आदरणीय आहे. ते उक्त तिथीला 'हरिदिवस' मानून सम्मान प्रदान करण्यासाठी व्रतोपवास करतात. परंतु कोणी-कोणी श्रीनित्यानंद प्रभूंना केवळ 'गुरु-तत्त्व' मानून, उपरोक्त तिथीमध्ये 'व्रतोपवास' पालन करित नाहीत. ते गुरुतत्त्व असूनही मूल रूपात 'विष्णुतत्त्व' आहे—याला कशाही प्रकारे अस्वीकार केले जाऊ शकत नाही. परंतु त्यांच्या आविर्भाव तिथीचा व्रतोपवासाच्या द्वारा सम्मान न केल्यास वास्तवात त्यांचे विष्णूत्व अस्वीकृतच होते. या प्रसंगात श्रीचैतन्य-लीलेचे व्यास, श्रीवृन्दावन दास ठाकुरांनी म्हटले आहे—

**नित्यानन्द-जन्म माघी-शुक्ला त्रयोदशी।**
**गौरचन्द्र-प्रकाश फाल्गुनी पौर्णमासी॥**
**सर्व-यात्रा मंगल एई दुई पुण्यतिथि।**
**सर्व-शुभ-लग्न अधिष्ठान हय इथि॥**
**एतेके ए दुइ तिथि करिले सेवन।**
**कृष्णभक्ति हय, खण्डे अविद्या-बंधन॥**

*—(चैतन्य भागवत आदी ३/४५-४७)*

अर्थात् नित्यानन्द प्रभूंचा जन्म, माघी शुक्ला त्रयोदशीला आणि गौरचंद्राचा प्रकाश फाल्गुनी पौर्णिमेला झाला. या दोन्ही पुण्य (पवित्र) तिथ्या प्रत्येक प्रकारे मंगलदायक आहेत. यांच्यात सर्व प्रकारे शुभ-लग्न अधिष्ठान करतात. म्हणून या दोन्ही तिथींचे पालन केल्याने कृष्ण-भक्ती होते आणि अविद्या-बंधन तुटते.

जगद्गुरू श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपादांनी आपल्या 'गौडीय-भाष्या'त म्हटले आहे की,—"या दोन पुण्य (पवित्र) तिथ्या —अर्थात माघी शुक्ला त्रयोदशी आणि फाल्गुनी पूर्णिमा, या दोन्ही तिथींची सेवा (पालन) केल्याने बद्ध-जिवांचे अविद्या-बंधन तुटते आणि कृष्ण-सेवेची प्रवृत्ती उदित होते. या दोन्ही तिथ्या—जयन्ती-व्रते किंवा भगवंतांच्या आविर्भावाचे दिवस आहेत; उपवास आदीच्या द्वारे आणि महोत्सव आदीच्या द्वारे या दोन्ही तिथींची सेवा होते." म्हणून या दोन्ही तिथींमध्ये व्रतोपवास अवश्य करायला हवा —याच्यात कोणताही संशय राहू शकत नाही. मग श्रील प्रभुपादांनी या प्रसंगात, उपरोक्त भाष्यात ब्रह्म-पुराणातून उद्धृती करताना सांगितले आहे,—

**"तस्यां विष्णुतिथौ केचिद् धन्याः कलियुगे जनाः।**
**येऽभ्यर्च्चयन्ति देवेशं जाग्रतः समुपोषिताः।**
**न तेषां विद्यते क्वापि संसारभयमुल्वणम्।**
**यत्र तिष्ठन्ति ते देशे कलिस्तत्र न तिष्ठति॥**
**इदमेव परं श्रेयः इदमेव परं तथा।**
**इदमेव परो धर्म यद्विष्णुव्रतधारणम्॥"**

अर्थात्, कलियुगात विष्णू तिथीमध्ये जे लोक उपवास आणि जागरणाच्या द्वारे देवादिदेव श्रीविष्णूंचे अर्चन करतात, तेच धन्य आहेत. त्यांना परत कधीही घोर संसाराचे भय राहात नाही आणि जेथे ते निवास करतात, तेथे कली निवास करण्यास असमर्थ होतो. म्हणून श्रीविष्णू ज्या प्रकारे सर्वश्रेष्ठ-तत्त्व आहेत, त्याच प्रकारे विष्णु-व्रताचे पालन, सर्व-लाभदायक आहे तथा हाच जिवाचा परम धर्म आहे.

विशेष रूपाने श्रीमन् नित्यानन्द प्रभूंची कृपा लाभ करण्यासाठीच गौडीय भक्तगण या तिथीला परम आदराने त्यांचे अप्राकृत लीला कीर्तन करीत व्रतोपवास पालन करतात. त्यांच्या कृपेने अलभ्य (प्राप्त न होऊ शकणारी वस्तू) देखील सहजतेने प्राप्त होऊन जाते. श्रीवृंदावनदास ठाकूर, श्रीकृष्णदास कविराज गोस्वामी, श्रीनरोत्तम दास ठाकुर इत्यादी गौडीय महाजनांनी उच्च स्वराने कीर्तन करून जगाला नित्यानन्द प्रभूंच्या महिमेशी अवगत करविले आहे—

**"संसारेर पार हञा भक्तिर सागरे।**
**जे डूबिबे से भजुक निताइचान्देरे॥"**

—(*श्रीचैतन्यभागवत*)

अर्थात् संसारातून पार होऊन भक्तीच्या सागरात जे निमग्न होऊ इच्छितात, त्यांनी श्रीनिताईचंद्रांचे भजन करावे.

**"जय जय नित्यानन्द, नित्यानन्द राम।**
**जाँहार कृपाते पाइनु वृन्दावन-धाम॥**
**जय जय नित्यानन्द, जय कृपामय।**
**जाँहा हैते पाइनु रूप-सनातनाश्रय॥**
**जय जय नित्यानन्द-चरणारविन्द।**
**जाँहा हइते पाइनू श्रीराधागोविन्द॥"**

—(*चैतन्य चरितामृत आदी पंचम अध्याय*)

अर्थात जय जय नित्यानन्द, नित्यानन्द–बलराम। ज्यांच्या कृपेने प्राप्त झाले वृंदावन–धाम। जय जय नित्यानंद, जय कृपामय। ज्यांच्या कृपेने प्राप्त झाला रूप–सनातनांचा आश्रय। जय जय नित्यांनंदाचे चरणारविंद। ज्यांच्यामुळे प्राप्त झाले श्रीराधागोविंद।

**"हेन निताई बिने भाई, राधाकृष्ण पाइते नाइ,**
**दृढ करि धर निताइर पाय॥"**

*—(श्रीनरोत्तम ठाकुर)*

अर्थात् अरे भाऊ! अशा निताईंच्या विना, राधाकृष्णांना प्राप्त करण्याची इच्छा करू नये, म्हणून दृढतेने निताईंच्या चरणांना पकडा.

श्रीबलदेव–पूर्णिमेत उल्लिखित बलदेव–तत्त्व आणि महिमा, व्रतविधी आदी येथेही त्याच प्रकारे चर्चा करण्यायोग्य आणि पालनीय आहेत.



**श्रीश्रीगौरनित्यानंद प्रभू**

# श्रीगौर–पूर्णिमा

**सर्वसद्गुणपूर्णां तां वन्दे फाल्गुनपूर्णिमाम्।**
**यस्यां श्रीकृष्णचैतन्योऽवतीर्णः कृष्णनामभिः॥**

—*(चैतन्य चरितामृत आदी १३/१९)*

श्रीराधाकृष्ण–मिलित–रूप, मूल–अवतारी, गोलोकनाथ श्रीगौरचंद्र आपापल्या गौर–प्रकोष्ठातून, श्रीकृष्णनामासहित, भौम–नवद्वीपात ज्या पूर्णिमेला अवतीर्ण झाले होते, मी, त्या सर्व सद्‌गुणांनी पूर्ण, अप्राकृत सेवा मूलक—फाल्गुनी–पूर्णिमा तिथिवराला (श्रेष्ठ तिथीला) वंदन करतो.

**"चौद्दशत सातशके मास जे फाल्गुन।**
**पौर्णमासीर संध्याकाले हैले शुभक्षण॥**
**अ–कलंक गौरचन्द्र दिला दरशन।**
**स–कलंक चन्द्रे आर कोन् प्रयोजन?"**

—*(चैतन्य चरितामृत)*

अर्थात् १४०७ शकाब्दात फाल्गुन महिन्याच्या पौर्णिमेच्या संध्याकाळी शुभ क्षण उपस्थित झाल्यावर कलंक रहित गौरचंद्र प्रकट झाले. तेव्हा आकाशातील स–कलंक (डाग असणाऱ्या) चंद्राची आणखी काय आवश्यकता आहे? अशा प्रकारे समस्त गुणांचे आश्रय स्वरूप आणि सर्व–दोषहीन पूर्णचंद्र गौरहरींनी श्रीशची–गर्भ–सिंधूतून (शचीमातेच्या गर्भातून) नवद्वीपाच्या अंतर्गत श्रीमायापूर–धामात प्रकाशित होऊन आपल्या अनर्पितचर (जे पहिले कधी दिले नाही, असे) परम–औदार्य (परम उदारता)–गुणाच्या प्रभेने (दीप्तीने) समग्र विश्वाला उद्भासित (प्रकाशित) आणि आप्लावित केले.

या विशेष दिवशी, गौरांग महाप्रभूंच्या गुणगानात मत्त होऊन पूर्ण दिवस व्रत–उपवास पालन, संध्याकाळी महाप्रभूंचा अभिषेक व नृत्य–कीर्तन करीत रात्रीचे जागरण आणि दुसऱ्या दिवशी महाप्रभूंच्या पूजेनंतर यथाविधी पारणे—हे शुद्ध–भक्ति–पिपासू प्रत्येक जिवाला करायला पाहिजे. श्रीहरिभक्ति–विलासात स्पष्ट रूपाने आदेश दिला गेला आहे की, श्रीभगवंतांच्या जन्मदिवशी किंवा जयंतीला अवश्य उपवास करायला हवा. **"तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ"**—*(गीता १६/२४)* वाक्यानुसार समस्त शास्त्रांच्या प्रमाणाद्वारे) श्रीगौरसुंदर स्वयंरूप भगवंतांच्या रूपात निर्णीत झाले आहे. **"म्हणून ज्या प्रकारे श्रीकृष्ण–जन्माष्टमीला उपवास इत्यादी व्रताचे पालन करायचे असते, त्याच प्रकारे श्रीगौरसुंदरांची आविर्भाव**

**तिथी—फाल्गुनी पूर्णिमेला देखील उपवास इत्यादी नियम परिपालित केले जातील."**—*(साप्ताहिक गौडीय ९वे वर्ष, ४०वी संख्या* ६६९ *पृष्ठ).*

श्रीहरिभक्तिविलास-ग्रंथात, या व्रतोपवासाच्या संबंधात स्पष्ट उल्लेख न मिळाल्यामुळे, काही व्यक्ती या व्रताला पालन करण्याच्या विषयी उदासीन राहतात. ज्या कारणामुळे उपरोक्त ग्रंथाच्या रचनाकरांनी त्याचा स्पष्ट रूपाने उल्लेख केला नाही आहे. तो आहे की, गौर-अवतार—**'छन्न कलौ'** *(श्रीमद्‌भागवत ७/९/३८)* अर्थात् गुप्त रूपाने भगवत् तत्त्व आहेत. परंतु श्रीचैतन्य-लीलेचे व्यास नित्य-गौरपार्षद श्रीवृंदावनदास ठाकुरांनी आमच्यासाठी या गोपनीय वेद-तिथीच्या परम-उपास्यत्वालाच प्रकाशित केले आहे,—

**चैतन्येर जन्मयात्रा फाल्गुनी-पूर्णिमा।**
**ब्रह्मा-आदि ए तिथिर करे आराधना॥**

*—(चैतन्य भागवत आदी ३/४३)*

अर्थात् श्रीचैतन्य महाप्रभूंची जन्मयात्रा फाल्गुनी-पूर्णिमा तिथीला आहे. ब्रह्मदेव आदी सर्व देवता या तिथीची आराधना करतात.

ब्रह्मदेव इत्यादी देवता देखील श्रीचैतन्य महाप्रभूंच्या जन्म-तिथीमध्ये उपवास आदी व्रत-विधीच्या द्वारे आराधना करतात. "प्रत्येक व्यक्तीसाठीच उपवास आदी व्रताच्या द्वारे श्रीगौर-जन्म-तिथीची आराधना करणे ऐकान्तिक कर्तव्य आहे. गोस्वामींच्या द्वारे पूर्व-आचरित अनुष्ठाने—जी सिद्ध महाजन आणि आचार्यांमध्ये प्रचलित राहिले आहेत, त्याच्याद्वारे विना कोण्या शंकेशिवाय प्रमाणित होते की, गोस्वामीगण, आचार्यगण, शुद्ध भक्तगण--सर्वांनीच श्रीमन्महाप्रभूंच्या जन्म-तिथीला उपवास आदी व्रतांचे पालन केले आहे. भोग-विलासी, स्मार्तपदावलेही (स्मार्त विचारधारेचे तळवे चाटणारी), प्राकृत-सहजिया (शुद्ध भक्तांच्या कृतींचे अनुसरण न करता फक्त अनुकरण करणारी, Imitationist), उत्पथगामी (कुपथगामी, चुकीच्या मार्गावर चालणारे), आचार्य-संतान-ब्रुव (आचरणहीन असूनही स्वतःच आचार्यांची संतान म्हणविणारे), गोस्वामी-ब्रुव (स्वतःला गोस्वामी म्हणविणारे) आदी कोणी व्यक्ती जर विरुद्ध आचरण करते तर तिचा श्रीगोस्वामीवर्गाच्या मत-विरोधी भोगमय आचरणाच्या रूपात जाणून, त्याग करायला हवा—याच्यात कोणतीही शंका नाही आहे."—*('साप्ताहिक गौडीय' ९ वे वर्ष, ४०वी संख्या, २३ मे, १९३१)*

श्रीचैतन्य महाप्रभूंनी स्वतःच श्रीसनातन गोस्वामी यांना सांगितले आहे,—

**"एकादशी, जन्माष्टमी, वामनद्वादशी।**
**श्रीरामनवमी आर नृसिंह-चतुर्दशी॥**
**एई सबे बिद्धा-त्याग, अबिद्धा-करण।**
**अकरणे दोष, कैले भक्तिर लभन॥"**

—*(चैतन्य चरितामृत मध्य २४/३३६, ३३७)*

अर्थात्, एकादशी, जन्माष्टमी, वामन-द्वादशी, श्रीरामनवमी आणि नृसिंह-चतुर्दशी, या सर्वांत विद्धा तिथींचा त्याग करून अविद्धा-तिथीचे पालन करायला हवे. याचे पालन न केल्याने दोष होतो आणि केल्याने भक्ती लाभ होते.

—या उपदेशाद्वारे माहिती पडते की, श्रीएकादशी आणि समस्त भगवत्-जन्म तिथींनाच विद्धा-दोष सोडून पालन करायला हवे आणि समस्त भगवत्-जन्म तिथींनाही विद्धा-दोष सोडून पालन करायला हवे आणि न पालन केल्याने दोष लागतो आणि पालन केल्यावर शुद्ध-भक्ती लाभ होते. याच्या द्वारा समजायला हवे की, महाप्रभूंनी दुसरीकडे फाल्गुनी पूर्णिमा, श्रीनित्यानंद-त्रयोदशी आणि श्रीअद्वैत-सप्तमीच्या संबंधी देखील एकच प्रकारच्या व्रतोपवासाचे पालन करण्याचे नियम आणि पालन-अपालन करण्याच्या फळ-अफळाच्या विषयात सांगितले आहे. ज्यांना शुद्ध-भक्ती लाभ करण्यासाठी उपयुक्त सुकृती प्राप्त झाली आहे, तेच मात्र या सर्व गोष्टींच्या समस्त प्रकारच्या तात्पर्याला अनुभव करू शकतात.

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्परः।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।**
**भवामि न चिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥**

*(श्रीगीता १२/६-७)*

भगवान श्रीकृष्ण अर्जुनांना म्हणाले, "परंतु जे लोक समस्त कर्म माझ्या प्राप्तीसाठीच अर्पण करून माझ्या परायण होऊन अनन्य भक्तियोगाने माझे ध्यान करतात माझे भजन करतात, हे पार्थ! माझ्यात आसक्तचित्त त्या लोकांना शीघ्रच मी त्या मृत्युरूप संसार-सागरातून पार करून टाकतो."

# चातुर्मास्य

*(जगद्गुरू श्रीश्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपाद)*

## *सर्व शास्त्रांमध्येच चातुर्मास्याचा उल्लेख*

वेद-शास्त्रांमध्ये अनेक स्थानांवर चातुर्मास्य पालन करण्याची कथा आणि चातुर्मास्याच्या कृत्यांचा उल्लेख आहे. धर्म-शास्त्रांमध्ये देखील सत्कर्मीसाठी चातुर्मास्य-व्यवस्थेचा अभाव नाही आहे. पुराणांत देखील अनेक स्थानांवर चातुर्मास्य-व्रताची गोष्ट पाहायला मिळते.

आधुनिक स्मृतीच्या लेखांमध्ये देखील चातुर्मास्य-विधान, परमार्थी आणि स्मार्त व्यक्तींसाठी अपरिचित नाही आहे. परमार्थ-स्मृती श्रीहरिभक्तिविलास अथवा रघुनंदन ठाकुरांच्या कृत्य-तत्त्वामध्ये देखील आम्ही चातुर्मास्य-व्रताची गोष्ट पाहातो.

## *एकदंडी आणि त्रिदंडी सर्वांसाठीच—चातुर्मास्य-व्रत*

कर्मकांडीय विचारातच केवळ चातुर्मास्य-पालनाचे फळ वर्णित आहे, असे नाही. **'काठक गृह्यसूत्रा'**त देखील आम्ही यती धर्म-निरूपणात पाठ करतो की,—

**"एकरात्रं वसेद् ग्रामे नगरे पंचरात्रकम्।**
**वर्षाभ्योऽन्यत्र वर्षासु मासांश्च चतुरो वसेत्॥"**

(अर्थात् पावसाळा सोडून, अन्य वेळी गावात एक रात्र आणि नगरात पाच रात्रींपर्यंत निवास करू शकतात परंतु पावसाळयाच्या चारी महिने निरंतर वास करू शकतात).

**एकदंडी ज्ञानीगण आणि त्रिदंडी भक्तगण दोघेही चातुर्मास्य-व्रत धारण** (पालन) **करतात.** श्रीशंकर-मताच्या अनुयायींमध्येदेखील चातुर्मास्य-व्रताची व्यवस्था आहे.

## *श्रीगौरसुंदरांच्या द्वारे चातुर्मास्य-व्रताचे पालन*

**श्रीभगवान गौरसुंदरांनी देखील चातुर्मास्य उपस्थित झाल्यावर कावेरीच्या तटावर श्रीरंग-मंदिरात चार महिन्यांपर्यंत निवास केला.** श्रीगौडीय भक्तगण चार महिन्यांसाठी श्रीनीलाचल (पुरी) मध्ये श्रीगौरांग महाप्रभूंच्या श्रीचरणी प्रत्येक वर्षीच जायचे आणि तेथे त्यांच्या अवस्थानाची (निवासाची)गोष्ट लीला-लेखकांच्या ग्रंथांमध्ये पाहिली जाते.

## *चारी आश्रमांतील प्रत्येक हिंदू व्यक्तीसाठीच चातुर्मास्य-व्रत*

चारी प्रकारच्या आश्रमांमध्ये चातुर्मास्य व्रत पालन करण्याची व्यवस्था आहे. कष्टकर (कठीण, दुर्घट) असल्यामुळे त्या समस्त प्राचीन रिती हळूहळू समाजातून समाप्त होत आहेत. फलकामी कर्मी लोकांमध्ये अथवा निष्काम भक्त-संप्रदायात व्रत-पालनाची पद्धत थोडीबहुत वेगळी असूनही सर्व हिंदू लोक या व्रताचा सम्मान अवश्य करतात.

## *चातुर्मास्यात भोग-परित्यागाचा आदर्श*

याच्यात भोग-त्यागाची विधी पूर्ण रितीने व्यक्त झाली आहे. भोग-त्यागाचा विधी—कर्मी, ज्ञानी आणि भक्त तिन्ही प्रकारच्या समाजातच समान रूपाने आदरणीय वस्तू आहे. म्हणून तिन्ही पथांचे समस्त अनुयायी आर्यगण (भारतवासी) चारी आश्रमांमध्ये चातुर्मास्याचा सम्मान करतात. जे लोक बिलकुल असमर्थ आहेत, ते अनेक दिवसांपर्यंत नियमांच्या अधीन होण्यास सुविधाजनक (सोपे) न मानून हळूहळू त्या सर्व व्रत इत्यादी नियमांमध्ये शिथिलता प्रदर्शित करीत आहेत.

## *त्यागाच्या उद्देशानेच गृहस्थांद्वारे भोग-स्वीकार*

चारी आश्रमांपैकी तीन आश्रमांमध्ये अर्थात् ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि भिक्षूंच्या आश्रमात भोगाचे काहीच माहात्म्य नाही आहे. केवळ गृहस्थांच्या द्वारे कर्तव्यपालनाच्या विषयात जो निर्दिष्ट (निर्धारित, निर्देशित) भोगाचा भाव (शास्त्रांच्या द्वारा) आदेशित आहे, तो देखील भोग-त्यागाच्या उद्देश्यानेच आहे. ज्या लोकांना आठ महिन्यांच्या दरम्यान गृहस्थ-धर्माच्या पालनाचा अधिकार अधूनमधून प्राप्त होतो, तेदेखील वर्षाच्या पावसाळयाचा काळ अर्थात चार महिन्यांपर्यंत भोग-त्याग-विधी पालन करून इतर आश्रमींसोबत भोग त्याग करून राहतात.

## *असमर्थांसाठी कार्तिक अर्थात् ऊर्जा-विधी पालन करणे कर्तव्य*

जे लोक चार महिन्यांपर्यंत नियम सेवा पालन करण्यास असमर्थ आहेत, त्यांच्यासाठी केवळ ऊर्जाविधी अर्थात कार्तिक मासात विशेष रूपाने नियम-सेवा पालन करण्याचा विधी आहे. कोणी-कोणी भक्त चातुर्मास्य-व्रत पालन करण्यास असमर्थ होऊन

केवळ दामोदर-व्रताचे पालन करतात, त्याला पाहून कोणी हे समजू नये, भक्तांसाठी चातुर्मास्य-नियमाची आवश्यकता नाही आहे. ती असमर्थ लोकांसाठी अनुकल्प (वैकल्पिक, alternate) व्यवस्था मात्र आहे. चार महिन्यांपर्यंत नियमाच्या अधीन राहून हरि-सेवा केल्याने निसर्गतः (स्वाभाविक रूपाने) मनात हरिसेवेची प्रवृत्ती उत्पन्न होईल. जीव स्वाभाविक रूपाने हरि-परायणतेचे प्रदर्शन करू शकतात.

## *चातुर्मास्याचे काल-निरूपण*

चातुर्मास्याचा काळाबाबत वराह-पुराणात अशा प्रकारे लिहिले आहे—

**"आषाढ-शुक्लद्वादश्यां पौर्णमास्यामथापि वा।**
**चातुर्मास्य-व्रतारम्भं कुर्यात् कर्कट-संक्रमे॥**
**अभावे तु तुलार्केऽपि मंत्रेण नियमं व्रती।**
**कार्तिके शुक्लद्वादश्यां विधिवत्तत् समापयेत्॥"**

आषाढ मासात शुक्ला द्वादशी तिथीपासून कार्तिकच्या शुक्ल द्वादशीपर्यंत ह्या चार 'चांद्र-मासा'त या व्रताच्या नियमांचे पालन करतील. अथवा आषाढ-पौर्णिमेपासून कार्तिक-पौर्णिमेपर्यंत चार 'चांद्र-मास' पर्यंत हे व्रत करण्याचा नियम आहे. अथवा कर्कट-संक्रांती अर्थात् सौर-श्रावणापासून सौर-कार्तिकच्या शेवटपर्यंत श्रीचातुर्मास्य व्रताचा काळ आहे. जे लोक चार महिन्यांपर्यंत वर लिहीलेल्या तीन प्रकारच्या विचारांच्या आधारावर चातुर्मास्य व्रत पालन करण्यास असमर्थ आहेत, ते नियम-सेवा पालन करित कार्तिक मासात आपल्या मंत्रजप आदीद्वारे विधिपूर्वक व्रत पालन करतील. उर्जा-व्रताचे पालन करणे विशेष कर्तव्य आहे. याचा चौसष्ट प्रकारच्या भक्ति-अंगांच्या अंतर्गत देखील उल्लेख झाला आहे. कार्तिक शुक्ल द्वादशीपासून व्रत परिहार करणे आरंभ करावे अर्थात पंचवीस दिवसांपर्यंत अवश्यच व्रताचे पालन करावे.

## *श्रीहरि-शयनाच्या वेळी चातुर्मास्य-व्रत न केल्याने हानी*

श्रीभगवान पावसाळाच्या चार महीने शयन करतात. या शयन काळात कृष्ण सेवेच्या प्रवृत्तीत वृद्धीसाठी, चातुर्मास्य व्रताचे पालन करायला हवे. हे नित्य व्रत आहे. व्रत न केल्याने प्रत्यवाय (नुकसान) होते. शास्त्रांमध्ये म्हटले आहे—

**इत्याश्वास्य प्रभोरग्रे गृहणीयान्नियमं व्रती।**
**चातुर्मासेषु कर्त्तव्यं कृष्णभक्ति-विवृद्धये॥**

—*(हरिभक्तिविलास १५/५९)*

अर्थात, व्रती व्यक्ती, “हे जगन्नाथ! आपण शयन केल्यावर हे जगत सुप्त (निद्रित) होऊन जाते आणि आपण जागे झाल्याने हे जग जागृत होऊन जाते. हे अच्युत! आमच्यावर प्रसन्न व्हावे.”— अशा प्रकारे प्रार्थना करीत, प्रभूंच्या समोर कृष्ण-भक्तीच्या वृद्धीसाठी आवश्यक-कृत्यांचा नियम ग्रहण करतील.

**यो विना नियमं मर्त्यो व्रतं वा जप्यमेव वा।**
**चातुर्मास्यं नयेन्मूर्खो जीवन्नपि मृतो हि सः॥**

*—(हरिभक्तिविलास १५/६० संख्या-धृत भविष्यपुराण-वचन)*

अर्थात, जे लोक नियम, व्रत अथवा जपाशिवाय चातुर्मास्य आदी व्यतीत करतात, ते मूर्ख आहेत आणि जीवित अवस्थेत मृताच्या समान आहेत.

**जप-होमाद्यनुष्ठानं नाम-संकीर्तनस्तथा।**
**स्वीकृत्य प्रार्थयेद्देवं गृहीतनियमो बुधः॥**

*—(हरिभक्तिविलास १५/६५)*

अर्थात नियम धारण करणारी पंडित व्यक्ती, जप, होम आदीचे अनुष्ठान आणि नाम-संकीर्तन करीत भगवंतांच्या समोर “हे देव! आपल्या समक्ष हे व्रत ग्रहण करतो आहे; हे केशव! आपल्या अनुग्रहाने हे अगदी निर्विघ्न पूर्ण होवो"—अशा प्रकारची प्रार्थना करतील.

चातुर्मास्य-व्रताच्या वर्जनीय-विचारात लिहिले गेले आहे—

**श्रावणे वर्ज्जयेच्छाकं दधि भाद्रपदे तथा।**
**दुग्धमाश्वयुजे मासि कार्तिके चामिषं त्यजेत्॥**

*—(हरिभक्तिविलास १५/६१)*

चातुर्मास्याच्या पहिल्या (श्रावण) महिन्यात पालेभाज्या, भाद्रपद महिन्यात दही, आश्विन महिन्यात दूध आणि कार्तिक महिन्यात ‘आमिष’ भोजनाचा त्याग करावा. ‘पालेभाज्या’-शब्दाचा काही व्यक्ती (स्वयंपाकघरात) शिजविल्या जाणाऱ्या पालक, मेथी आदी भाज्या असा अर्थ काढतात. (वस्तुतः) भोग त्याग करून हरिनाम-संकीर्तनाचाच उपदेश दिला गेला आहे.

**‘रुच्य तत्तत्काल-लभ्यं फल-मूलादि वर्ज्जयेत्।’**

ऋतूच्या अनुसार फळे आणि कंदमुळे, ज्यांचे आस्वादन

करण्याचा जिवाला लोभ होतो आणि श्रीहरींची विस्मृती होते, त्याला अधिक मात्रेत सेवन केल्याने जड-वस्तूत (निर्जीव वस्तूत) अतिरिक्त अभिनिवेश (आसक्ती) होते; म्हणून चातुर्मास्यात त्यांचा त्याग करून इंद्रियांचा संयम राखून श्रीहरींचे कीर्तन करावे.

श्रीहरींच्या शयन-काळात शिंबी, राजमाष अर्थात बरबटी, कलिंग किंवा इंद्रजव (यवफल), परवल, वांगी आणि शिळे जेवण ग्रहण करू नये. पांढरी वांगी अशुद्ध आहेत, ती पूर्णतः वर्जित आहेत. सामर्थ्यवान लोकांनी पटोल (राजफल), वांगी इत्यादी सुखकर (सुखदायक) खाद्य देखील त्याग करावीत.

अनेक प्रकारचे त्याग एकदम संभव नाही आहेत; म्हणून जितके संभव असेल सामर्थ्यवान लोक तितकाच त्याग करतील. कर्मीगण भोग परायण असतात; म्हणून त्यागाचे फळ इत्यादी रुची उत्पन्न करण्यासाठी सांगितले गेले आहेत. सगळे मिळून, त्यागाच्या द्वारा अभिनिवेश (आसक्ती) कमी झाल्यावर भगवत्-उन्मुखतेचा अवसर प्राप्त होतो. **आत्म-धर्म अर्थात् नित्य हरिसेवेच्या धर्माला उदय करण्यासाठी, रुचीच्या अनुकूल शरीर आणि मनाच्या धर्माला जितके संकुचित केले जाऊ शकते, तितकीच हरिसेवेत उत्साहाची वृद्धी होईल.**

## *सामर्थ्यवान लोकांसाठी व्रत-पालनाचा विधी*

चातुर्मास्य-काळात संभव असल्यास व्रत करणाऱ्या व्यक्तीने एकदाच मात्र प्रसाद ग्रहण करावा, दररोज स्नान करावे, हरिनिष्ठ बनावे आणि चारी महिने श्रीहरींचे अर्चन (पूजा) करतील. हरींच्या शयनकाळात विलासपूर्ण शैय्या इत्यादीचा वापर करणे निषिद्ध आहे, भूमीवर (जमिनीवर) शयन करणेच उचित आहे.

व्रती व्यक्ती योगाचा अभ्यास करतील. सर्व योगांमध्ये भक्तियोगच प्रशस्त आहे, तीच आहे आत्म्याची नित्य वृत्ती. राजयोग किंवा ज्ञानयोग—मनाची अनित्य-वृत्ती आहे आणि कर्मयोग किंवा हठयोग—शरीर आणि काही सीमेपर्यंत (परिमाणात) मानसिक वृत्तिमय अर्थात अनित्य आहेत.

चार महिन्यांपर्यंत मौन व्रत ग्रहण केल्यावर केवळ अविमिश्र (शुद्ध) हरि-कीर्तनाचा अवसर प्राप्त होतो. पात्राशिवाय (ताट न घेता), भूमीवर (फरशीवर) भोजन केल्याने स्वाभाविक हरि-सेवामयी दीनता उपस्थित होते. भजनाच्या उत्तम स्थितीत बाधा पडत नाही. भक्तांच्या चातुर्मास्य-विधीला अनुकूल-रूपात भजनासाठी सहाय्यक

मानावे लागेल. हरिशयनाच्या वेळी नियमात राहाणे—विधि-शास्त्रांचा आदेश आहे.

**तस्मिन् काले च मद्भक्तो यो मासांश्चतुरः क्षिपेत्।**
**व्रतैरनेकैर्नियमैः पाण्डव श्रेष्ठमानवः॥**

—*(हरिभक्तिविलास १५/१३)*

हे पाण्डव! त्या वेळी (श्रीभगवंतांच्या चार मास शयनाच्या वेळी) माझे जे भक्त बऱ्याच साऱ्या व्रत-नियमांद्वारे उक्त चार महिन्यांचा काळ व्यतीत करतात, तेच मनुष्यांमध्ये श्रेष्ठ आहेत.

याच्याशिवाय केवळ रात्रीचे भोजन, पंचगव्य-भोजन, तीर्थ-स्नान, अयाचित (न मागता प्राप्त झालेले) भोजन, हरिमंदिरात गीत-वाद्य (कीर्तन), शास्त्रामोदाद्वारे लोक-प्रमोदन (अर्थात् शास्त्र-चर्चेतून आनंद घेत लोकांना आनंदित करणे), तेलाशिवाय स्नान आदी देखील चातुर्मास्याच्या नियमाच्या रूपात ग्रहण केले जाऊ शकतात.

## *सामर्थ्यवान व्यक्तींसाठी व्रत-पालनाचे निषेध*

सामर्थ्यवान व्रती व्यक्ती मीठ, तेल, मध, फुलांच्या भोगाचा त्याग करतील. सर्व प्रकारचे रस—कडू, आंबट, तिखट, मधुर, क्षार (खारट), तुरट इत्यादीचा त्याग करतील.

चातुर्मास्यात पान खाणे निषिद्ध आहे. सामर्थ्यवान लोक शिजवलेले द्रव्य ग्रहण करणार नाहीत. दही, दूध, ताक इत्यादींचा परित्याग करू शकतात. हंडीत शिजविलेल्या भोजनाचा त्याग करणे चातुर्मास्याचा नियम आहे. दारू, मध, मास इत्यादी वर्जनीय आहेत. सामर्थ्यवान व्यक्ती एक दिवसाआड एक दिवस उपवास करतील. हरिशयनात नखे-केस आदी कापू नये. याच्यामुळे भद्रता अर्थात विलासिता (सुख- लोलुप होण्याचा भाव) येतो.

## *कृष्ण-सेवा तात्पर्यच चातुर्मास्याचे फळ*

व्रताचे सर्व फळ, सकाम कर्मी लोकांसाठी आहेत; ज्ञानी किंवा भक्तांसाठी लौकिक आणि पारलौकिक फळाची आवश्यकता नाही आहे. मोक्षाच्या इच्छुक ज्ञानींचे मुक्तिफळ देखील भक्तांसाठी त्याज्य (त्याग करण्याजोगे) आहे. भगवद्-भक्ती झाल्यावर मोक्षाची कामनादेखील छोटी पडते. पूर्णतः कृष्ण-सेवेत तत्पर झाल्यावरच चातुर्मास्याचे चरम (सर्वश्रेष्ठ) फळ प्राप्त होते.

# ‘चातुर्मास्य-व्रता’संबंधी आणखी काही तथ्ये

## *‘ऊर्जादर-विशेषणा’चे तात्पर्य*

जगद्गुरू श्रील प्रभुपादांद्वारे लिखित ‘चातुर्मास्य’ प्रबंधात चातुर्मास्य-व्रताच्या संबंधात समस्त शास्त्रीय उपदेश उल्लिखित आहेत. ‘श्रीहरिभक्तिविलास’-ग्रंथात या व्रताचे चारी वर्ण आणि चारी आश्रमांच्या सर्व लोकांसाठी अवश्य पालनीय (पालन करण्याजोगे) म्हणून वर्णन केले गेले आहे. ‘श्रीभक्तिरसामृतसिंधू’-ग्रंथात ६४ प्रकारच्या भक्ति-अंगांच्या विवरणात उल्लिखित **“ऊर्जादरो विशेषण”**— वाक्याद्वारे काही लोक समजतात की, चातुर्मास्यात केवळ मात्र कार्तिक-व्रतच गौडीय भक्तांसाठी पालनीय आहे. येथे वास्तविक विचार हा आहे की,—‘विशेष रूपाने कार्तिक-व्रत किंवा दामोदर-व्रताचे पालन म्हटल्यावर—चातुर्मास्याचे पालन अवश्यच करायला हवे. यांच्यापैकी कार्तिक-व्रत किंवा दामोदर-व्रताचे विशेष रूपाने अर्थात पूर्णपणे पालन करायला हवे—असेच समजाविले गेले आहे. कार्तिक-व्रत—चातुर्मास्याचे अंतिम आनुष्ठानिक व्रत आहे. फक्त अंतिम व्रताच्या रक्षणाच्या संबंधात शास्त्रांमध्ये ‘विशेष’-शब्दाचा उल्लेख पाहिला जातो.”

## *चातुर्मास्य-व्रत कर्माचे अंग नव्हे, शुद्ध भक्तीचे अंग*

परत चातुर्मास्य-व्रताचे ‘कर्मा’च्या अंगाच्या रूपात विचार करणे उचित नाही आहे. श्रीमन्महाप्रभू आपल्या पार्षदांसोबत ज्या चातुर्मास्य-व्रताचे पालन करित असत, ते कधीही ‘कर्मा’चे अंग असू शकत नाही. त्यांनी “कर्मनिन्दा कर्मत्याग—सर्वशास्त्रे कय। कर्म हइते प्रेमभक्ति कृष्णे कभु नहे॥” अर्थात् सर्व शास्त्रांमध्ये कर्माची निंदा केली गेली आहे आणि कर्माचा त्याग करण्यास सांगितले गेले आहे. कर्माच्या द्वारे कधीही श्रीकृष्णात प्रेम-भक्ती होऊ शकत नाही.—या वाक्यात सर्वदा ‘कर्मा’च्या अंगाचा त्याग करण्याचाच उपदेश दिला गेला आहे. म्हणून महाप्रभूंच्या द्वारे या व्रताचे पालन झाल्यामुळे ते शुद्ध-भक्तीच्या विशेष-अंगाच्या रूपात प्रमाणित होते.

वास्तवात चातुर्मास्य-व्रत-विधानाच्या द्वारे भोगोन्मुख कर्मी जिवांना भोग-विलास त्याग करण्याचा अभ्यास करवून सुकृती उत्पादनाच्या माध्यमातून त्यांना हळूहळू प्रेम-भक्ति-मार्गात परिचालित करणेच भगवंतांचा मूळ उद्देश्य आहे. म्हणून या व्रताला ‘कर्मा’चे अंग समजू नये. ‘कर्मा’च्या अंगांचा परित्याग करण्याच्या बहाणे व्रत-

वर्जित होऊन गृह-व्रत-धर्म-पालन, तंबाखू-पान-सेवन किंवा प्रसाद-सेवेच्या नावावर इंद्रिय-तृप्तिदायक भोजन-ग्रहण इत्यादी निश्चितच शुद्ध-भक्तीच्या अनुकूल होऊ शकत नाहीत. सामर्थ्य असल्यावर देखील आळशीपणामुळे या व्रताचा अनादर केल्यावर श्रीहरींना प्रसन्न करणे असंभव आहे—हाच समस्त शास्त्रांचा उपदेश आहे.

## व्रताच्या नियमांचे पालन करण्याचे फळ

"भगवान विष्णू योगनिद्रा धारण करून शेषरूपी सर्प-शय्येवर शयन करतात, क्षीरसमुद्राच्या सलिल तरंगांद्वारा त्यांचे दोन्ही चरण धुतले जात आहेत आणि लक्ष्मीच्या कर-कमलांद्वारे त्यांचे श्रीचरण परिमार्जित होत आहेत (साफ केले जात आहेत). त्या वेळी जे भगवद्-भक्त बऱ्याचशा व्रत-नियमांद्वारे चार महिने व्यतीत करतात, ते नित्यकाळ (नेहेमीसाठी) विष्णुलोकात अधिष्ठित होतात."

विष्णु-रहस्य-ग्रंथात ब्रह्मदेव नारदांना म्हणतात—हे नारद! विस्तृत रूपाने चातुर्मास्य-व्रताच्या नियम आदीचे श्रवण करावे; मनुष्य जर व्रताच्या वेळी भक्तिसहित त्या समस्त नियमांचे पालन करतो तर त्यास परम गती प्राप्त होते. हे **चातुर्मास्य वैष्णव-व्रत** जर कोणी व्यक्ती मनातल्या मनात सुद्धा पालन करतो तरी देखील त्याची शेकडो जन्मांचे पापे नष्ट होऊन जातात. जी व्यक्ती एकाहारी (दिवसातून एकदाच जेवून), शांत, नित्यस्नायी (दररोज स्नान करणारी) आणि दृढव्रती होऊन चार महिने श्रीहरींची पूजा करते, ती श्रीविष्णुलोकात गमन करते. जी व्यक्ती भूमीवर शयन करीत वर्षातील चार महिन्यांपर्यंत श्रीहरीचे अर्चन करते, तिला वैष्णवी गती प्राप्त होते. जी व्यक्ती केशवांना उद्देश्य करून व्रत-परायण होऊन चातुर्मास्य व्यतीत करते, मुक्ती तिच्या मुठीत असते.

भविष्योत्तर-पुराणात भगवान, युधिष्ठिरांना उपरोक्त व्रताचा महिमा वर्णन करतात,—"व्रताच्या वेळी पावसाळयाच्या चार महिने स्त्री असो किंवा पुरुष असो, जे माझे भक्त आहेत, त्यांनी धर्मार्थात दृढव्रती होऊन दंतधावन करून (दात साफ करून) व्रताच्या समस्त नियमांचे पालन करावे. नियम धारण करणाऱ्या व्यक्तींसाठी समस्त नियमांची वेगवेगळी फळे वर्णित होतात,—चातुर्मास्य-नियम पालन करीत जे मिठाचा त्याग करतात, त्यांना मधुर स्वर आणि तळलेल्या आहाराचा त्याग केल्याने औक्षवंत (दीर्घ आयुष्य असणारा) धार्मिक पुत्र प्राप्त होतो. हे पार्थ! अभ्यंग (तेल मालीश) परित्याग केल्यावर सुंदर स्वास्थ्य आणि तळलेले तेल त्याग

केल्यावर शत्रूचा नाश होतो. मधुक (महुआ) परित्याग केल्यास अतुल सौभाग्य आणि पुष्प-उपभोग त्याग केल्याने 'विद्याधरा'च्या समान कांती लाभ होते. अशा प्रकारे योगाभ्यास-परायण व्यक्ती उन्नत लोकांचे अधिकारी होतात. जी व्यक्ती तिखट, कडू, आंबट, मधुर, खारे आणि तुरट—या समस्त रसांचे वर्जन करते, ती कधीही वैरूप्य (कुरूपता) आणि वैगन्ध (दुर्गंध) प्राप्त करत नाही. पान त्याग केल्याने सुखी आणि शिजवलेले भोजनाचा त्याग केल्याने निर्मळता प्राप्त होते. **हे राजन्! पृथ्वी किंवा दगडी शिळेवर शयन केल्याने विष्णूंचे अनुचर (दास, परिकर) बनता येते.** मध आणि मासाचा त्याग केल्याने मुनी व योगी आणि सुरा व मद्याचे वर्जन केल्याने निरोगी आणि तेजस्वी बनता येते. **'नख' तथा लोम (लव, शरीरातील बारीक 'केस') धारण केल्याने दररोज गंगा-स्नानाचे फळ प्राप्त होते.**

चातुर्मास्य-व्रताच्या वेळी मौनी राहिल्याने (मौनव्रताचे पालन केल्याने) त्यांचा आदेश कधीही अपूर्ण राहात नाही आणि मातीच्या पात्रात भोजन केल्याने पृथ्वीचा अधिपती (स्वामी) होता येते. "नमो नारायणाय" मंत्राचा जप केल्याने शेकडो दानांचे फळ लाभ होते. विष्णूंच्या श्रीचरणांची वंदना केल्याने गोदानाचे (गाय दान करण्याचे) फळ, त्यांच्या चरण-कमळाच्या स्पर्शाने मनुष्य सफलता प्राप्त करतो. विष्णूंच्या मंदिराचे मार्जन केल्याने कल्प काळपर्यंत (चार अब्ज, बत्तीस कोटी इतकी मानुष किंवा सौर वर्षे) स्थायी राज्य लाभ आणि त्यांचे स्तव-स्तोत्र पाठ करीत तीन वेळा मंदिराची परिक्रमा केल्याने विमानात आरूढ होऊन विष्णुलोकात जाता येते. विष्णु-मंदिरात गीत-वाद्य केल्याने (वाद्यांच्या संगतीने गायन केल्याने) भगवत्-पार्षदत्व लाभ होते. जे नित्य शास्त्र व्याख्येच्या द्वारा लोकांना प्रोत्साहित करतात ते व्यास रूपी होऊन शेवटी विष्णुलोकात गमन करतात. पुष्प मालेद्वारे पूजा आणि भगवंतांच्या मंदिरात पाणी शिंपडल्याने, वैकुंठ लोक प्राप्त होतो. तीर्थ आदीत स्नान केल्याने निर्मल देह आणि पंचगव्य (गाय संबधित पाच वस्तू —गाईचे दूध, दही, तूप, मूत्र, शेण या सर्वांच्या भोजनाने समस्त व्रताचे फळ प्राप्त केले जाऊ शकते. एकाहारी झाल्याने (एकदाच भोजन करणारे झाल्याने) अग्निहोत्र-यज्ञ आणि सर्व तीर्थांच्या यात्रेचे फळ प्राप्त होते. जो मनुष्य नित्य स्नान आणि जप-परायण असतो, त्यांना आणखी नरकाचे दर्शन करावे लागत नाही. धातूचे पात्र आदी सोडून पानावर किंवा दगडाच्या शिळेवर भोजन केल्याने

पुष्कर-कुरुक्षेत्र-प्रयाग-स्नान आदीचे फल लाभ होते. अशा प्रकारे शरीर-मन-वाणीच्या द्वारा आचरण केल्याने व्रत करणाऱ्या व्यक्तीच्या प्रती भगवान् श्रीकेशव संतुष्ट होतात.

## *चातुर्मास्य-व्रत-विधि*

"आषाढ महिन्यात शुक्ल द्वादशीला भगवान् श्रीहरी शयनाची (निद्रा किंवा झोप घेण्याची) इच्छा करतात. त्यावेळी त्यांची आरती करून पालखीत विराजमान करवून गीत व वाद्यांच्या ध्वनीसोबत पवित्र सरोवराच्या तटावर घेऊन जायला हवे. यानंतर पुष्पांजली प्रदान करून यानातून (वाहनातून) भगवंतांचे अवतरण करवून (भगवंतांना खाली उतरवून) तटावर विराजमान करून आपले हातपाय धुवून आणि आचमन-न्यास इत्यादीच्या नंतर **"जय जय महाविष्णो विश्वमनुगृहाण"**—हे महाविष्णो! आपला जय होवो, विश्वाच्या प्रती आपण अनुग्रह करावा—अशा प्रकारे प्रार्थना करून पाण्यात त्या देवतेची (विग्रहाची) यथाविधी सुगंध-पुष्प आदीद्वारे प्रसन्नतापूर्वक स्नान आणि महापूजा करणे कर्तव्य आहे. "हे देव! श्वेतदीपात फणा-मणी (फण्यांवरील मण्यांनी) सुशोभित शेष रूपी या शय्येवर आपण सुखाने निद्रा घ्या, आपल्याला नमस्कार आहे. हे जगन्नाथ! आपण शयन केल्याने हे जगत सुप्त होऊन जाते आणि आपल्या जागरणाने समग्र विश्व जागृत होऊन जाते. हे अच्युत! माझ्याप्रती आपण प्रसन्न व्हावे."—चातुर्मास्य-व्रती व्यक्ती अशा प्रकारे प्रार्थना करून प्रभूंच्या समोर 'कृष्ण भक्तीच्या वृद्धीसाठी' चार महिन्यांपर्यंत आवश्यक कृत्यांचा संकल्प ग्रहण करतील.

व्रती-व्यक्ती, श्रीकृष्णांचे स्तव, पूजा आणि विविध अनुष्ठान इत्यादीच्या द्वारा त्यांना प्रसन्न करून वैष्णवांसोबत श्रीचरणामृत आणि महाप्रसाद ग्रहण करतील. नृत्य-गीत आदीच्या द्वारे भगवंतांना परितुष्ट (पूर्णतः संतुष्ट) करून वैष्णवांच्या आनुगत्यात त्यांना त्यांच्या मंदिरात आणायला हवे. शेवटी व्रत-वैष्णवांना सन्मानपूर्वक निरोप देऊन भगवंतांच्या आरतीनंतर त्यांना शयन करवून भगवान् विष्णूंचे स्मरण करीत स्वतःदेखील भूमीवर शयन करतील. अशा प्रकारे व्रताचरण केल्याने चार मास सुखाने व्यतीत होतील, अन्यथा दुःख, अधिक-पाऊस किंवा अल्प-पावसाद्वारे अकल्याण (अमंगल) होईल.

स्कंदपुराणात वर्णित चातुर्मास्य-व्रताचे विधिनिषेध खाली वर्णिले आहेत,—

**श्रावणे वर्जयेच्छाकं, दधि भाद्रपदे तथा।**
**दुग्धमाश्वयुजे मासि, कार्तिके चामिषं त्यजेत्॥**

श्रावण मासात साग (पालेभाज्या), भाद्रपद मासात दही, आश्विन मासात दूध आणि कार्तिक मासात ‘आमिष’ परित्यज्य (पूर्णपणे निषिद्ध) आहेत. धर्मात रत व्यक्ती ज्यांनी स्वाभाविक रूपानेच ‘आमिषाचा’ (मासाचा) त्याग केला आहे, त्यांच्यासाठी येथे ‘माषकलाइ’लाच (उडदाच्या डाळीलाच) निषिद्ध समजल्या गेले आहे.

हे विप्रेन्द्र! जनार्दनांनी शयन केल्यावर जी व्यक्ती सीम (मधुरा ) आणि राजमाष (काळे उडीद), बरबटी (चवळी) खाते, तिला चांडाळापेक्षाही अधिक निकृष्ट समजावे आणि ती महाप्रलयापर्यंत नारकी होते. हे मुनिश्रेष्ठ! ज्या व्यक्ती हरिशयनाच्या (चातुर्मास्याच्या) दरम्यान कलिंग (कलमी साग), पटल, वांगी आणि दारू (नशा)—हे समस्त सेवन करतात, त्यांचे सात जन्मांचे पुण्य नष्ट होऊन जाते, याच्यात संशय नाही आहे. चातुर्मास्याच्या वेळी उत्पन्न होणारे काही मनोहारी फळे-कंदमूळे आदींमधील स्वतःला प्रिय वाटणारी काही फळे-कंदमूळे वर्जन करावे. नियम पालनकारी पंडित व्यक्ती-जप-होम इत्यादीच्या अनुष्ठान आणि नाम-संकीर्तनाच्या द्वारा भगवंतांना अशा प्रकारे प्रार्थना करतील,—"हे देव! आपल्या समक्ष मी या व्रताचा संकल्प ग्रहण करतो आहे; हे केशव! आपल्या कृपेने हे निर्विघ्नपणे पूर्ण होवो. हे जनार्दन! व्रताच्या वेळी, जर माझा मृत्यू जरी झाला, तरीदेखील आपल्या प्रसादानेच ते संपूर्ण होवो.” चातुर्मास्य-व्रताची अन्य जी समस्त कृत्ये आहेत, त्यांची कार्तिक-व्रताच्या प्रसंगात चर्चा केली जाईल. कृष्ण-भक्तीत वृद्धीसाठी चार महिने आवश्यक-कृत्यांचे नियम ग्रहण करावा.

## *चातुर्मास्याच्या दरम्यान विभिन्न व्रत आणि व्रतोपवास*

चातुर्मास्य-व्रताच्या दरम्यान शयन एकादशी (आषाढी शुक्ला एकादशी) अथवा आषाढी पौर्णिमेनंतर **श्रावण-कृत्यां**मध्ये शुक्ल एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत श्रीश्रीराधा-गोविंदाची झूलन-यात्रा, द्वादशीला श्रीकृष्णांचे पवित्रारोपण, पूर्णिमेला श्रीबलदेव-आविर्भाव-व्रतोपवास इत्यादी; **भाद्रपद-कृत्यांमध्ये श्रीश्रीजन्माष्टमी-व्रतोपवास आणि नन्दोत्सव, पार्श्वैकादशी** (श्रीहरींद्वारे कुस बदलणे), श्रवण-द्वादशी, वामन-द्वादशी इत्यादी; **आश्विन-कृत्यांमध्ये** शुक्ला दशमीला शुभ विजयोत्सव (दसरा) आणि द्वादशी व **पौर्णिमा-आरंभ पक्षापासून कार्तिक-व्रत आरंभ** इत्यादी आणि **कार्तिक-कृत्यां**मध्ये श्रीश्रीराधादामोदरांची नित्य-पूजा, अर्चन, दान इत्यादी, दीपदान, दीपमाला किंवा **आकाशदीप दान**, बहुलाष्टमी, कृष्ण त्रयोदशीला

यम-दीपदान, शुक्ल-प्रतिपदेला **श्रीगोवर्धन-पूजा, अन्नकूट महोत्सव, गो-क्रीडा आणि गो-पूजा,** श्रीबलिराजपूजा, यमद्वितीया, गोपाष्टमी-गोष्ठाष्ठमी, **उत्थान-एकादशी,** एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत भीष्मपंचक, **शुक्ल-द्वादशी आणि पूर्णिमेला चातुर्मास्य आणि कार्तिक व्रत किंवा दामोदर व्रताची समाप्ती** इत्यादी अनुष्ठान सात्वत-स्मृती श्रीहरिभक्ति-विलास इत्यादी मध्ये विशेष रूपाने निर्दिष्ट आणि व्यवस्थित झाले आहेत.

शयन-एकादशी, पार्श्व-एकादशी आणि उत्थान-एकादशीचे पालन चातुर्मास्य व्रताच्या दरम्यान विशेष प्रयत्नपूर्वक करायला हवे. आषाढ, भाद्रपद आणि कार्तिक—या तीन महिन्यांच्या शुक्ला द्वादशीमध्ये अनुराधा, श्रवण आणि रेवती नक्षत्रांच्या आदी (सुरुवातीला), मध्य आणि शेवटी श्रीहरींचे शयन, पार्श्व-परिवर्तन (कुस बदलणे) आणि उत्थान (जागरण, निद्रेतून जागे होणे) होते. रात्री शयन, संध्याकाळी पार्श्व-परिवर्तन, आणि दिवसा श्रीहरींना झोपेतून जागविण्याची विधी आहे. भविष्योत्तर-पुराणात म्हटले गेले आहे,—"हे पार्थ! जे श्रीहरींच्या शयन आणि उत्थान-तिथीचे पालन करतात, त्यांना श्रीहरीचा लोक प्राप्त होतो. भाद्रपद महिन्याच्या शुक्ला एकादशीला, भगवत्-परायण व्यक्तींसाठी वैष्णवांच्या सोबत भगवंतांचा कटिदान-उत्सव (पार्श्व-परिवर्तन) करणे कर्तव्य आहे. भगवान पहिले डाव्या अंगात (कुशीवर) शयन करतात आणि पार्श्व-परिवर्तनाच्या वेळी दक्षिण अंगात (उजव्या कुशीवर) शयन करतात. पद्मपुराणात म्हटले गेले आहे की, क्षीरसमुद्रात शेष रूपी शय्येवर भगवान श्रीहरी ज्या दिवशी शयन करतात आणि ज्या दिवशी उठतात, त्या दिवसांना जे लोक (जन) एकाग्र चित्ताने उपवास करतात, श्रीहरी त्यांना त्यांचे वांछित फल प्रदान करतात."

---

भगवान श्रीकृष्ण म्हणाले, "सर्व जिवांच्या प्रति द्वेषरहित, मित्रभावापन्न, कृपाळू, पुत्र-पत्नी इत्यादींमध्ये ममताशून्य, देह इत्यादींमध्ये अहंकारशून्य, सुख आणि दुःखात समभावापन्न, क्षमाशील, सर्वदा प्रसन्नचित्त, भक्तियोगयुक्त, संयत इन्द्रिये असणारा, दृढसंकल्पवान, आणि माझ्यात मन, बुद्धी अर्पण करणारे माझा जो भक्त आहे, तो मला प्रिय आहे. ज्याच्याद्वारे कोणाला उद्वेग प्राप्त होत नाही आणि जो कोणाद्वारे उद्वेगाला प्राप्त होत नाही आणि जो प्राकृत हर्ष, असहिष्णुता, भय आणि उद्वेगापासून मुक्त आहे, तोच माझा प्रिय आहे."

*(गीता १२/१३-१५)*

# श्रीदामोदर–व्रत

चातुर्मास्य–व्रताच्या शेवटी अर्थात् कार्तिक मासात हे दामोदर–व्रत केले जाते. हे परत **'उर्जाव्रत', 'कार्तिक–व्रत', 'नियम–सेवा'** आदी नामांनी देखील सुपरिचित आहे. परम–मनोहर श्रीदामबंधन–लीला कार्तिक–शुक्ला प्रतिपदेला प्रकट झाली होती, म्हणून परम–धन्य कार्तिक–मास 'दामोदर' नामाने प्रसिद्ध झाला. या महिन्यात व्रजेन्द्रनंदन श्रीकृष्णांनी गिरिराज गोवर्धन पर्वताला धारण केले होते, 'वत्सपालका'तून ते गो–पालकत्वात ('वासरांना चारायला नेणाऱ्या' गोपाळापासून 'गायी चारायला नेणाऱ्या' गोपाळाच्या स्तरावर ) उन्नत झाले, मग वामन रूपात त्यांनी दैत्यांचे राजा—श्री बळी महाराजांना आत्मसात केले होते—अशा प्रकारे श्रीहरींच्या नाना मनोहर लीला घडल्या होत्या.

## *कार्तिक–मासाचे माहात्म्य*

"स्कंद पुराणात ब्रह्मदेव नारदांना म्हणत आहेत—'सर्व तीर्थ स्थानांमध्ये जे फळ असते, सर्व प्रकारच्या दानापासून जे फळ अर्जित होते, ते, कार्तिक मासात अर्जित फळाच्या कोटी अंशाच्या एक अंशाच्या बरोबर देखील नसते. हे वत्स! एकीकडे सर्व तीर्थ, दक्षिणायुक्त यज्ञ, पुष्कर–कुरुक्षेत्र आदींमध्ये निवास, सुमेरू पर्वताच्या समान सोने आणि समस्त दाने तथा दुसरीकडे **केशवप्रिय कार्तिक**–व्रत आहे. हे नारद! विष्णूंच्या संतुष्टीसाठी कार्तिक मासात जे सत्कर्म आहेत, ते समस्तच अक्षय आहेत. कार्तिक मास सर्व महिन्यांमध्ये उत्तम, पुण्यतम आणि पवित्रतम आहे. हे विप्रेन्द्र नारद! कार्तिक मासात अर्जित पुण्य, समुद्राच्या समान अक्षय, अव्यय आहे. हे ब्राह्मण! **कार्तिक मासाच्या समान कोणताही मास नाही आहे, सत्ययुगासमान कोणतेही युग नाही आहे; वेदांसारखे कोणतेही शास्त्र नाही आहे, गंगेच्या समान कोणतेही तीर्थ नाही आहे; म्हणून कार्तिक मास वैष्णवांचा सर्वदा प्रिय आहे.** हे महामुने! जे वैष्णव भक्तीने पूर्ण कार्तिक मास व्यतीत करतात, ते पितृ–पुरुषांचे उद्धारकर्ता होतात. श्रीदामोदर ज्या प्रकारे भक्त–वत्सलांच्या रूपात निखिल (अखिल) विश्वात सुप्रसिद्ध आहेत; त्याच प्रकारे त्यांच्या संबंधित हा कार्तिक मास देखील सर्वांसाठी अत्यधिक प्रिय आहे. देहधारींसाठी (देह धारण करणाऱ्या जिवांसाठी) मनुष्य–देह दुर्लभ आणि क्षणभंगुर आहे, परंतु हरिवल्लभ कार्तिक मास अतिशय दुर्लभ आहे—ज्या मासात फक्त प्रदीप (तेल किंवा तुपाचा दीप)

दान केल्यानेच भगवान् श्रीहरी प्रसन्न होतात आणि दुसऱ्याचा प्रदीप प्रज्वलित केल्याने सुगती (उत्तम गती किंवा स्थान) प्रदान करतात.

## दामोदर व्रताचे माहात्म्य

स्कंद-पुराणात ब्रह्म-नारद संवादात आणखी देखील म्हटले गेले आहे,—

"हे नारद! जितके समस्त व्रत आहेत, त्या सर्वांचे फळ केवळ एका जन्मासाठीच असते, परंतु कार्तिक महिन्यात केले गेलेल्या व्रतांचे फळ शेकडो जन्मांपर्यंत प्राप्त होत राहाते. हे विप्रेन्द्र! कार्तिक मासात वैष्णव व्रत श्रवण-कीर्तन इत्यादी करीत कार्तिक-पूर्णिमेला उपवासाच्या द्वारे अक्रूरतीर्थात स्नानाचे फळ लाभ होते. वाराणसी, कुरुक्षेत्र, नैमिषारण्य, पुष्कर तीर्थात गेल्याने पुण्य होते, कार्तिक व्रत केल्याने ते प्राप्त केले जाऊ शकते. ज्या व्यक्तीने कधीही यज्ञ केला नाही, कार्तिक व्रताच्या द्वारे तिला विष्णूंच्या परमपदात गती होते. ज्या समस्त पदार्थांचे दररोज भोजन केले जाते, कार्तिक मासात त्यांच्यातील काहींना संकुचित केल्यावर अवश्यच मुक्तिपद परम मंगलमय श्रीकृष्णांचे सान्निध्य लाभ होते. हे मुनिसत्तम! चारी वर्णांच्या लोकांद्वारे कार्तिक व्रत केले गेल्याने कधीही नीच योनी प्राप्त होत नाही. हे मुनिशार्दूल (श्रेष्ठ मुनी)! जी व्यक्ती कार्तिक मासात यथाविधी व्रत धारण करते, मुक्ती त्यांच्या हातात असते. ऋषि-मुनींद्वारे सेवित कार्तिक मासात किंचित मात्र व्रत पालन केल्याने देखील महाफळ प्राप्त होते."

## दामोदर-व्रत न करण्याचे फळ

स्कंद-पुराणात ब्रह्मदेव नारदांना म्हणतात—

"हे धार्मिक-श्रेष्ठ! जी व्यक्ती दुर्लभ मनुष्य जन्म प्राप्त करून कार्तिक व्रताचे पालन करीत नाही, ती आई आणि वडिलांची हत्या करणाऱ्या पाप्यासमान पातकी असते. जी व्यक्ती व्रताचा कोणताही संकल्प न घेता दामोदर प्रिय—कार्तिक मास व्यतीत करते, ती सर्व धर्मांतून बहिष्कृत होऊन तिर्यकयोनी (पशुपक्षांची योनी) प्राप्त करते. हे मुनिश्रेष्ठ! जो मनुष्य कार्तिक मासात व्रत करत नाही, त्याला ब्रह्मघाती (ब्राह्मणांचा हत्यारा किंवा ब्राह्मणांचा खुनी), गो-घाती (गाईंची हत्या करणारा), सुवर्ण-चोर (सोने चोरणारा) आणि सर्वथा मिथ्यावादी (नेहेमी खोटे बोलणारा) समजावे. हे मुनिशार्दूल! विशेष करून जर कोणी विधवा-स्त्री कार्तिक मासात व्रत करत नाही तर, ती निश्चितच नरकगामी होईल. गृहस्थ व्यक्तींनी कार्तिक व्रत न

केल्यास त्यांची इष्टापूर्त्त कर्मे (यज्ञ, विहीर खोदणे, मंदिर निर्माण आदी कृती) विफल होऊन जातील. ब्राह्मण जर कार्तिक मासात व्रत करीत नाही तर इंद्र आदी समस्त देवता त्याच्याप्रती विमुख होऊन जातात. हे विप्रेन्द्र! कार्तिक व्रत त्याग करून अन्य शेकडो याग यज्ञ आणि अनेक श्राद्ध करून देखील उत्तम गती लाभ होत नाही. **संन्यासी, विधवा आणि विशेषतः वर्णाश्रमी (वर्णाश्रम धर्माचे पालन करणारे) जर कार्तिक मासात व्रत करीत नाहीत, तर ते नरकगामी होतील.** हे विप्रेन्द! जर कार्तिक मासात व्रत पालन झाले नाही, तर त्याच्या वेद-पुराण पठणाचे काय फळ आहे? आजन्म पुण्यवान व्यक्ती जर या व्रताचे पालन करीत नाही तर तिचे सारे संचित पुण्य नष्ट होऊन जाते. हे नारद! जे लोक कार्तिक मासात उत्तम वैष्णव-व्रत पालन करीत नाहीत, त्यांना या संसारात (जगात) पाप-स्वरूप जाणावे. हे महामुने! **जी व्यक्ती नियमांचे पालन न करता कार्तिक मास अथवा चातुर्मास्य व्यतीत करते, ती कुलांगार ब्रह्महत्याकारी (कुलाचा विनाश करणारी व ब्राह्मणांची हत्या करणारी) आहे.** ज्या सर्व व्यक्ती कार्तिक मासात व्रत, श्रावणी पूर्णिमेत ऋषि-तर्पण, चैत्र मासात विष्णूंचा दोलोत्सव (दोला-उत्सव, दोला म्हणजे झुला), माघ-स्नान, श्रावण मासात रोहिण्यष्टमी आणि श्रवण-नक्षत्र-युक्ता द्वादशी व्रत करीत नाहीत, त्या सर्व मूर्खांच्या अशेष दुर्गतीचे वर्णन करण्यास मी अक्षम आहे.

पद्मपुराणात नारदांनी शौनक इत्यादी ऋषींना म्हटले आहे—हे विप्रगण! नियम सोडून जे लोक धर्म-भूमीत कार्तिक मास त्यागतात, श्रीकृष्ण त्यांच्याप्रती विमुख होऊन जातात, कारण कार्तिक मास त्यांचा अतिशय प्रिय आहे.

स्कंद पुराणात ब्रह्म-नारद संवादात वर्णिले आहे,—"हे पुत्र! जे समस्त ब्राह्मण कार्तिक मासात दान, होम, जप, स्नान आणि श्रीहरींचे व्रत करीत नाहीत, ते नराधम आहेत. हे नारद! कार्तिक मासात जनार्दनांची पूजा न केल्यास पर पितरांसोबत यमलोकात राहावे लागते. हजार कोटी जन्मांनंतर दुर्लभ मनुष्य प्राप्त करून भक्तिभावाने कार्तिक मासात श्रीकेशवांचे अर्चन न केल्यास त्याचा जन्मच निरर्थक आहे. ज्याला कार्तिक मासात भगवान विष्णूंची पूजा, विष्णूंची कथा आणि वैष्णवांचे दर्शन होत नाही, त्याचे सर्व पुण्य नष्ट होऊन जाते."

## *कार्तिक मासात विशेष कर्माचे माहात्म्य*

हे द्विजोत्तम! मनुष्य कार्तिक मासात विष्णूंना उद्देश्य करून

जे काही करतो, विशेष रूपाने अन्न इत्यादीचे दान, होम, जप आणि तपस्या, त्याद्वारे त्याला अक्षय फळ प्राप्त होते. जी स्त्री कार्तिक मासात विष्णूंच्या मंदिरात चक्राचे निर्माण करते, ती वैकुंठात नित्यकाळ शोभायित होते. कार्तिक मासात ब्रह्म-स्वरूप सर्वकाम-प्रदाता पलाश-पत्रावर (एका विशेष वृक्षाच्या पानांवर) भोजन केल्याने संपूर्ण जन्मभर केलेले पाप नष्ट होतात, सर्व तीर्थांचे फळ प्राप्त होते आणि कधीही नरकाचे दर्शन करावे लागत नाही. **कार्तिक मासात गंगा-यमुना इत्यादी मध्ये स्नान, सत्कथेचे श्रवण, साधूंची सेवा आणि ब्रह्म-पत्रावर** (पलाशाच्या पानावर) **भोजन—हे सर्व अभीष्ट प्रदान करतात.**

हे विप्रन्द्र! जे लोक कार्तिक मासात अरुणोदय किंवा अंतिम प्रहरात भगवान् दामोदरांच्या आधी जागे होतात, विष्णू त्यांचेच असतात. हे ब्रह्मन् (ब्राह्मण)! साधुसेवा, गोग्रास, विष्णूंची कथा श्रवण, विष्णूंचे अर्चन आणि शेष प्रहरात जागरण, कलिकाळात कार्तिक मासात अतिदुर्लभ आहे. जलदान, गोदान, सूर्य ग्रहणात कुरुक्षेत्रात स्नानाचे फळ कार्तिक व्रतात एकाच दिवसात प्राप्त होते.

हे नारद! जो मनुष्य कार्तिक मासात भगवंताच्या गीति-शास्त्राची चर्चा करतो, त्याला संसारात (जगात) परत यावे लागत नाही. जो नर **कार्तिक मासात भक्तिपूर्वक नियमाने विष्णू मंदिराची परिक्रमा (प्रदक्षिणा), हरीच्या समक्ष भक्तिपूर्वक गीत, वाद्य आणि नृत्य करतो, विष्णुसहस्रनाम, गजेंद्र-मोक्षाच्या प्रसंगाचे वाचन करतो, त्याला परमपद प्राप्त होते.** कार्तिकात केशवांच्या समोर कापरासोबत (कर्पुरासोबत) अगुरू (सुगंधी लाकूड) जाळल्याने आणि अंतिम प्रहरात स्तव आणि गान केल्याने श्वेतदीपात निवास होतो. हे महामुने! सर्व धर्मांचा त्याग करून कार्तिक मासात केशवांच्या समोर पुण्य-स्वरूप शास्त्रांची कथा श्रवण करावी. कल्याणाच्या इच्छेनेच असो किंवा मग भोगाच्या इच्छेने, जी व्यक्ती हरिकथा श्रवण-कीर्तन रूपी शास्त्र-विनोदनाद्वारे कार्तिक मासाचे पालन करते, ती अशेष दुर्गतीपासून वाचते.

हे मुने! कार्तिक मासात प्रयत्नपूर्वक दररोज भागवताचे पठण केल्याने अठरा पुराणांचे पठण करण्याचे फळ प्राप्त होते. मनुष्य 'इष्टापूर्त्त' इत्यादी समस्त धर्मांचा परित्याग करून कार्तिक मासात तीव्र भक्तीने वैष्णवांच्या सहवासात निवास करेल. कार्तिक मासात जे पहाटे स्नान करतात, भूमीवर शयन करतात, ब्रह्मचर्याचे पालन करतात, जप-परायण असतात आणि विष्णूंच्या प्रसादाचे भोजी

(भोजन करणारे) होऊन दामोदरांचे अर्चन करतात, ते भजनानंदी होऊन हरींचे सान्निध्य लाभ करतात. जे कार्तिक मासात, पलाशाच्या पानावर, विष्णूंचा नैवेद्य (प्रसाद) दिवसातून केवळ एकदाच भोजन करतात, ते विशेष शक्तिमान, महापराक्रमी आणि कीर्तिमान होऊन जन्म ग्रहण करतात. जे मनुष्य कार्तिक मासात श्रीहरींच्या पूजेनंतर विष्णूंचे प्रिय खाण्ड आणि खीरीचा भोग त्यांना निवेदन (अर्पण) करतात, यज्ञेश्वर त्यांच्याप्रती प्रसन्न होऊन त्यांना आपल्या लोकात स्थान प्रदान करतात.

स्कंद पुराणात श्रीकृष्ण-सत्यभामा संवादात देखील वर्णित झाले आहे,—जे लोक कार्तिक मासात स्नान, प्रातःकाळी जागरण, दीपदान आणि तुळशी-बागेत सेवा करतात, ते देवतांच्या द्वारा वंदनीय आणि विष्णूंचे प्रियतम होतात. **हरि-जागरण, पहाटे स्नान, तुळशीची सेवा (तुलसी-सेवन), व्रताचे पालन आणि दीपदान**—व्रती व्यक्ती, कार्तिक मासात या पाच व्रतांचे आचरण करून भगवंतांच्या सान्निध्यात स्थान लाभ करतात. विष्णू किंवा शंकरांच्या जवळ अथवा अश्वत्थ वृक्षाच्या खाली किंवा तुळशीच्या-बगीच्यात हरि-जागरण करणे कर्तव्य आहे. कार्तिक मासात दीपदान करण्यास असमर्थ असल्यास दुसऱ्यांच्या दीपांना (तेलाच्या पणत्या) प्रज्वलित करणे अथवा वायू (वारा) इत्यादी पासून त्या दीपांचे (पणत्यांचे) रक्षण करावे, त्याच्या अभावात गाय, तुळस आणि वैष्णव-ब्राह्मणांची पूजा करावी.

## *श्रीराधा-दामोदर या महिन्याची अधिदेवता*

"श्रीदामोदर,—या मासाचे अधिदेवता असूनही त्यांच्या सर्वप्रियतमा श्रीमती राधिकेची पूजा त्यांच्याच सान्निध्यात करणे कर्तव्य आहे"—(पद्मपुराण). 'सर्वशक्तिमान दामोदर श्रीकृष्ण आपली स्वरूप-शक्ती किंवा ह्लादिनी-शक्तीशिवाय पूजा ग्रहण करत नाहीत आणि मग अंतरंगा किंवा पराशक्ती श्रीराधादेवी आपल्या प्राणनाथांशिवाय सर्व काही अस्वीकार करते." श्रीमती राधाराणी मग "ऊर्ज्जेश्वरी"—नामाने देखील विशेष परिचित आहे. श्रीश्रील रूप गोस्वामींनी "श्रीश्रीराधिका अष्टकम्" मध्ये त्यांना निखिल काळाची अधिपति कार्तिक-मासाची अधिष्ठात्री देवीच्या रूपात वर्णिले आहे—**"निखिल-समय-भर्तुः कार्तिकस्याधिदेवीम्।"**

## *"दामोदर-व्रत" आरंभ करण्याची वेळ*

आश्विन मासाच्या शुक्ल पक्षाच्या एकादशीला आळस न

करता या व्रताचे पालन करायला हवे आणि मग आश्विनच्या पूर्णिमा किंवा तुला-संक्रमणात देखील कार्तिक-व्रत आरंभ करण्याचा नियम आहे—**“आश्विने शुक्लपक्षस्य प्रारम्भे हरिवासरे। अथवा पौर्णमासीतः संक्रातौ वा तुलागमे॥”**—*(हरिभक्तिविलास १६/१८२ धृत पाद्मवाक्य)*. यांच्यात कोणत्याही वेळी व्रत आरंभ का न होवो, सर्वत्र एकच विधी मानला जाईल.

## *“दामोदर-व्रत” पालन करण्याचे स्थान*

विशेष रूपाने कार्तिक मासात, घरी राहून या व्रताचे पालन करू नये. सर्व प्रकारच्या प्रयत्नांसोबत कोण्या तीर्थस्थानीच उपरोक्त व्रताचे पालन करायला हवे—**“न गृहे कार्त्तिके कूर्याद्विशेषेण तु कार्तिकम्। तीर्थे तु कार्तिकी कूर्यात् सर्वयत्नेन भामिनी॥”**—(स्कंदपुराण). ज्या कोण्याही स्थानावरच का न होवो, कार्तिक मासात स्नान, दान आणि विशेष रूपाने श्रीदामोदरांची पूजा फलदायक होते. परंतु साधारण स्थानांपेक्षा कुरुक्षेत्रात कोटी पट, गंगेत त्याच प्रकारे, पुष्करमध्ये त्यापेक्षाही अधिक आणि द्वारकेत पूजा-स्नान केल्याने कृष्ण-सालोक्य (कृष्णलोकात निवास) लाभ होतो. परंतु मथुरा (अर्थात् व्रजमंडल व व्रजमण्डल-अभिन्न श्रीनवद्वीप-धाम) सर्वात अधिक फल प्रदान करतात, कारण या मथुरा धामातच श्रीकृष्णांचे दामोदरत्व प्रकाशित झाले. जर श्रीहरींच्या मथुरेच्या शिवाय अन्य स्थानावर पूजा झाली तर ती सेवकांना भुक्ति-मुक्ती आई फळे प्रदान करते, परंतु भक्ती प्रदान करीत नाही, कारण ते सर्वदा भक्तीच्या वशीभूत आहेत. म्हणून कार्तिक मासात, मथुरेत फक्त एकदाच श्रीदामोदरांची पूजा केल्याने सुदुर्लभ हरिभक्ती सहजच प्राप्त होते; येथपर्यंत की, उक्त पूजा जर मंत्र-द्रव्याच्या विना किंवा विधीच्या शिवाय का नसो, तरीदेखील भगवान त्याला स्वीकार करतात—*(हरिभक्तिविलास १६/१५०-१५९)*.

## *“दामोदर-व्रत” पालन करण्याचा विधी*

वैष्णव व्यक्ती, विशेष रूपाने या कार्तिक महिन्यात दररोज श्रीराधा-दामोदरांचे अर्चन, पहाटे स्नान आणि व्रत इत्यादीचे पालन करतील. आश्विन मासात शुक्ल पक्षाची एकादशी किंवा पौर्णिमेमध्ये अथवा तुला-संक्रांतीच्या दिवशी, आळस त्याग करून कार्तिक व्रताचे अवश्य पालन करायला हवे. नित्य कार्तिक मासात रात्रीच्या अंतिम प्रहरी उठून, पवित्रतापूर्वक स्तोत्रपठण करीत प्रभूला जागवून आरती करावी. वैष्णवांसोबत समस्त धर्मतत्वाचे श्रवण आणि

आनंदाने गीत इत्यादींचे कीर्तन करावे. यानंतर नदी किंवा पवित्र जलाशयात (तलावात) जाऊन आचमनानंतर प्रभूंच्या उद्देश्याने निम्नलिखित संकल्प, प्रार्थना आणि अर्घ्य प्रदान करावा,—

**कार्तिकेऽहं करिष्यामि प्रातःस्नानं जनार्दन।**
**प्रीत्यर्थं तव देवेश दामोदर मया सह॥**

(हे जनार्दन! हे देवेश! हे दामोदर! श्रीराधेसोबत तुमच्या संतुष्टीसाठी मी कार्तिक मासात प्रातःकाळी स्नान करीन).

**तव ध्यानेन देवेश जलेऽस्मिन स्नातुमुद्यतः।**
**त्वत्प्रसादाच्च मे पापं दामोदर विनश्यत्यु॥**

(हे देवेश! तुमचे ध्यान करीत मी या जलात स्नान करण्यासाठी जातो आहे; हे दामोदर! तुमच्या प्रसन्नतेद्वारे माझ्या पापांचा विनाश व्हावा).

**नित्ये नैमित्तिक कृत्स्ने कार्तिके पापशोषणे।**
**गृहाणार्घ्यं मया दत्तं राधया सहितो हरे॥**

(कार्तिक मासात नित्य-नैमित्तिक जी समस्त कार्ये केली जातात, ती समस्तच पापनाशक आहेत, हे हरे! आपल्याला हा अर्घ्य प्रदान करतो आहे, आपण राधाराणींसोबत याला ग्रहण करा).

व्रती व्यक्ती 'श्रीकृष्ण', 'नारायण' आदी नामांचे उच्चारण करीत यथाविधी स्नान आणि संध्या इत्यादी करून घरी परततील, यानंतर भगवंताच्या समक्ष स्वस्तिक निर्माण करून तुळशी, मालती, कमल इत्यादी द्वारा श्रीदामोदरांची पूजा करतील. कार्तिक मासात दररोज वैष्णवांसोबत भगवंतांच्या कथेचे श्रवण आणि रात्रंदिवस तूप किंवा तिळाच्या तेलाचा प्रदीप (दीपक) पेटवून अर्चन करतील. इतर महिन्यांपेक्षा कार्तिक मासात विशेष रूपाने नैवेद्य (भोग) इत्यादी अर्पण आणि यथाशक्ती एकभुक्त अर्थात् एकदाच भोजन करून व्रत धारण करणे कर्तव्य आहे. पद्मपुराणात नारद-शौनक इत्यादींच्या संवादात म्हटले गेले आहे,—

पहाटे उठून शौचानंतर जलाशयात स्नान आणि त्याच्यानंतर दामोदरांचे अर्चन करावे. व्रतधारी व्यक्ती कार्तिक मासात मौन राहून भोजन आणि विष्णूंच्या निकट किंवा देवालयात (मंदिरात) अथवा तुळशीच्या समोर किंवा मग आकाशात उत्तम तूप किंवा तिळाच्या तेलाचा प्रदीप (पणतीतला दिवा) दान करतील. कार्तिक मासात वैष्णवांच्या सोबत कृष्ण कथेत दिवस घालविल्यावर संकल्पित व्रत-पालनात तत्पर होतील. मनुष्य कार्तिक मासात दामोदरांच्या संतुष्टीसाठी चांदी, सोने, मणी मुक्ता (मोती), दीप आणि मधुर

फळे-कंदमूळे आदी प्रदान करतील. पद्मपुराणात आणखी देखील सांगितले गेले आहे,—

जितक्या सर्व गोपी आहेत, त्यांच्यामध्ये श्रीराधिकाच श्रीकृष्णांची प्रियतमा आहे, म्हणून कार्तिक मासात श्रीदामोदरांसोबत श्रीराधेची पूजा करणेच कर्तव्य आहे. जी व्यक्ती कार्तिक मासात श्रीराधिकेच्या संतुष्टीसाठी दामोदरांसोबत ऊर्जादेवींची पूजा करते, श्रीदामोदर हरी तिच्याप्रती प्रसन्न होतात. कार्तिक मासात राधा-दामोदरांचे अर्चन करीत सत्यव्रत नामक मुनींद्वारे रचित "श्रीश्रीदामोदराष्टकम्" नामक स्तोत्राचे दररोज पठण करणे कर्तव्य आहे, त्यानेच दामोदर वशीभूत होतात.

विशेष रूपाने कार्तिक मासात (महिन्यात),—राजमाष (बरबटी) आणि सेम यांचे भोजन केल्याने, प्रलय काळ उपस्थित होईपर्यंत नरकात निवास करावा लागतो. कार्तिक मासात कलमी साग, परवल, वांगी आणि संधित (दारू आदीचा) जर परित्याग करीत नाहीत तर अवश्यच नरकाची गती प्राप्त होते. कार्तिक मासात (महिन्यात) मासळी आणि मांस खाणाऱ्या व्यक्तीला चांडाळत्व प्राप्त होते. याच्या शिवाय दुसऱ्यांचे अन्न, दुसऱ्यांची शैय्या, दुसऱ्यांचे धन आणि दुसऱ्यांची स्त्री (पत्नी), तेल, मालीश, मध, कांस्य-पात्रात (कास्याच्या भांड्यात, कासे म्हणजे जस्त व तांबे यांचा मिश्र धातू) भोजन इत्यादी वर्जनीय आहे. या महिन्यात पलाश पत्र भोजन विशेष लाभदायक आहे, कारण पलाश-वृक्षाला ब्रह्म-स्वरूप म्हटले गेले आहे. जे लोक कार्तिक मासात भूमि-शयन, ब्रह्मचर्य पालन, निरामिष भोजन (भक्तांसाठी प्रसाद-भोजन) करताना श्रीदामोदरांची पूजा करतात, ते सर्व पापांपासून मुक्त होऊन श्रीहरींच्या निकट गमन करतात. सामर्थ्यानुसार या महिन्यात एकाहारी होऊन जे दिवस व्यतीत करतात, ते महापराक्रमी आणि कीर्तिमान होतात.

## *दीपदान-माहात्म्य*

स्कंद पुराणात ब्रह्मा-नारद संवादात म्हटले गेले आहे—कार्तिक महिन्यात अर्ध्या क्षणासाठी देखील भगवान् विष्णूंच्या मंदिरात दीपदान केल्याने सारे पाप नष्ट होऊन जाते आणि पुन्हा पृथ्वीवर जन्म ग्रहण करावा लागत नाही. विष्णूंच्या मंदिरात ज्या व्यक्तीचा तूप किंवा तिळाच्या तेलाचा दिवा प्रज्वलित होतो, हे मुनिशार्दूल! त्याला सूर्यग्रहणाच्या वेळी कुरुक्षेत्रात आणि चंद्रग्रहणाच्या वेळी नर्मदा आदींमध्ये दान किंवा अन्य यज्ञ करण्याची काय आवश्यकता आहे? कार्तिकात दिवा (तेलाचा किंवा तुपाचा दीपक) दान

करणाऱ्याची मंत्रहीन, क्रियाहीन आणि शौचहीन समस्त कार्ये देखील संपूर्णता लाभ करतात. ज्या व्यक्तीने कार्तिक मासात केशवांच्या समक्ष दिवा दान केला आहे, तिचे सर्व प्रकारचे यज्ञ आणि सर्व तीर्थांमध्ये स्नान होऊन जाते. हे नारद! पितृगण म्हणतात की, जर त्यांच्या वंशात पृथ्वीवर असा कोणी अपत्य उत्पन्न होते जे कार्तिक मासात दीपदानाच्या द्वारा केशवाला संतुष्ट करेल तर त्यांना चक्रपाणींच्या (श्रीविष्णूंच्या) कृपेने निश्चितच मुक्ती प्राप्त होईल. कार्तिक मासात वासुदेवांच्या मंदिरात दीपदान केल्याने सर्व बाधांनी रहित नित्य-स्थान प्राप्त होते. हे मुने! जो मानव कार्तिक मासात कापराच्या द्वारे दीपदान करतो, त्याच्या कुळात उत्पन्न आणि भविष्यातील वंशजदेखील चक्रपाणींच्या प्रसादाने अवश्यच मुक्ती प्राप्त करतात. हे विप्रेन्द्र! कार्तिक महिन्यात, खेळ (गंमत) म्हणूनच का होईना विष्णू किंवा वैष्णवांच्या मंदिराला दिव्यांनी प्रकाशित केल्यावर त्याला धन, यश, कीर्ती प्राप्त होते आणि सात कूळे पवित्र होऊन जातात. हे मुने! निर्धन व्यक्तीसाठी स्वतःला विकून सुद्धा कार्तिकी पौर्णिमेपर्यंत दीपदान करणे कर्तव्य आहे. जी मूर्ख व्यक्ती कार्तिक महिन्यात विष्णु मंदिरात दीपदान करत नाही, ती वैष्णव म्हणविण्याजोगी नाही आहे. पद्मपुराण आणि नारद पुराणात रुक्मांगद-मोहिनी संवादात वर्णिले आहे,—

जी व्यक्ती कार्तिक महिन्यात श्रीहरींच्या निकट अखंड दीपदान करते, ती दिव्य कांतियुक्त होऊन विष्णुलोकात विहार करते. एकीकडे समस्त दान आणि दुसरीकडे कार्तिक मासात दीपदान समान नसल्यामुळे दीपदानाचेच अधिक माहात्म्य आहे. स्कंद पुराणात ब्रह्म-नारद-संवादात सांगितले गेले आहे,—कार्तिक मासात इतरांचा दीप प्रज्वलित केल्याने आणि वैष्णवांची सेवा केल्याने अन्नदान, राजसूय इत्यादी महायज्ञांचे फळ प्राप्त होते. हे विप्रेन्द्र! जे सर्व लोक कार्तिक महिन्यात श्रीहरींच्या मंदिरात दुसऱ्यांच्या द्वारे ठेवलेल्या दीपाला प्रज्वलित करून दुर्लभ मनुष्यासारखा जन्म प्राप्त करतात.

समुद्रासहित पृथ्वी दान आणि वासरांसहित दुग्धवती (भरपूर दूध देणाऱ्या) कोट्यवधी गाईंच्या दानाचे फळ विष्णुमंदिराच्या शिखरावर (कळसावर) दिव्यांचे दान करण्याच्या सोळाव्या अंशाच्या एक अंशाबरोबर देखील नाही आहे. हे महामुने! मूल्य ग्रहण करून देखील शिखर (कळस) किंवा हरिमंदिरात दीपदान केल्याने शंभर पिढ्यांचा उद्धार होऊन जातो. हे विप्रेन्द्र! शिखर दीपदानाची गोष्ट

दूरच राहो, ज्या सर्व व्यक्ती भक्तिसहित कार्तिक महिन्यात फक्त दिव्यांच्या ज्योतींनी प्रकाशलेल्या विष्णुमंदिराचे दर्शन करतात, त्यांच्या कुळात कोणीही नारकी (नरकगामी) होत नाही. देवगण देखील विष्णूंच्या गृहात दीपदान करणाऱ्या मनुष्याच्या संगाची कामना करतात. हे मुनि-श्रेष्ठ! कार्तिक मासात कार्तिकी पौर्णिमेपर्यंत विष्णु-मंदिरावरती दीपदान केल्याने भगवत्-पार्षदत्व सुलभरीत्या (सहजतेने) प्राप्त होते.

## *दीपमाला-माहात्म्य*

स्कंद पुराणात ब्रह्मा-नारद संवादात वर्णित आहे—जे श्रीहरिमंदिराबाहेर आणि आत दिव्यांच्या रांगेची रचना करतात, त्यांच्या वंशात उत्पन्न लाखों पुरुषांना नरकाचे दर्शन होत नाही आणि ते स्वतः विष्णूंचे सारूप्य आणि परमपद प्राप्त करतात. भविष्य पुराणात वर्णित आहे,—जो कार्तिक मासात विशेष रूपाने विष्णूंच्या उत्थानाच्या (झोपेतून जागे होते) वेळी द्वादशी किंवा एकादशीला तूपयुक्त-प्रदीप प्रज्वलित करतो, तो दहा हजार सूर्यांप्रमाणे प्रकाश आणि कान्तिविशिष्ट होऊन दिव्य विमानात आरूढ होऊन विष्णुलोकात अवस्थित होतो.

## *आकाश-दीपदान-माहात्म्य*

पद्म-पुराणात म्हटले गेले आहे,—

जो मनुष्य कार्तिक मासात, दामोदर केशवांच्या उद्देशाने आकाशात उच्च-प्रदीप दान करतो, तो धन, समृद्धी, ऐश्वर्य, धार्मिक-पुत्र प्राप्त करून सुंदर डोळे असणाऱ्या विशेष विद्वानाच्या रूपात जन्म ग्रहण करतो आणि शेवटी आपल्या कुळाला पवित्र करणारा होऊन विष्णुलोकात गमन करतो.

**आकाश-दीपदान-मंत्र—**

**दामोदराय नभसि तुलायां लोलया सह।**
**प्रदीपन्ते प्रयच्छामि नभोऽनन्ताय वेधसे॥**

—*(हरिभक्तिविलास १६/६६ उद्धृत पद्मपुराण-वाक्य)*

हे दामोदर! कार्तिक मासात आकाशात महालक्ष्मी श्रीराधिकेसहित तुम्हाला प्रदीप दान करतो; हे अनंत! हे विधाता! तुम्हाला नमस्कार आहे.

## *बहुलाष्टमी*

कार्तिक मासात कृष्ण-पक्षीय अष्टमी तिथीच्या मध्य रात्रीला श्रीगोवर्धन-पर्वताच्या तटावर श्रीहरिप्रिय राधाकुंडाचा प्रकाश झाला.

म्हणून या बहुलाष्टमीला श्रीराधाकुंडात स्नान करून श्रीकृष्णांची पूजा करणे कर्तव्य आहे. उत्थान एकादशीला व्रतोपवास केल्याने श्रीकृष्ण ज्या प्रकारे प्रसन्न होतात, या अष्टमी-स्नानाने देखील त्याच प्रकारे संतुष्ट होते. राधाकुंडात स्नानच श्रीहरींच्या संतुष्टीचे श्रेष्ठ कारण आहे.

**“गोवर्द्धनगिरौ रम्ये राधाकुण्डं प्रियं हरेः।**
**कार्तिके बहुलाष्टम्यां तत्र स्नात्वा हरेः प्रियः।**
**नरो भक्तो भवेद् विप्रास्तद्धि तस्य प्रतोषणम्॥”**
**“यथा राधा प्रिया विष्णोस्तस्या कुण्डं प्रियस्तथा।**
**सर्वगोपीषु सैवैका विष्णोरत्यन्त-वल्लभा॥”**

—*(पद्मपुराण)*

## *श्रीयमदीप-दान*

कार्तिक महिन्याच्या कृष्ण-पक्षीय त्रयोदशी तिथीला संध्याकाळी घराच्या बाहेर श्रीयमराजांच्या उद्देश्याने दीप प्रदान केल्याने अपमृत्यूचे भय दूर होता होते. श्रीयमदीप-दान मंत्र—

**“मृत्युना पाशदण्डाभ्यां कालः श्यामलया सह।**
**त्रयोदश्यां दीपदानात् सूर्यजः प्रीयतामिति॥”**

अर्थात त्रयोदशीला या दीपदानाद्वारे ‘पाश’, ‘दंड’, आणि ‘श्यामला’ सहित अवस्थित सूर्यपुत्र ‘काल’ अर्थात् यम, आपण संतुष्ट व्हावे.

## *गोवर्धन-पूजा*

कार्तिक महिन्यातील शुक्ल प्रतिपदेला श्रीकृष्ण-दासवर्य (श्रीकृष्णांच्या दासांमध्ये श्रेष्ठ) गोवर्धन पर्वताची पूजा करायला हवी. ही पूजा प्रातःकाळी करणीय आहे. “प्रातः” शब्दाचा अर्थ पुर्वान्हच समजला जाईल. द्वितीया-विद्धा प्रतिपदेला पूजा करणे उचित नाही आहे. व्रजमंडळाच्या शिवाय कुठेही दुसरीकडे गोमयाच्या (गायीच्या शेणाच्या) द्वारे मोठा पर्वत बनवून साक्षात् गोवर्धन-पूजेप्रमाणेच त्या गिरिवराची (श्रेष्ठ पर्वताची) पूजा करायला हवी. गोवर्धन-पूजा केल्यानंतर गाईंना सजवून करून त्यांची पूजा करायला हवी. त्या दिवशी गाईंचे दोहन करणे (दूध काढणे) किंवा बैलांद्वारे भार वाहून नेण्याचे काम करवून घेणे उचित नव्हे—*(हरिभक्तिविलास १६/२३१ श्रीसनातन-कृत टीका).* अशा प्रकारे योग्य रितीने गोवर्धन आणि गाईंची पूजा केल्याने श्रीकृष्णचंद्र अत्यंत प्रसन्न होतात.

या दिवशी व्रजेन्द्रनंदन श्रीकृष्णांच्या सल्ल्यानुसार समस्त व्रजवासींनी आपली वार्षिक इन्द्र-पूजा त्याग करून श्रीगिरिराज-गोवर्धनांच्या पूजेसाठी व्रत केले होते. खीर, मुद्‌गसूप, पिष्टक, शुष्कली, विविध खाद्य पदार्थे, दूध, दही आदि तथा अन्नाचा कूट (पर्वत) बनवून त्याद्वारे श्रीगिरिराजांचे भोजन करविण्याची व्यवस्था केली होती. श्रीकृष्णांनी देखील त्या गिरिरूपाला किंवा पर्वत रूपाला धारण करून 'मीच शैल (पर्वत) आहे.' असे म्हणून खूप पूजा ग्रहण केली होती. म्हणून सैद्धांतिक रूपाने श्रीगिरिराज, श्रीकृष्णांचेच द्वितीय स्वरूप तथा सर्वाभीष्ट-प्रदाताच्या रूपात प्रमाणित झाले. नंतर श्रीमाध्व-संप्रदाय-गुरू यतिराज श्रीमाधवेंद्रपुरींनी श्रीगिरिराजांच्या जवळ गोपाळांना प्रकट करवून परत या उत्सवाची सुरुवात केली होती —(*चैतन्यचरितामृत मध्य चौथा अध्याय* पाहावा). या वेळी विशेष करून गौडीय वैष्णवगण "अन्नकूट-महोत्सवा"द्वारे प्रत्येक वर्षी उक्त दिवशी श्रीगोवर्धन-पूजा करतात.

## *गोपाष्टमी*

कार्तिक महिन्याच्या शुक्लपक्षाच्या अष्टमी तिथीला "गोपाष्टमी" म्हटले जाते. त्या दिवशी व्रजेन्द्रनंदन श्रीकृष्ण गोपालक गोप (मोठ्या गायींचे पालन करणारे गवळी) झाले होते. याच्या आधी केवळ गोवत्स-पालक (वासरांचे गवळी) होते. पंडितगण म्हणूनच या तिथीला विशेष रूपाने स्मरण करतात. जे आपल्या समस्त मनोवांछा (मनातील इच्छा) पूर्ण करू इच्छितात, त्या सर्वांनी उपरोक्त तिथीला गाईंची पूजा, गोग्रास-दान, गाईंची परिक्रमा आणि गाईंच्या मागे गमन करतील.

## *उत्थान किंवा प्रबोधिनी-एकादशी*

कार्तिक शुक्ला एकादशीला श्रीहरी चार महिन्यांच्या निद्रेनंतर जागृत होतात. म्हणून ही तिथी श्रीविष्णूंना विशेष प्रिय आहे. पद्‌मपुराणात लिखित आहे—

**"दुग्धाब्धि-भोगि-शयने भगवाननन्तो**
**यस्मिन् दिने स्वपिति चाथ बिबुध्यते च।**
**तस्मिन्ननन्य-मनसामुपवास-भाजां**
**कामं ददात्यभिमतां गरुडांकशायी॥"**

अर्थात् 'क्षीरसागरात शेष-शय्येवर भगवान श्रीअनंत ज्या दिवशी शयन आणि जागरण करतात, त्या दिवशी जे लोक अनन्य चित्त होऊन उपवास करतात, गरुडांच्या पाठीवर स्वार भगवान् त्यांना

वांछित फल प्रदान करतात.' 'श्रीविष्णूंच्या जागरणाच्या तिथीला उपवास केल्यावर त्या घरात त्रिलोकातील (त्रैलोक्यातील, स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकातील) सर्व तीर्थे निवास करतात, मेरुमंदर-पर्वताच्या समान विशाल पाप-समूह जळून राख होतात, समस्त प्रकारच्या दानाचे फळ प्राप्त होते. या व्रताच्या द्वारे जनार्दनांना संतुष्ट केल्यावर त्या घरात त्रिलोकातील (तिन्ही लोकांतील) सर्व तीर्थे अवस्थित राहतात, मेरुमंदर-पर्वताच्या समान विशाल पाप-समूह जळून राख होतात, समस्त प्रकारच्या दानाचे फळ प्राप्त होतात. या व्रताच्या द्वारा जनार्दनांना संतुष्ट केल्यावर मनुष्य दाही दिशांमध्ये उज्ज्वल होऊन या लोकांमध्ये विराजमान होतात आणि शेवटी श्रीहरींच्या धामाला गमन करतात.'—(*स्कंद पुराण*) म्हणून या तिथीला शुद्ध-भक्तगण सुदुर्लभ हरिभक्ती प्राप्त करण्यासाठी निर्जल उपवास, श्रीकृष्णांचे विशेष अर्चन, पूजा, रात्रंदिवस जागरण करून निरंतर हरिकथा-श्रवण-कीर्तन करतात.

## *दामोदर-व्रत तथा चातुर्मास्य-व्रताची समाप्ती*

जे लोक द्वादशारंभ-पक्षापासून चातुर्मास्य व्रत तथा दामोदर व्रत आरंभ करतात, ते कार्तिक मासाच्या शुक्ल-पक्षीय द्वादशीमध्ये व्रत समाप्ती करतील. पौर्णिमा-पक्षापासून आरंभ करणारे व्रतकारीगण, कार्तिक मासाच्या पूर्णिमा तिथीला व्रत समाप्त करतील. प्रातःकाळी (पहाटे) नित्यक्रिया संपन्न केल्यानंतर श्रीहरींच्या निकट हे व्रतोत्तम समर्पण करीत भक्तिसहित श्रीहरीची पूजा करायला हवी. यानंतर सामर्थ्यानुसार वैष्णव-ब्राह्मणांना भोजन, दान, पूजा इत्यादी करायला हवे. व्रताच्या वेळी ज्या सर्व वस्तू निषिद्ध होत्या, त्या पुन्हा त्या दिवसापासून ग्रहण करणे आरंभ होईल. अशा प्रकारे जे यथाविधी उक्त काळाचे अनुष्ठान करतात, त्यांना परम-धर्म लाभ होतो आणि शेवटी ते श्रीहरीचे धाम प्राप्त करतात.

---

**यः आदिदेवोऽखिल लोकनाथो यस्मादिदं सर्वमभूत् परात्मा।**
**लयं पुनर्यास्यति यत्र चान्ते तं कृष्णचैतन्यमवेहि कान्ते॥**

*(अनन्त संहिता, दुसरा अंश, दुसरा अध्याय)*

श्रीशंकर पार्वतीला म्हणाले, "हे दुर्गे! जे आदिदेव आहेत, अखिल लोकांचे स्वामी आहेत, परमात्मा आहेत, आणि ज्यांच्यापासून संपूर्ण जग उत्पन्न झाले आहे, आणि ज्यांच्यात सर्व काही लय होऊन जाते, ते परम पुरूषच श्रीकृष्णचैतन्य आहेत."

# श्रीपुरूषोत्तम-मास-माहात्म्य

*—श्रील ठाकूर भक्तिविनोद*

## *स्मार्त आणि परमार्थाच्या आधारावर शास्त्र द्विविध*

'स्मार्त' आणि 'परमार्था'च्या आधारावर वैदिक आर्य-शास्त्र दोन भागांमध्ये विभक्त आहेत. जे लोक स्मार्त-विभागाचे अधिकारी आहेत, ते स्वाभाविक रूपाने 'परमार्थ' शास्त्रात रुची घेत नाहीत. आपापल्या रुचीच्या अनुसारच मनुष्याचे विचार, सिद्धान्त, क्रिया आणि जीवनाचा उद्देश्य गठित होतो. स्मार्तगण आपापल्या रुचीनुसार शास्त्रांमध्ये जास्त विश्वास करतात. पारमार्थिक शास्त्रांमध्ये त्यांचा त्या प्रकारचा अधिकार नसल्यामुळे त्या प्रकारची आस्था देखील व्यक्त करित नाहीत. अशा प्रकारच्या विभागाचे कर्ता—विधाता आहेत. म्हणून याच्यात जगदीश्वरांचा एक गुप्त उद्देश्य आहे—यात संदेह नाही. आम्हाला जितकी माहिति मिळाली आहे, त्याचा उद्देश्य आहे की,—आपापल्या अधिकारात राहिल्यानेच जिवाची क्रमोन्नती होते. अधिकार-च्युत झाल्यावरच पतन होते. मानवगण आपापल्या कर्मानुसार कर्म-अधिकार आणि भक्ति-अधिकार—असे दोन अधिकार प्राप्त करतात. जोपर्यंत मनुष्यांचा कर्म-अधिकार राहतो, तोपर्यंत त्यांच्यासाठी स्मार्त पथच श्रेष्ठ आहे. कर्माधिकार अतिक्रम करून जेव्हा ते भक्तीच्या अधिकारात प्रवेश करतात, तेव्हा त्यांची पारमार्थिक पथात स्वाभाविक रुची उत्पन्न होते. म्हणून विधात्याने स्मार्त-परमार्थाच्या आधारावर दोन प्रकारच्या शास्त्रांची व्यवस्था केली आहे.

## *स्मार्त-शास्त्रांचे विधि-विधान—कर्मावर आधारित*

स्मार्त-शास्त्रांनी मनुष्यांना सदैव कर्माधिकारात निष्ठा प्राप्त करविण्याच्या प्रयत्नात अनेक प्रकारचे नियम बनवले आहे. येथपर्यंत की त्या समस्त विधि-विधानांमध्ये विशेष निष्ठा दिल्यामुळे परमार्थ-शास्त्रांप्रती काही स्थानांवर उदासीनता पण दाखवली आहे. वस्तुतः शास्त्र एक असूनही लोकांच्या समोर याचे दोन प्रकारचे भाव आहेत. अधिकाराच्या प्रती निष्ठेशिवाय जिवांचे मंगल होत नाही, म्हणून शास्त्र स्मार्त-परमार्थाच्या आधारावर दोन प्रकारचे प्रतीत होतात.

## *अधिमास सत्कर्म-हीन, याचे अन्य नाम—मलमास*

वर्षाला बारा भागांमध्ये विभक्त करून, बारा महिन्यांमध्ये स्मार्त

शास्त्रांनी सर्व सत्कर्मांचे निरूपण केले आहे. वर्णाश्रमाच्या आधारावर जेव्हा समस्त कर्मच बारा महिन्यांमध्ये विभक्त झाले, तेव्हा 'अधिमास' कर्महीन मास झाला. अधिमासात कोणतेही सत्-कर्म होत नाही. चान्द्र-मास आणि सौर-मासात सामंजस्य बनवून ठेवण्यासाठी बत्तीस महिन्यांमध्ये एक महिना सोडून द्यावा लागतो. त्याच मासाचे (महिन्याचे) नाम (नाव) आहे अधिमास (अधिक मास). स्मार्तगणांमध्ये अधिमासाला (अधिक-मासाला) 'मलमास' म्हणून त्यागले आहे. मलिम्लुच (चोर किंवा डाकू), मलिन-मास आदि नाम देऊन अधिमासाला घृणित म्हटले आहे.

## *परमार्थ-शास्त्रात अधिमास श्रेष्ठ आणि हरि-भजनोपयोगी*

इकडे परमाराध्य परमार्थ-शास्त्र अधिमासाला परमार्थ-कार्यात सर्वोपरि श्रेष्ठ म्हणतात. जीवन अनित्य आहे. जीवनाचा कोणताही अंशदेखील व्यर्थ घालवू नये (व्यतीत करू नये). सर्वदा प्रत्येक क्षण हरि-भजनात राहणेच जिवाचे कर्तव्य आहे. म्हणून दर तिसऱ्या वर्षी जो अधिमास असतो, तोच हरि-भजनाच्या उपयोगी बनावा —हाच परमार्थ शास्त्राचा निगूढ प्रयत्न आहे. मग जेव्हा कर्मी लोक त्या मासाला (महिन्याला) सत्कर्म-शून्य रूपात जाणतात, तेव्हा सर्व जिवांच्या उद्धारासाठी परमार्थ-शास्त्राने त्या वेळेला (काळाला) भजनासाठी विशेष उपयोगी निर्धारित केले आहे. परमार्थ-शास्त्र म्हणतात की, हे जिवांनो! का अधिमासात हरि-भजनात आळस करता? हा मास (महिना) श्रीमद्गोलोकनाथांच्या द्वारा सर्वोपरि स्थापित झाला आहे; येथपर्यंत की कार्तिक, माघ आणि वैशाख इत्यादी मासांपेक्षाही हा श्रेष्ठ आहे. या मासात विशेष भजन-विधीसोबत श्रीश्रीराधा-कृष्णांचे अर्चन करावे. सर्व काही प्राप्त होईल.

## *अधिमासाला 'पुरूषोत्तम'-नामाची प्राप्ती*

नारदीय पुराणात अधिमासाचे माहात्म्य ३१व्या अध्यायात वर्णित आहे. द्वादश मासाचे आधिपत्य आणि आपला अपमान होताना पाहून अधिमासाने वैकुंठात जाऊन नारायणांना आपले दुःख ऐकविले. वैकुंठ-पती कृपा करून अधिमासाला सोबत घेऊन गोलोकपती श्रीकृष्णांच्या जवळ पोहोचले. श्रीकृष्ण मलमासाचे दुःख श्रवण करून दयापरवश होऊन म्हणाले—

**अहमेतैर्यथा लोके प्रथितः पुरुषोत्तमः।**

**तथायमपि लोकेषु प्रथितः पुरुषोत्तमः॥**
**अस्मै समर्पिताः सर्वे ये गुणमयि संस्थिताः।**
**मत्सादृश्यमुपागम्य मासानामधिपो भवेत्॥**
**जगत्पुज्यो जगद्वन्द्यो मासोऽयं तु भविष्यति।**
**सर्वे मासाः सकामाश्च निष्कामोऽयं मया कृतः॥**
**अकामः सर्वकामो वा योऽधिमासं प्रपूजयेत्।**
**कर्माणि भस्मसात् कृत्वा मामेवैष्यत्यसंशयम्॥**
**कदाचिन्मम भक्तानामपराधेति गण्यते।**
**पुरुषोत्तम-भक्तानां नापराधः कदाचन॥**
**य एतस्मिनन्महामूढ़ा जप-दानादि-वर्जिताः।**
**सत्कर्म-स्नान-रहिता देव-तीर्थ-द्विज-द्विषः॥**
**जायन्ते दुर्भगा दुष्टाः पर-भाग्योपजीविनः।**
**न कदाचित् सुखं तेषां स्वप्नेऽपि शशशृंगावत्॥**
**येनाहमर्च्चितो भक्त्या मासेऽस्मिन् पुरुषोत्तमे॥**
**धन-पुत्र-सुखं भुंक्त्वा पश्चाद्गोलोकवासभाक्॥**

याचा अर्थ असा आहे की,—हे रमापती! मी ज्या प्रकारे या जगात 'पुरूषोत्तमा'च्या रूपात विख्यात आहे, त्याच प्रकारे हा अधिमास देखील पुरूषोत्तमाच्या नामाने विख्यात होईल. माझ्यात जितके सर्व गुण आहेत, ते सर्व या महिन्यात अर्पित केले आहेत. माझ्या समान होऊन हा अधिमास अन्य सर्व महिन्यांचा अधिपती बनला आहे. हा महिना जगात पूजनीय आणि वंदनीय आहे. अन्य सर्व महीने सकाम आहेत परंतु हा महिना निष्काम आहे. जे अकाम (निष्काम) होऊन किंवा सर्वकाम होऊन (सर्व कामना मनात बाळगून) या मासाची पूजा करतात, ते समस्त कर्मांना भस्मीभूत करून मला प्राप्त करतात. माझ्या भक्तांकडून कधीकधी अपराध होतो, परंतु या पुरूषोत्तम-मासाच्या भक्तांकडून कधीही कोणता अपराध होत नाही, जे सर्व महामूर्ख या अधिमासात जप-दान इत्यादी-वर्जित, सत्कर्म आणि स्नान इत्यादी रहित असतात आणि देव-तीर्थ तथा ब्राह्मणांच्या प्रती विद्वेष करतात, ते सर्व दुष्ट भाग्यहीन परभाग्योपजिवी (दुसऱ्यांच्या भाग्यावर अवलंबून राहाणारे) होऊन स्वप्नात देखील किंचित मात्र सुख प्राप्त करीत नाहीत. या पुरूषोत्तम मासात जे भक्तिपूर्वक माझे अर्चन करतात, ते पुत्र, धन आदीचे सुख भोगून शेवटी गोलोकवासी होतात.

## ***पुरूषोत्तम-मासाच्या माहात्म्यात द्रौपदींचा इतिहास***

पुरूषोत्तम-मासाच्या (महिन्याच्या) माहात्म्य-प्रसंगात काही

पौराणिक प्रसंग कथित आहेत. द्रौपदी मागील जन्मात 'मेधा'-ऋषींची कन्या होत्या. दुर्वासा मुनींच्या द्वारा 'पुरूषोत्तम-माहात्म्य' ऐकून देखील त्यांनी या महिन्याची उपेक्षा केली होती, म्हणून त्या जन्मात कष्ट आणि द्रौपदी-जन्मात पाच पतींच्या अधीन झाल्या होत्या. श्रीकृष्णांच्या उपदेशाने पांडवांनी द्रौपदीच्या सोबत पुरूषोत्तम-मास-व्रत पालन करून वनवासाच्या साऱ्या दुःखांचे अतिक्रमण केले होते.

यथा—

**एवं सर्वेषु तीर्थेषु भ्रमन्तः पाण्डुनन्दनाः।**
**पुरुषोत्तम-मासाद्य-व्रतः चेरुर्विधानतः॥**
**तदन्ते राज्यमतुलमवापुर्गतकण्टकम्।**
**पुर्णे चतुर्देशे वर्षे श्रीकृष्ण-कृपया-मुने॥**

## *वाल्मिकी-कथित पुरूषोत्तम-व्रत*

'दृढधन्वा' राजाचा वृत्तांत आणि पूर्वजन्मीच्या वृत्तांतात पुरूषोत्तम मासाचे (महिन्याचे) माहात्म्य विशेष रूपाने कथित झाले आहे. वाल्मीकी मुनींनी 'दृढधन्वा'च्या प्रश्नांच्या उत्तरात ज्या व्रताचे विवरण केले होते, त्याला नारदांनी श्रीनारायण-ऋषींकडून बदरिका आश्रमात श्रवण केले होते. धर्म-शास्त्रात ज्या प्रकारे ब्राह्मणाचा आन्हिक-विधी निरूपित आहे, त्याच प्रकारे ब्राह्म-मुहूर्तापासून पुरूषोत्तम-सेवकाचे कर्तव्य निर्णय केले गेले आहे.

## *श्रीपुरूषोत्तम-मासात स्नान-विधी*

श्रीपुरूषोत्तम-मासाच्या (महिन्याच्या) स्नान-विधानात म्हटले गेले आहे,—

**समुद्रगा-नदी-स्नानमुत्तमं परिकीर्त्तितम्।**
**वापी-कूप-तडागेषु मध्यमं कथितं बुधैः।**
**गृहे स्नानं तु सामन्यं गृहस्थस्य प्रकीर्त्तितम्॥**

(अर्थात्, समुद्रगामी-नदी मध्ये स्नान उत्तम, वापी अर्थात् शंभर हात लांब जलाशय, विहीर आणि तलाव अर्थात् पाचशे धनुष्य {एक धनुष्य चार हात लांब} परिमाणाच्या जलाशयात स्नान मध्यम आणि घरातील स्नान सामान्य म्हटले गेले आहे).

श्रीपुरूषोत्तम-व्रत करणारी व्यक्ती स्नानानंतर—

**सपवित्रेण हस्तेन कुर्यादाचमन-क्रियाम्।**
**आचम्य तिलकं कूर्यादगोपी-चन्दन-मृत्स्नया॥**
**ऊर्ध्द्वपुण्ड्रमृजुं सौम्यं दण्डाकारं प्रकल्पयेत्।**
**शंख-चक्रादिकं धार्यं गोपी-चन्दन-मृत्स्नया॥**

(अर्थात्, पवित्र हातांनी आचमन-क्रिया करावी, आचमनानंतर गोपीचंदनाद्वारे तिलक रचना करावी. शंख, चक्र इत्यादी चिन्ह गोपी चन्दनाद्वारे धारण करावे).

## *श्रीश्रीराधाकृष्णांची पूजाच पुरूषोत्तम महिन्यात करणीय (करण्याजोगी)*

श्रीकृष्णांची पूजा करणेच पुरूषोत्तम मासात कर्तव्य आहे, यथा—

**पुरुषोत्तम-मासस्य दैवतं पुरुषोत्तमः।**
**तस्मात् सम्पूजयेद्भक्त्या श्रद्धया पुरुषोत्तमम्॥**

वाल्मीकी म्हणाले,—हे दृढधन्वा! पुरूषोत्तम श्रीकृष्णच पुरूषोत्तम मासाचे अधिदेवता आहेत. म्हणून या मासात (महिन्यात) प्रतिदिन (दररोज) भक्ति-श्रद्धापूर्वक पुरूषोत्तम-श्रीकृष्णांची सोळा उपचारांनी पूजा करावी. यथा—**षोडशोपचारैश्च पूजयेत् पुरूषोत्तमम्।**

श्रीश्रीराधा-श्रीकृष्णांची युगुल उपासनाच कर्तव्य आहे, यथा—

**आगच्छ देव देवेश श्रीकृष्ण पुरूषोत्तम।**
**राधया सहितश्चात्र गृहाण पूजनं मम॥**

(अर्थात्, हे देव, देवेश, हे श्रीकृष्ण, पुरूषोत्तम, तुम्ही श्रीमती राधाराणींच्या सोबत या स्थानावर आगमन करा आणि माझी पूजा ग्रहण करा)

## *पुरूषोत्तम महिन्यात काय करायला हवे*

या शास्त्रात श्रीपुरूषोत्तम-व्रताच्या संबंधी पहिले जे समस्त विधि-नियम लिहिलेले आहेत, ते-समस्त नियम, सर्व वर्ण आणि धर्म-परायण धार्मिक लोकांसाठी पालनीय आहेत. ग्रंथाच्या शेवटी नैमिष-क्षेत्रात श्रीसूत गोस्वामींनी ऋषींना हे सांगितले,—

**भारते जनुरासाद्य पुरुषोत्तममुत्तमम्।**
**न सेवन्ते न शृण्वन्ति गृहासक्ता नराधमाः॥**
**गतागतं भजन्तेऽत्र दुर्भागा जन्मजन्मनि।**
**पुत्र-मित्र-कलत्राप्त- वियोगादुःखभागिनः॥**
**अस्मिन्मासे द्विजश्रेष्ठा नासच्छास्त्रान्युदाहरेत्।**
**न स्वपेत् पर-शैय्यायां नालपेत् वितथं क्वचित्॥**
**परापवादान्न ब्रुयान्न कथंचित् कदाचन।**
**परान्नंच न भुंजीत न कुर्व्वीत परक्रियाम्॥**

भारतात जन्म लाभ करून गृहासक्त नराधम व्यक्ती श्रीपुरूषोत्तम-व्रत कथा श्रवण आणि त्या व्रताचे पालन करत

नाहीत. दुर्भाग्यपूर्ण लोक प्रत्येक जन्मात जन्म–मरण–भोग करतात तथा पुत्र–मित्र–पत्नी व निजजनांच्या वियोग–जनित दुःखाचे भागीदार बनतात. या पुरूषोत्तम मासात हे द्विजवरगण! व्यर्थ काव्य–अलंकार इत्यादी असत्–शास्त्रांची चर्चा करू नये. दुसऱ्यांच्या शय्येवर शयन आणि अनित्य विषयांवर चर्चा करू नये. परनिंदा (दुसऱ्यांची निंदा) संबंधित वार्तालाप (संवाद) करू नये. दुसऱ्यांचे भोजन आणि दुसऱ्यांचे कार्य देखील करू नये.

## *पुरूषोत्तम महिन्यात काय करू नये*

**वित्तशाठ्यमकुर्वाणो दानं दद्याद्विजातये।**
**विद्यमाने धने शाठ्यं कूर्वाणो रौरवं व्रजेत्॥**
**दिने दिने द्विजेन्द्राय दत्वा भोजनमुत्तमम्।**
**दिवस्याष्टमे भागे व्रती भोजनमाचरेत्॥**
**इन्द्रद्युम्नः शतद्युम्नो यौवनाश्वो भगीरथः।**
**पुरुषोत्तममाराध्य ययुर्भगवदन्तिकम्॥**
**तस्मात् सर्व–प्रयत्नेन संसेव्यः पुरुषोत्तमः।**
**सर्व–साधनतः श्रेष्ठः सर्वार्थफलदायकः॥**
**“गोवर्द्धनधरं वन्दे गोपालं गोरूपिणम्।**
**गोकुलोत्सवमीशानं गोविन्दं गोपिकाप्रियम्॥”**
**कोण्डिन्येन पुराप्रोक्तमिमं मन्त्रं पुनः पुनः।**
**जपन्मासं नयेद्भक्त्या पुरुषोत्तममाप्नुयात्॥**
**ध्यायेन्नवघन–श्यामं द्विभुजं मुरलीधरम्।**
**लसत् पीत–पटं रम्यं सराधं पुरुषोत्तमम्।**
**एवं यः कुरुते भक्त्या स्वाभीष्टं सर्वमाप्नुयात्॥**

वित्तशाठ्य (धन असूनही भगवंतांच्या सेवेत कृपणता) त्याग करून ब्राह्मणांना दान करावे. धन असूनही कृपणता, रौरव नरकात जाण्याचे कारण बनते. प्रतिदिन वैष्णवांना आणि ब्राह्मणांना उत्तम भोजन करवावे. व्रती व्यक्ती स्वतः दिवसाच्या आठव्या भागात भोजन करतील. इन्द्रद्युम्न, शतद्युम्न, यौवनाश्व आणि भगीरथ यांनी श्रीपुरूषोत्तमांची आराधना करून भगवंतांच्या निकट वास लाभ केला होता. सर्वप्रकारे प्रयत्नपूर्वक पुरूषोत्तमांची सेवा करावी. ही पुरूषोत्तम सेवा सर्व प्रकारच्या साधनांपेक्षा श्रेष्ठ आणि सर्वार्थ फलदायक आहे. ‘गोवर्द्धनधरं’ इत्यादी मंत्राचा पहिले कौण्डिण्य मुनींनी वारंवार जप केला होता. श्रीपुरूषोत्तम मासात या मंत्राचा भक्तिपूर्वक जप केल्याने पुरूषोत्तम प्राप्त होतील. नव–घन द्विभुज मुरलीधर पीतांबर श्रीकृष्णांचे श्रीराधेच्या सोबत सदैव ध्यान करीत पुरूषोत्तम–मास

घालवावा. जे भक्तिसहित असे करतील, ते समस्त अभीष्ट लाभ करतील.

## *श्रीपुरूषोत्तम-मास-कृत्य*

श्रीपुरूषोत्तम-मासात ज्या समस्त नियमांचे पालन करावे लागेल, ते वाल्मीकींद्वारे अशा प्रकारे वर्णित आहेत—

**"हविष्यान्नं च भुंजीत प्रयतः पुरुषोत्तमे।**
**गोधुमाः शालयाः सर्वाः सिता मुद्‌गा यवास्तिलाः॥**
**कलाय-कंगुनी-वारा वास्तुकं हिलमोचिका।**
**आद्रकं काल-शाकंच मूलं कन्दंच कर्कटीम्॥**
**रम्भा सैन्धव-सामुद्रे लवणे दधि-सर्पिषी।**
**पयोऽनुद्धृत-सारंच पनसाम्र-हरितकी॥**
**पिप्पली-जीरकंचैव नागरं चैव तिन्तिड़ी।**
**क्रमुकं लवली-धात्री फलान्यगुड्‌मैक्षवम्॥**
**अतैल-पक्वं मुनयो हविषां प्रवदन्ति च।**
**हविष्य-भोजनं नृणामुपवास-समं विदुः॥"**

पुरूषोत्तम-व्रती व्यक्ती हविष्यान्न भोजन करतील. गोधूम (गहू), शालि-तण्डूल (शालि-तांदूळ), मुद्‌ग (मुगाची डाळ), यव (जव, सातू, गव्हासारखेच एक धान्य), तीळ, मटार, कांगनी-तण्डुल (कांगनी-तांदूळ, राळ), ऊडी-तण्डुल (ऊडी-तांदूळ), वास्तुक-शाक (वास्तुक पालेभाजी), हिलमोचिका-शाक (हिलंचा पालेभाजी), आले , काल-साग, मूलक (मुळा), कंदमुळे, कँाकुड़ (काकडी), रम्भा (केळी), सैंधव आणि समुद्राचे मीठ, दही, तूप, अनुधृत-दुग्धसार, फणस (कटहल), आम्र (आंबा), हिरडा (हरडा), पिप्पली, जिरे, सुंठ, चिंच, क्रमुक (शहतूत किंवा सुपुष्प फळ), आता (सीताफळ), आमलकी-फल (आवळा), इक्षुजात (उसाच्या रसापासून निर्मित) साखर, मिश्री (खडीसाखर), तेलाशिवाय शिजविलेल्या भाज्या —या सर्व वस्तू समस्त हविष्यान्न आहेत. उपवास आणि हविष्यान्नात एकच प्रकारचे फळ प्राप्त होते.

## *परित्यज्य वस्तू आणि आचरण*

**"सर्वमिषाणि मांसंच क्षौद्रं सौवीरकं तथा।**
**राजमासादिकं चैव राजिका मादकं तथा॥**
**द्विदलं तिल-तैलंच तथान्नं शाल्य-दूषितम्।**
**भाव-दुष्टं क्रिया-दुष्टं शब्द-दुष्टंच वर्जयेत्॥**
**परान्नंच परद्रोहं पर-दार-गमं तथा।**
**तीर्थं विना प्रयाणंच परदेशं परित्यजेत्॥**

**देव–वेद–द्विजानांच गुरु–गो–व्रतिनां तथा।**
**स्त्री–राज–महतां निन्दां वर्जयेत् पुरुषोत्तमे॥"**

सर्व प्रकारचे आमिष, मास, मध, कुलर्कटी–फळ, मोहोरी आणि समस्त प्रकारच्या मादक–द्रव्यांचा (पेयांचा) परित्याग करावा. द्वि–दल अर्थात् चणे इत्यादी प्रकारच्या डाळी, तिळाचे तेल, खडे असणारे अन्न, भाव–दुष्ट, क्रिया–दुष्ट आणि शब्द–दुष्ट समस्त द्रव्यांचे वर्जन करावे. परान्न–भोजन, परद्रोह, परदारागमन, तीर्थ यात्रा शिवाय दूरदेशी गमन किंवा परदेश गमन यांचा त्याग करावा. पुरूषोत्तम मासात देवता, वेद, गुरू, गाय, व्रती, नारी, राजा आणि महत्–जनांची निंदा करू नये.

## *आमिष कशाला म्हणतात?*

**"प्राण्यंगमामिषं चूर्णं फले जम्बीरमामिषम्।**
**धान्ये मसूरिका प्रोक्ता अन्नं पर्युषितं तथा॥**
**अजा–गो–महिषी–दुग्धादन्य–दुग्धदि–चामिषम्।**
**द्विज–क्रीता रसाः सर्वे लवणं भूमिजं तथा॥**
**ताम्र–पात्रस्थितं गव्यं जलं चर्मणि संस्थितम्।**
**आत्मार्थं पाचितं चान्नमामिषं तद्बुधैः स्मृतम्॥"**

जंतूंच्या अंगांतून उत्पन्न चूर्ण—आमिष आहे तथा फळांमध्ये जम्बीर अर्थात् एक विशेष प्रकार अर्थात् एक विशेष का लिंबू —आमिष आहे. अन्नात मसूर आणि शिळे अन्न—आमिष आहे. बकरी, गाय आणि म्हशीच्या दुधाशिवाय अन्य सर्व दूध आमिष आहे. ब्राह्मणांचे विक्री केले मीठ तथा भूमीतून उत्पन्न मीठ, तांब्याच्या पात्रात ठेवलेले गव्य (तूप, दूध इत्यादी), चामड्यात ठेवलेले पाणी तथा स्वतः खाण्यासाठी बनविलेले अन्न—**यांची आमिषात गणना होते.**

## *वर्जनीय द्रव्य आदी*

**"रजस्वलां त्यजन् म्लेच्छ–पतितैर्व्रात्यकैं सह।**
**द्विज–द्विट्–वेद–वाह्यैश्य न वदेत् पुरुषोत्तमे॥**
**एभिः दृष्टं च काकैश्च सूतकान्नं च यद्भवेत्।**
**द्विपाचितं च दग्धान्नं नैवाद्यात् पुरुषोत्तमे॥**
**पलाण्डुं लशूनं मुस्तां छत्राकं गृंजनं तथा।**
**नालिकं मूलकं शीघ्रं वर्जयेत् पुरुषोत्तमे॥**
**यद्–यद् यो वर्जयेत् किंचित पुरुषोत्तमे–तुष्टये।**
**तन्पुनर्ब्राह्मणे दत्वा भक्षयेत् सर्वदैव हि॥"**

रजस्वला (ऋतुमती स्त्री), म्लेच्छ, पतित, व्रात्य–व्यक्ती (पतित–ब्राह्मण), ब्राह्मण–द्वेषी, वेद–बाह्य, या सर्वांसोबत वार्तालाप करू नये. या सर्व लोकांद्वारे पाहिलेले आणि कावळयाद्वारे पाहिलेले अन्न, सूतक–अन्न, द्विपाचित अन्न आणि जळलेले अन्न खाऊ नये. कांदा, लसूण, मुस्ता (एक प्रकारचे मूळ), छत्राक (कुत्र्याची छत्री किंवा मशरूम mushroom), गाजर, नालिता (लौकी, दुधी भोपळा), केमुक–नामक–मूलक, सजिना (एक प्रकारची फळी)—**या सर्व गोष्टी वर्ज्य कराव्या.** पुरुषोत्तम मास संपल्यावर ते सर्व वर्जित द्रव्य (वस्तू) ब्राह्मणाला दिल्यानंतर भोजन करावे.

## *पुरुषोत्तम, कार्तिक आणि माघ—*
## *तिन्ही महिन्यांमध्ये एकच कृत्य आणि त्रिविध व्रत*

**"ब्रह्मचर्यमधः शय्यां पत्रावल्यांच भोजनम्।**
**चतुर्थकाले भुक्तिं च प्रकुर्यात् पुरुषोत्तमे॥**
**कुर्यादेतांश्च नियमान्व्रती 'कार्तिक–माघयोः'।**
**पुण्येहि प्रातरुत्थाय कृत्वा पौर्वाह्निकीः क्रियाः॥**
**गृह्णीयान्नियमं भक्त्या श्रीकृष्णणंच हृदि स्मरन्।**
**उपवासस्य नक्तस्य चैकभुक्तस्य भूपते॥**
**एवंच निश्चयं कृत्वा व्रतमेतत् समाचरेत्।"**

ब्रह्मचर्य अर्थात अमैथुन, भूमीवर शयन, पानांवर भोजन, चतुर्थ प्रहरात भोजन पुरूषोत्तम–मासात उचित आहेत. **कार्तिक तथा माघ महिन्यांमध्ये देखील या समस्त नियमांचे व्रत धरावे.** सकाळी उठून पुर्वाह्न–काळाच्या क्रिया संपन्न करून श्रीकृष्णांना भक्तिसहित हृदयात स्मरण करून पूर्वोक्त नियमांचे ग्रहण करावे. **व्रत तीन प्रकारचे आहेत अर्थात् उपवास, रात्रीच्या वेळी हविष्यान्न ग्रहण आणि एकदा भोजन** करणे—व्रती व्यक्तीसाठी जे कर्तव्य (उपयुक्त) बोध होईल, त्याचा निश्चय (विचार) करून या व्रताचे पालन करावे.

## *पुरुषोत्तम–मासात (महिन्यात)*
## *श्रीमद्भागवत–श्रवण आणि व्रत–पालनाचे फल*

**"श्रीमद्भागवतं भक्त्या श्रोतव्यं पुरुषोत्तमे॥**
**तत्पुण्यं वचसा वक्तुं विधाता हि न शक्नुयात्।**
**शालग्रामार्चनं कार्यं मासे श्रीपुरुषोत्तमे॥**
**एतन्मासव्रतं राजन् श्रेष्ठं क्रतुशतादपि।**
**क्रतुं कृताप्नुयात् स्वर्गं गोलोकं पुरुषोत्तमे॥**

**पृथिव्यां यानि तीर्थानि क्षेत्राणि सर्वदेवताः।**
**तद्देहे तानि तिष्ठन्ति यः कुर्यात् पुरुषोत्तमम्॥"**

पुरुषोत्तम-मासात, भक्तिपूर्वक श्रीमद्भागवत-ग्रंथाचे श्रवण करावे. भागवत-श्रवणाच्या पुण्याच्या विषयी विधाता देखील सांगू शकत नाहीत. भक्तगण श्रीशालिग्राम-शिलेचे अर्चन करतील. या मासात व्रत —शंभर क्रतूंपेक्षा (यज्ञांपेक्षा) श्रेष्ठ आहे. कारण यज्ञ केल्याने स्वर्ग लाभ होतो; परंतु जो पुरुषोत्तम-व्रताचे पालन करतो, त्याच्या देहात समस्त तीर्थक्षेत्र किंवा देवतागण विराजतात.

## *दीप-दान आणि त्याचे फळ*

**"कर्तव्यं दीप-दानंच पुरुषोत्तम-तुष्टये।**
**तिल-तैलेन कर्त्तव्यं सर्पिषा वैभवे सति॥**
**तयोर्म्मध्ये न किंचित्ते कानने वसतोऽधुना।।**
**इंगदीजेन तैलेन दीपः कार्यस्त्वयानम॥**
**योगो ज्ञानं तथा सांख्यं तंत्राणि सकलान्यपि।**
**पुरुषोत्तम-दीपस्य कलां नार्हन्ति षोड़शीम्॥"**

पुरुषोत्तमांच्या तुष्टीसाठी दीपदान करणे कर्तव्य आहे. वैभव (सामर्थ्य) असल्यास तुपाचा दीपक, नाही तर तिळाचे तेल दीपक प्रज्वलित करण्याचा नियम आहे. हे मणिग्रीव! तुम्हाला वनवासात तूप किंवा तिळाचे तेल मिळणार नाही. तुम्ही इंगुदीच्या (एरंडाच्या) तेलाने दीपदान करा. अष्टांग-योग, ब्रह्म-ज्ञान आणि सांख्य-ज्ञान व समस्त तांत्रिक-क्रिया—पुरूषोत्तम-मासात दीपदानाच्या सोळाव्या कलेच्या समान देखील नाही आहेत.

## *पुरुषोत्तम-मासात कृष्णपक्षाची चतुर्दशी, नवमी आणि अष्टमी तिथींमध्ये विशेष क्रियेचे वर्णन*

या व्रताचे उद्यापन करण्याच्या संबंधात, वाल्मीकींनी म्हटले, —हे महाराज! पुरुषोत्तम-मासात कृष्णपक्षाची चतुर्दशी, नवमी आणि अष्टमी तिथीला या व्रताचे उद्यापन केले जाते. विशुद्ध भक्त-ब्राह्मणाला नियंत्रण करून एकाग्रचित्ताने उद्यापन क्रिया करायला हवे. पंच-धान्यांद्वारे (पाच प्रकाराच्या अन्नांद्वारे) अतिशय सुंदर सर्वतोभद्राची (सिंहासनाची) रचना करावी. मंडळावर चार कलश स्थापन करून चारीकडे चतुर्व्यूहाला (वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांना) प्रसन्न करण्याच्या इच्छेने बेल-फळ ठेवावे. सद्-वस्त्रांनी घेरलेल्या विड्याच्या पानांनी चतुर्व्यूह स्थापित करावे. **श्रीराधा-माधवांना कलशासहित स्थापित करावे. वेद-वेदांग-विशारद**

**वैष्णवाचार्याला स्वीकार करावे.** चतुर्व्यूह जप करून—चारी दिशांना (चारी बाजूंना), चार दीप (दिवे) प्रज्वलित करावे.

## *अर्घ्य-मंत्र तथा नमस्कार-मंत्र*

क्रमशः श्रद्धा-भक्ती सोबत पत्नी सहित नारळ इत्यादी अर्घ्य दान करावा. अर्घ्य-मंत्र,—

**"देव-देव नमस्तुभ्यं पुराण-पुरुषोत्तम।**
**गृहाणार्घ्यं मया दत्तं राधया सहित हरे॥"**

हा मंत्र म्हणून नमस्कार करावा,—

**"वन्दे नवघन-श्यामं द्विभुजं मुरलीधरम्।**
**पीताम्बरधरं देवं सराधं पुरुषोत्तमम्॥"**

## *आरती, ध्यान आणि पुष्पांजली मंत्र*

यानंतर तीळ-होम करून आरती करावी. नीराजन (आरती) मंत्र आहे—

**"निराजयामि देवेशमिन्दीवर-दलच्छविम्।**
**राधिका-रमणं प्रेम्णा कोटि-कन्दर्प-सुन्दरम्॥"**

अथ ध्यान-मंत्र—

**"अन्तर्ज्योतिरनन्त-रत्न-रचिते सिंहासने संस्थितम्।**
**वंशीनाद-विमोहित-व्रजवधू वृन्दावने सुन्दरम्॥**
**ध्यायेद् राधिकया सकौस्तुभमणि-प्रद्योतितोरस्थलम्।**
**राजद्रत्न-किरीट-कुण्डलधरं प्रत्यग्र-पीताम्बरम्॥"**

ध्यान करीत पुष्पांजली अर्पण करतील आणि या मंत्रासोबत नमस्कार करतील—

**"नौमि नवघन-श्यामं पीतवाससमच्युतम्।**
**श्रीवत्स-भासितोरस्कं राधिका-सहितं हरिम्॥"**

## *व्रताचे अंतिम-कृत्य आणि नियम-भंग करण्याचा विधी*

नंतर भक्त-ब्राह्मणाला पूर्णपात्र दान करून आचार्यांना दक्षिणा द्यावी. यानंतर दान करतील. या वेळी उपयुक्त वैष्णव-ब्राह्मणाला भागवत दान करण्याचा विधी आहे. ब्राह्मणाला संपुटित कांस्य-पात्र दान करावे. नंतर ब्राह्मणांना तूप-युक्त-खीरीचे भोजन करवावे. नंतर सर्वांना अन्न प्रदान करून स्वजनांसोबत (आप्तेष्टांसोबत) भोजन करावे. उद्यापन करून व्रत-नियम त्याग करावा.

## *स्वनिष्ठ, परिनिष्ठित आणि निरपेक्ष परमार्थींचे कृत्य*

परमार्थी तीन प्रकारचे आहेत—अर्थात् स्वनिष्ठ (श्रद्धाळू, परंतु अदीक्षित व्यक्ती अर्थात ज्या व्यक्तींची दीक्षा झाली नाही आहे), परिनिष्ठित (वैष्णव गुरूंचे आश्रित) आणि निरपेक्ष (गृह-त्यागी भक्त). पूर्वोक्त समस्त कार्ये **स्वनिष्ठ परमार्थींसाठी** विधेय (करण्याजोगी) आहेत. **परिनिष्ठित भक्त मंडळी** आपापल्या आचार्यांद्वारे निर्धारित 'कार्तिक-मास-व्रत-पालन'-नियनानुसार 'पुरुषोत्तम-व्रत-पालन' करण्याचे अधिकारी आहेत. निरपेक्ष भक्तगण ऐकान्तिकी प्रवृत्तीच्या द्वारे 'श्रीभगवत्-प्रसाद-सेवन'-नियमासोबत रात्रंदिवस साध्यानुसार 'श्रीहरिनाम-श्रवण-कीर्तना'च्या द्वारे समस्त पवित्र मास (महिना) व्यतीत करतात. जसे श्रीहरिभक्तिविलासात चरम-उपदेशात विष्णुरहस्य वाक्य आहे—

**इन्द्रियार्थेष्वसक्तानां सदैव विमला मतिः।**
**परितोषयते विष्णुं नोपवासो जितात्मनः॥**

ज्यांची मती भक्तिपूत (भक्तीच्या द्वारा पवित्र) होऊन इंद्रियांच्या भोग्य वस्तूंच्या प्रती अनासक्त आहे, त्यांची मती स्वाभाविक रूपाने विमला (निर्मला) आहे, म्हणून ते जितात्मा (इंद्रजीत)—सर्व वेळच (काळच) स्वाभाविकी भक्तीच्या द्वारा श्रीकृष्णाला संतुष्ट करतात. उपवास इत्यादी त्यांच्या चित्त-शुद्धीचे कारण होऊ शकत नाही. म्हणून श्रीसनातन गोस्वामींनी ऐकान्तिक भक्तांच्या संबंधी येथे सांगून ग्रंथ समाप्त केला आहे.

## *ऐकान्तिक भक्तांचे माहात्म्य*

**एवमेकान्तिनां प्रायः कीर्तनं स्मरणं प्रभोः।**
**कुर्वतां परमप्रीत्या कृत्यमन्यन्न रोचते॥**
**भावेन केनचित् प्रेष्ठ-श्रीमूर्त्तेरंघ्रि सेवने।**
**स्यादिच्छैषां स्वतंत्रेण स्वरसेनैव तद्विधिः॥**
**विहितेष्वेव नित्येषु प्रवर्त्तन्ते स्वयं हि ते।**
**इत्याद्येकान्तिनां भाति माहात्म्यं लिखितं हि तत्॥**

एकान्त कृष्ण-भक्तांना श्रीकृष्ण-स्मरण आणि श्रीकृष्ण-कीर्तनच अत्यंत प्रिय आहे. साधारणतः ते या दोन अंगांशिवाय आणखी कोणत्याही अंगात ते व्यस्त होत नाहीत. परम प्रीतीने उक्त दोन्ही अंगांच्या पालनात इतका आग्रह आहे की ते अन्य समस्त कार्यांमध्ये रुची घेऊ शकत नाहीत. श्रीकृष्णांची चरण-सेवा कोण्या

विशेष भावाने करण्याची त्यांची इच्छा प्रबल होते, म्हणून काही स्वतंत्रतेने आणि आपल्या रसाच्या अनुकूल भावानुसार कृष्णांची चरण-सेवाच त्यांचा विधी आहे. ऋषींनी जे सर्व विधि-नियम दिले आहेत, त्यांच्यात ऐकान्तिक-भक्तांसाठी विधि-बाध्य-भाव नाही आहेत. स्वयं प्रवृत्ती भावच स्वाभाविक रूपाने विद्यमान आहे. हाच अनन्य भक्तांचा महिमा आहे.

## *आपापल्या अधिकारानुसार हे व्रत पालनीय*

भक्तांनो! स्वनिष्ठ, परिनिष्ठित आणि एकान्त भावाच्या आधारावर यथाधिकार श्रीपुरुषोत्तम मासाचे पालन करण्यात प्रवृत्त होतात. भगवान् व्रजनाथ श्रीकृष्ण या मासाचे (महिन्याचे) अधिपति आहे. म्हणून अधिक-मास प्रत्येक भक्तासाठीच प्रिय महिना) आहे, कारण घटनाक्रमात त्या मासात (महिन्यात) कोणतीही कर्मकांडाची पीडा येऊन भक्तीमध्ये व्यवधान पोहोचवू शकत नाही.



# सनातन धर्म आणि गो-मातेच्या प्रती पुन्हापुन्हा होणाऱ्या अत्याचाराच्या फलस्वरूप विश्व संस्कृतीची (विश्व-शांतीची) ची अव्यवस्था

**कर्मणां परिणामित्वादविरिंच्यादमंगलम्।**
**विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत्॥**

—*(श्रीमद्भागवत ११/१९/१८)*

विद्वान पुरुष ब्रह्मलोकापर्यंत समस्त अदृष्ट स्वर्ग इत्यादी सुखांनाच कर्मांपासून उत्पन्न फळ मानतात आणि कर्म मात्रच शेवटी नाशवंत आहेत, असे समजून दृष्ट दुःखाच्या समान माननात.

श्रील प्रभुपादजी म्हणतात,—कर्मकांडात व्यस्त लोकांचे उपास्य आधिकारिक देवता ब्रह्मदेवांपासून त्रिगुणाच्या अधीन समस्त अधिष्ठानच अमंगलाचे स्रोत आहे, कारण ते सर्वच विकारमय जगात आबद्ध आहेत. बुद्धिमान व्यक्ती या जगातील लौकिक क्षणभंगुरता आणि दोष-प्रवणतेला लक्ष्य करून परोक्षवादींची पर-जगताची नश्वरता आणि अमंगळाचे दर्शन करतात. कर्म मार्गात प्राप्त होण्यायोग्य विषय आत्मविद्गणासाठी अप्रयोजनीय आहेत. ही गोष्ट जर समजू शकलो नाही तर नाशवंत कर्मकांड जिवांना बंधनात टाकतात.

जगप्रसिद्ध कवी रविन्द्रनाथ ठाकूर यांनी लिहिले आहे—

**आमि चाई ना ह'ते नव बंगे नव युगेर चालक,**
**यदि पर जन्मे पाइरे ह'ते ब्रजेर राखाल बालक।**
**तबे निविये देव निजेर घरे सुसभ्यतार आलोक॥**

—*(जन्मान्तर कविता)*

जर मी पुढच्या जन्मात व्रजचा बालक होऊ शकलो तर मी नवीन बंगालच्या नवीन युगाचा चालक होऊ इच्छित नाही. तेव्हा मी स्वतःच्या घरातील सुसभ्यतेचा दीपक विझवून टाकीन.

अजितेन्द्रिय मनुष्य सर्व काही करू शकतो. कोणाला नोबेल पुरस्काराने सन्मानित करून अपार सन्मान देऊ शकतो आणि कधी त्यांच्या प्रत्यक्ष अनुभूतीला देखील पायांखाली चिरडून आपल्या स्वेच्छाचारी (स्वच्छंद) आचरणाचे तांडव करू शकतो. विज्ञानाचे उद्देश्य उचित आहे—मनुष्याला सुखी करणे, हे माहिती आहे परंतु या जड (निर्जीव, अचेतन), नश्वर देहात कोणीही मनुष्य वास्तविकरीत्या सुखी होऊ शकत नाही.

ग्रीक देशातील महान वैज्ञानिक पायथॅगोरस यांनी म्हटले होते

—"For as long as men massacre animals, they will kill each other. Indeed he who sows the seed of murder and pain, cannot reap Joy and Love."

"जो पर्यंत माणसे प्राण्यांची कत्तल करित आहेत, तो पर्यंत ते एकमेकांना सुद्धा मारीत राहातील. जे खून आणि दुःखाचे बियाणे पेरतात ते आनंद आणि प्रेमाच्या पिकाची कापणी करू शकणार नाहीत."

चेतन राज्याची Physics and Chemistry (भौतिकशास्त्र आणि रसायनशास्त्र)—आजदेखील या जगाच्या विश्वविद्यालयांच्या पाठ्यक्रमात आल्या नाहीत, ज्याच्या फलस्वरूप येथील तुच्छ ज्ञान-विज्ञान मृत्युनंतर प्रयोग (वापर) होत नाही.

पशुपक्ष्यांचे मास खाण्यासाठी त्या पशुपक्ष्यांची निर्दयतेने हत्या केली जाते. या निधन व हत्या कर्मासोबत निष्ठुरता जुळलेली असते. निष्ठुरता स्वभावात संक्रमित होते. स्वभावात हिंसेचा संचार होतो. क्रमशः सूक्ष्म अनुभूती व भावना (finer sentiments) निघून जातात, सुललित अनुभूती जश्या—दया, करुणा, सहानुभूती, मैत्री, प्रीती, सूक्ष्म रस बोध इत्यादी. हृदयात क्रमशः हिंसा, कलह, संघर्ष आणि युद्धाचे बीबियाणे इत्यादी संघटित होते. सामूहिक दूषित चेतना का प्रकाश गटबाजी व युद्धात रूपांतरित होऊन जातो. विश्वविख्यात साहित्यिक लेव टॉलस्टॉय (Lev Tolstoy) यांचे प्रसिद्ध मत होते—"If you want to stop wars, at first stop slaughter houses. (जर तुम्ही युद्ध बन्द करू इच्छिता तर आधी कत्तलखाने बन्द करा.)" अनैतिक अविवेकी सरकार एकीकडे शांतीचा प्रस्ताव ठेवते आणि दुसरीकडे सोबतच मद्य व मांसाच्या विक्रीचा परवाना (license) पण देते. याच्याद्वारे काय कधी शांती मिळू शकते का? "Law maker is the law breaker.—कायदे बनविणारेच कायदे मोडतात"-समाधान कसे होईल? उत्तेजक द्रव्यांचे सेवन केल्याने उत्तेजनेत वृद्धी होईलच, तेथे सरकारची Family Planning (कुटुंब नियोजनाची) नीती कशी शक्य होईल, हे माहिती नाही आहे.

एक विश्वविख्यात दार्शनिक ऍरिस्टॉटल (Aristotle) म्हणतात की—"राष्ट्रांच्या नायकांना अवश्यच उच्च कोटीचे दार्शनिक (तत्ववेत्ता) असायला हवे." उच्च दार्शनिकाची वास्तविक परिभाषा (व्याख्या) ही आहे की तो आत्मतत्त्व व आत्मधर्मात सुप्रतिष्ठित असावा, तेव्हाच दर्शन राज्याच्या दर्शन नामक क्रिया सर्व दिशांमध्ये

प्रकाशित होतील. कोणतीही तुच्छ स्वार्थ संबंधी बाधा आणखी टिकू शकणार नाही. तेव्हाच एकमात्र गोमातेच्या असमोर्द्ध महिमेच्या विषयाची उपलब्धी (जाणकारी) होईल. श्रीप्रेमविवर्त्त ग्रंथात गौरांग पार्षद प्रवर (श्रीचैतन्य महाप्रभूंचे प्रख्यात परिकर) —श्रीश्रील जगदानन्द पंडित महाशयांद्वारे शास्त्रीय सिद्धान्त लिहिलेला आहे की—

**पिशाची पाइले येन मतिछन्न हय।**
**मायाग्रस्त जीवेर हय सेइ भाव उदय॥**

—*(प्रेमविवर्त* ६/५*)*

"पिशाचाने झपाटल्यावर जसा मनुष्य पागल आणि उन्माद-ग्रस्त होतो, तसेच मायेने ज्या जिवाचा ग्रस्त केले आहे, तो जिवसुद्धा तसाच विक्षिप्त होऊन जातो."

अनेक व्यक्ती हे जाणतात की गोमातेला स्पर्श केल्याने भूत, प्रेत, पिशाच पकडू शकत नाहीत. कारण काय आहे? याच्या मागे काय विज्ञान आहे? ३३ कोटी देवदेवतांसोबत साक्षात परमेश्वरांचे या गोमातेच्या दिव्य शरीरात अधिष्ठान आहे. गोमाता परम पवित्र आहे. श्रीकृष्णांच्या बाल्यलीलेत देखील गोमातेचा प्रसंग साधारणतः पाहिला जातो. जेव्हा कोणती दुर्घटना (म्हणजे पूतना-वधापासून शकटासुर व तृणावर्त्त-वध आणि यमलार्जुन वृक्ष-भंग [दोन जुळे अर्जुन वृक्ष उन्मळून पडणे] इत्यादी अनेक संकटे) उपस्थित होतात, तेव्हा नन्दबाबा आणि यशोदा माता, त्याच वेळी गोमूत्र आणि शेणाने बाल-कृष्णांचा अभिषेक करवित असत; ब्राह्मण-वैष्णवांकडून गोपुच्छ भ्रमण(गायीची झुबकेदार शेपटीने ओवाळणे) इत्यादी द्वारा स्वस्ति-वाचन (सर्वकाही सुरळीत चालावे आणि विघ्न दूर व्हावेत म्हणून केलेले वैदिक मंत्रांचे पठण) करवित असत. जेव्हा गोपाल (गवळी) बालकांसोबत श्रीकृष्ण गोचारण करायला जातात तेव्हा सर्व अनवाणी पायांनी गोमातेच्या पदांचे (पावलांचे) अनुसरण करीत चालायचे, याच्याद्वारे त्यांनी गोमातेची अशेष महिमा प्रकाशित केली. प्रत्येक वेळी गोमातेच्या आलिंगन आणि चुंबन इत्यादी द्वारा अपूर्व रितीने आनंद संपादन करित असत. कधीकधी ते साक्षात (प्रत्यक्ष) मातेचे स्तनपान करण्याच्या समानच गोमातेचे स्तन मुखात घेऊन दूध पान करित असत. ह्या सर्व आनंदमय क्रिया काय प्रमाणित करतात?

महात्मा गांधीदेखील कृषी, गोरक्षण आणि गोपालन (गायींचे पालन) यांना आधार (पाया) बनवून 'भारतवर्ष' नामक या परम

पवित्र भूमीचे पालन करण्याची गोष्ट वारंवार सांगत असत. गोचारणसाठी जाऊन (गाईंना चरायला नेऊन) गोमातेचे पालन आणि रक्षणाच्या संबंधात जो अशेष-विशेष आदर्श भगवान श्रीकृष्णांनी प्रदर्शित केला आहे—त्या सर्व उज्ज्वल आदर्शांचे अवश्यच अनुसरण करायला हवे. हाय! आपण आपल्या मातेचे दूध समाप्त झाल्यावर काय तिला कापून टाकतो? तेव्हा का रोज लाखो गोमातांना कापले जाते? का रात्रीच्या अंधारात हजारो गोमातांना एक देशाच्या सीमेच्या पार करवून मुस्लिम राष्ट्रांमध्ये प्रवेश करविला जातो?

आमचे बहादूर सरकार काय करते आहे? Security Force काय करते आहे? दुग्धहीन (दूध न देणाऱ्या) गोमातेची हत्या न करता जर तिला वनात सोडून दिले गेले तरी देखील ती तेथे कोणापासूनही कोणतीही आशा न बाळगता स्वतः पालित होऊ शकते आणि जर महान व्यक्ती गोपालनाचा आदर्श प्रदर्शित करतील तेव्हा सर्वजण अनुप्रेरणा प्राप्त करू शकतील. या संबंधात एक चांगली बातमी मिळाली होती की—भारताचे वर्तमान प्रधानमंत्री—श्री नरेन्द्र मोदींनी गुजरातच्या मुख्यमंत्री म्हणून कार्यरत असताना आपल्या कार्यकाळादरम्यान कठोर प्रशासनाच्या बळावर गुजरातमध्ये गोहत्येला संपूर्ण रूपाने बंद केले होते. हा दृष्टांत सर्वांद्वारे अनुसरण करण्याजोगा आहे. आमची अशी इच्छा आहे की प्रशासन विभागात धार्मिक आणि सज्जन लोक असावेत. केवळ स्वस्त मतांद्वारे कूटनीती करून क्षमता-लोभी सरकार आपल्या आणि दुसऱ्यांचे देखील घोर अमंगल विधान करित आहे. गोमाता जोपर्यंत जीवित असते तो पर्यंत ती गोमूत्र आणि शेणाद्वारे द्वारा पृथ्वीदेवीची सेवा करते. तोच धरती-मातेचा आहार आहे, ही गोष्ट विज्ञानाच्या आधारावर प्रमाणित केली जाते आहे. पृथ्वीची उर्वरा शक्ती अथवा क्षमता हळूहळू कमी होण्याचे सर्वात मोठे कारण आहे—गोवंश लुप्त होणे. कोणत्याही अवस्थेत गोहत्या बंद व्हायला हवी.

यूरिया (Urea) किंवा रासायनिक खत आणि विषारी औषधांच्या वापराचा परिणाम किती भयंकर आहे, त्याला वैज्ञानिकांनी देखील स्वीकार केले आहे. अनेक प्रकारच्या रोग-जिवाणूंची उत्पत्ती होते आहे. फलस्वरूप मानव जीवन संकटाच्या सन्मुख येऊन पोहोचले आहे. त्या व्यतिरिक्त प्लास्टिक व पॉलीथीन अथवा थर्माकोल इत्यादीच्या प्रचुर वापरामुळे जनजीवन अस्ताव्यस्त होते आहे. निसर्गातील प्रदूषण परम सीमेला पोहोचले आहे, तरी देखील

महामूर्ख मानवीसमाजाची झोप उघडत नाही आहे. परिणाम अत्यंत भयानक होईल. या सर्वांवर पूर्ण प्रतिबंध लावण्यात आला नाही तर कोणीही वाचणार नाही. भविष्यात जन्म घेणाऱ्या पिढ्यांच्या गोष्टीवर चिंतन करण्यास कोणीही तयार नाही आहे. कुण्या प्रकारे जर कचरा पहिल्यापासूनच वेगवेगळा करून ठेवला, तर यामुळे प्रदूषण थोडेसे कमी होईल. प्लास्टिक इत्यादीच्या सफाई अभियानात सर्व देशवासीयांचा सामील व्हायला हवे. कुठे आहेत विश्व स्वास्थ्य संस्था? कुठे आहे विश्व शांती संस्था? त्या काय करीत आहेत? कोणतेही पुरेसे समाधान शोधू शकले आहे का?

गंगेच्या पाण्याची गुणावली (गुण-समुदाय) आणि पवित्रतेला वैज्ञानिकांनी एका स्वरात स्वीकार केले आहे. ठीक त्याच प्रकारे गोमातेची पवित्रता आणि उपयोगिता सर्व समय सर्वांद्वारे या महा-पुण्यमय भारतभूमीत आजपर्यंत स्वीकृत होत आली आहे. परंतु आजची कामोन्मत्त (कामवासनेने उन्मत्त झालेली) जनता यास मानण्यास तयार नाही आहे. आता लक्ष दिले नाही तर एका गोष्टीचा विचार करून ठेवा—पळायला रस्ता सुद्धा मिळणार नाही. यमराज मागेपुढेच आहेत. वैज्ञानिकांनी परीक्षा करून पाहिले की—गोमूत्र आणि शेणात प्रचुर परिमाणात कीटकनाशक क्षमता विद्यमान आहे. म्हणून गोमूत्र आणि शेणाच्या द्वारा घरदार, ओसरी आणि अंगण सारवल्याने किंवा त्याच्या द्वारा स्नान क्रिया इत्यादी केल्याने सर्वकाही मंगल होते. येथपर्यंत की साक्षात भगवंतांच्या अभिषेकाची क्रिया गोमूत्र आणि गोमय (शेण) सोडून संपन्न होत नाही. गोगृहात (गोशाळेत, गायीच्या गोठ्यात) निवास केल्याने व्यक्ती निरोगी बनते. येथपर्यंत की Tuberculosis चे (क्षयरोगाचे) रोगी देखील स्वस्थ होऊन जातात. शास्त्रांमध्ये वर्णिलेले आहे की गोमूत्रात, गंगेत आणि शेणात लक्ष्मीचा निवास असतो. विषारी रासायनिक खतांचा त्याग करून प्रचुर मात्रेत नायट्रोजन-समृद्ध या गोमूत्र आणि शेणाचा वापर केल्याने तेवढाच फायदा पुन्हा मिळू शकतो. पहाड-पर्वत इत्यादींना भूधर म्हटले जाते. या पहाड-पर्वतांचा मूळ प्राण असतो—अनेक प्रकारचे वृक्ष-लता इत्यादी जंगल. जर वन इत्यादी नसतील तर पहाड-पर्वत स्वतःला धारण करण्याची क्षमता हरवून बसतील. लाखों गोमातांची हत्या केली जाते आहे, म्हणून परिस्थिती क्रमशः विपरीत दशेला पोहोचते आहे. जर पहाड पर्वतांमध्ये गोमाता इकडे-तिकडे गोमूत्र आणि शेण विसर्जन करतील तर त्यापासून विभिन्न प्रकारच्या झाडे, झुडुपे व

वेलींना समृद्धी प्राप्त होईल (त्यांची चांगली जोपासना होईल). फलस्वरूप पहाड-पर्वतांवर अनेक प्रकारच्या औषधींची सृष्टी (निर्मिती) होईल, ज्यापासून विशेष लाभ प्राप्त होईल. आणखीन काय या landslide(भूमिस्खलन, भूमिपात, दरड कोसळण) आणि soil erosion (जमिनीची धूप, मृदा धूप, मृदा अपक्षरण) देखील बन्द होतील आणि Ecological balanceचे (पर्यावरणाच्या संतुलनाचे) रक्षण संभव होईल. गोमूत्र आणि शेणापासून कितीतरी प्रकारचे औषधे तयार झाली आहेत आणि भविष्यात होतील, हे निश्चित सांगता येणार नाही. डॉक्टर एडवर्ड जेनर यांनी कशा प्रकारे गोमातेच्या शरीरातून 'Small-pox' च्या (देवी रोगाच्या, शीतलाच्या) औषधाचा शोध लावला, ही गोष्ट कोण जाणत नाही?

आचार्य विनोबा भावेंनी गोहत्या विरुद्ध चाललेल्या आंदोलनासाठी आपल्या शरीराची आहुती सुद्धा दिली होती. देशासाठी कितीतरी संताने आपल्या अनित्य देहाचे विसर्जन करण्यासाठी प्रस्तुत राहतील, तेव्हाच गोमातेचे संरक्षण आणि संवर्धन संभव आहे. या अहिंसक प्राण्याची कोणीही हत्या करू नये या विषयी हिंदू, मुस्लिम आणि ख्रिश्चन या सर्वांनी निर्विशेष रूपाने जागरूक व्हायला हवे—हीच हात जोडून प्रार्थना आहे. आपापल्या जीवनयात्रेच्या सुरक्षेसाठी हे प्रयोजन सफल होणे अत्यंत आवश्यक आहे. नाहीतर येणाऱ्या पिढ्या अपंग होऊन जातील. जनचेतना (लोकांची चेतना आणि विचारशक्ती) कशा प्रकारे विलुप्त होत चालली आहे, त्याचा स्वप्नात देखील विचार करता येत नाही.

शारिरीक रूपाने प्रतिबंधित (Handicap, अपंग) व्यक्तीच्या प्रति काहीना काही विशेष सहानुभूती प्रदर्शन करणे जरुरी आहे. ती सहाय्यता केवळ आर्थिकच असावी, अशी गोष्ट नाही आहे. कित्येक वेळा पाहिले जाते की कुण्या अपंग व्यक्तीला सरकार रेल्वेचे भाडे माफ करते, त्या क्षेत्रात सरकारची अवश्य प्रशंसा केली गेली पाहिजे परंतु जर तीच अपंग व्यक्ती कोट्यवधी रुपयांचा मालक असेल तर तेच सरकार अवश्यच अविवेकी होईल. हो की नाही?

गौडीय-गोष्ठीपती (गौडीय वैष्णवांच्या संसदेचे अध्यक्ष) श्रीश्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती गोस्वामी ठाकूर प्रभुपादांनी म्हटले आहे की—'अपचैतन्य किंवा विवर्तचैतन्याच्या द्वारे जी भोग किंवा मोक्षाची छबी (सौंदर्य, उदात्तता, तेजस्विता, वैभव) प्रकाशित होते, तिच्याद्वारे संकीर्णतेची छबीच कामुक समाजात 'उदारते'च्या नावाने जाणली

जाते.'—याला वास्तविक उदारता म्हणता येत नाही. लुप्त-सुप्त जीवात्म्याला त्याच्या स्वरूपात सुप्रतिष्ठित करणे—हीच वास्तविक उदारता आहे. "जीवेर स्वरूप हय कृष्णेर नित्य दास।"—या गोष्टीला विसरून सर्व केवळ मायादेवीच्या सेवेत व्यस्त झाले आहेत. चंडी पाठात पाहिले जाते—'या देवी सर्वभूतेषु शक्तिरूपेण संस्थिता'—ही गोष्ट ऐकून देखील बद्ध जीव समजू शकत नाही की ती शक्ती कोणाची आहे? शक्तिमानाचीच शक्ती असते. शक्तीच वेगळा कोणताही परिचय नसतो. 'सर्वभूतेषु शक्तिरूपेण संस्थिता' या चंडी पाठात उल्लेख आहे, आणि देवी प्रणाम मंत्रात म्हटले गेले आहे की—

**सृष्टि स्थिति विनाशानं शक्तिभूते सनातनि।**
**गुणाश्रये गुणमये नारायणी नमोऽस्तुते॥**

तेव्हा काय मूल पुरुष 'नारायणां'ना वेगळे करणे संभव आहे? वास्तविकरीत्या आम्ही सर्व प्रत्यक्ष अनुभवाशिवायच मोठमोठी भाषणे देण्यात व्यस्त झालो आहोत. गोमातेच्या विषयी बऱ्याचशा गोष्टी लिहिल्या जातात आणि ऐकल्या जातात, परंतु भाषण देणे मोठी गोष्ट नाही आहे, आवश्यकता आहे, प्रत्यक्ष अनुभवाची. केवळ शुष्क (कोरडे) भाषण देऊन किंवा लेखणी चालवून कधीही आंतरिकरीत्या 'गोमाते'प्रति श्रद्धा-भक्ती होऊ शकत नाही.

काही दिवसापूर्वी श्रीवृंदावन धामातील गोवर्धन क्षेत्रामधील चन्द्र सरोवराजवळ 'गोमाते'चे संरक्षण आणि संवर्धन या विषयावर एक विशाल धर्मसभेचे आयोजन झाले होते. तेथे विभिन्न संप्रदायांतून आलेल्या बऱ्याच साऱ्या साधुसंतांचा मेळावा भरला होता. श्रीबरसाना (वर्षाणा किंवा श्रीवृषभानुपूर) धामातून आलेले श्रीरमेश बाबांच्या मुखातून 'गोमाते'ची दुःखाने भरलेली करूण व्यथा ऐकून त्याच वेळी एक मुस्लिम भावाने सर्वांसमोर जोरजोराने ओरडून 'गोमाते'ची सेवा आणि संरक्षण करण्याची प्रतिज्ञा घेतली. ठीक अशाच प्रकारे आम्हा सर्वांना प्रतिज्ञाबद्ध व्हायला हवे—आणखी कोणताही उपाय नाही आहे. जागरूक जनसमाजाचे अशा परम-पवित्र गंभीर विषयावर वारंवार विचार करणे कर्तव्य आहे.

*लेखक-श्रीश्यामदास बाबाजी महाराज*

# श्रील गुरुदेवांचा संक्षिप्त परिचय



नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांचा शुभ आविर्भाव इसवी सन १९२२ मध्ये बिहार स्थित 'बक्सर' जिल्ह्यातील तिवारीपुर नामक गावात मौनी अमावस्येच्या दिवशी ब्रह्म-मुहूर्तात झाला. यांची आई आणि वडील—हे दोघेही 'श्री-वैष्णव' संप्रदायात दीक्षित वैष्णव होते. सुरुवातीपासूनच बालकाची धर्मात रुची होती. संसारापासून अत्यंत तीव्र वैराग्य झाल्यामुळे यांनी इसवी सन १९४६ मध्ये मूळ श्रीचैतन्य मठ आणि अन्यान्य सर्व मठांचे संस्थापक-आचार्य नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद श्रीश्रीलभक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर 'प्रभुपाद' यांचे अंतरंग प्रिय पार्षद नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद श्रीश्रीलभक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराजांकडून विधिवत दीक्षा प्राप्त केली.

आपल्या गुरुजींसोबत यांना भारतातील जवळपास सर्व तीर्थांची यात्रा करण्याचे सौभाग्य प्राप्त झाले. सर्व स्थानांवर गुरुजींची हरिकथा ऐकून यांनी त्यांच्या विचारांना गंभीरतापूर्वक आत्मसात केले. सन १९५२ मध्ये यांनी श्रीश्रीलभक्तिप्रज्ञान गोस्वामी महाराजांकडून संन्यास ग्रहण केला. काही काळ पश्चात गुरुजींनी यांना हिंदी भाषिक क्षेत्रात श्रीचैतन्य महाप्रभूंच्या वाणीचा प्रचार करण्यासाठी श्रीकेशवजी गौडीय मठ, मथुरेच्या संचालकाच्या रूपात नियुक्त केले.

येथून त्यांनी गुरुजींची आज्ञा आणि कृपेने श्रीभागवत पत्रिकेचे संपादन (संपादकीय कार्य) आरंभ केले. तसेच जैवधर्म, भक्ति-रसामृत-सिन्धु-बिन्दू, राग-वर्त्म-चन्द्रिका, सत्-क्रिया-सार दीपिका, भागवतामृत-कणा, व्रजमण्डल-परिक्रमा, नवद्वीप-धाम-परिक्रमा आणि अन्यान्य बंगाली भाषेत रचित अनेक श्रीगौडीय-वैष्णव-धर्माच्या संबंधित साहित्याचे हिंदी भाषेत अनुवाद कार्य आरंभ केले. ज्यांचा आता इंग्रजी, स्पॅनिश, डच, फ्रेंच, जर्मन, रशियन, इटालियन, पोर्तुगीज, चिनी इत्यादी विश्वातील अनेक भाषांमध्ये अनुवाद होतो आहे.

अनेक सुयोग्य ब्रह्मचारी भक्तांना त्यांनी संन्यास दीक्षा प्रदान करून त्यांना प्रचार कार्यात रत केले आहे. साऱ्या भारतभर आणि भारताच्या बाहेर अमेरिका, ब्राझिल, इंग्लंड, फ्रांस, बेल्जियम, हॉलंड, इटली, स्पेन, कॅनडा, रशिया, मेक्सिको, कॉस्टा रिका, ऑस्ट्रेलिया, इंडोनेशिया, मलेशिया, फिजी, न्यूझीलंड, जपान, चीन आणि हवाई (होनोलूलू) इत्यादी विश्वातील छोट्या-मोठ्या देशांमध्ये त्यांनी स्वतः प्रचार केला. सध्या त्यांचे शिष्य संपूर्ण विश्वात शुद्ध-भक्तीचा प्रचार करीत आहेत. सन २०१० मध्ये श्रीजगन्नाथ-पुरी-धामात त्यांनी समाधी घेतली. त्यांनी 'ईस्कॉन (आंतरराष्ट्रीय श्रीकृष्ण-भावनामृत-संघ, International Society of Krishna Consciousness)' चे संस्थापक-आचार्य नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त स्वामी महाराजांची प्रचुर सेवा केली.





# डॉ. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराजांचा परिचय



श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज जगद्गुरू युगाचार्य नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद् भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांचे संन्यासी शिष्य आहेत. आपले शिक्षण बीएस्सी (सन्मानपूर्वक पदवी), बॅचलर ऑफ इंजिनियरींग (भारतीय विज्ञान संस्थान, बेंगळुरू), मास्टर ऑफ सायन्स (भारतीय प्राद्यौगिकी संस्थान, मद्रास), डॉक्टर ऑफ सायन्स (वॉशिंग्टन विश्वविद्यालय, अमेरिका), सीआयएसएसपी (प्रमाणित माहिती प्रणाली सुरक्षा व्यावसायिक), पीई इतके झाले आहे.

आपण पूर्वी अमेरिकेतील जगप्रसिद्ध 'नासा' (राष्ट्रीय वैमानिक आणि अंतरिक्ष प्रशासन) या संस्थेत संगणक सुरक्षा वैज्ञानिक म्हणून कार्यरत होता. तसेच काही काळ सिटी यूनिवर्सिटी ऑफ न्यूयॉर्क मध्ये प्राध्यापक म्हणून आपण सेवारत होते. अमेरिकेत आपल्या नावे अनेक Research Patents (नव्या शोधांच्या पूर्ण अधिकारांची) नोंद झाली आहे. आपण अमेरिका, सिंगापूर, मलेशिया, दक्षिण आफ्रिका, केनिया, त्रिनिदाद, चीन, तैवान, ब्राझिल इत्यादी देशांमध्ये शुद्ध भक्तीचा प्रचार करित आहात. आपण शाकाहारासंबंधी इंग्रजी भाषेत एक ग्रंथ लिहिला आहे —"Vegetarianism—a scientifically proven and time honored path to peace" (शाकाहार-वैज्ञानिकदृष्ट्या सिद्ध झालेला शांतीचा प्राचीन सन्मानित मार्ग).

श्रील गुरुदेवांच्या आदेशानुसार श्रीरंगनाथ गौडीय मठ, हेसरकट्टा, बंगळूर द्वारा कन्नड भाषेत श्रीवैष्णव-सिद्धान्त-माला, श्रीमाधुर्य-कादंबिनी, श्रीजैवधर्म, श्रीचैतन्य महाप्रभूंचे स्वयं-भगवत्ता-प्रतिपादक काही शास्त्रीय-प्रमाण इत्यादी ग्रंथांचे प्रकाशन करण्यात आले आहे. श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी स्वामी महाराजांच्या पुढाकाराने श्रील गुरुदेवांच्या ग्रंथांचे प्रकाशन मराठी, तेलुगू, तामिळ, मल्याळम, बंगाली, स्पॅनिश भाषांमध्ये देखील अव्याहतपणे जारी आहे.

छोट्या बालकांच्या शाश्वत कल्याणासाठी आणि त्यांना भक्तीचे संस्कार प्रदान करण्यासाठी बंगळूर येथे आपण श्रीरंगनाथ गौडीय मठ गुरूकुलाची स्थापना केली. या गुरूकुलात मुलांना मोफत शिक्षण, भोजन, राहाण्याची व्यवस्था, वैद्यकीय उपचार इत्यादी देण्यात येतात. त्यांना भगवद्गीता-अध्ययन, हरिनाम-संकीर्तन, एकादशीचा उपवास, गुरुपुजा इत्यादी करण्यास शिकविले जाते. पूज्यपाद श्रीपाद भक्तिवेदान्त दंडी महाराज सर्वांना निर्जल एकादशी व्रत करण्याची प्रेरणा देतात. प्रत्येक दशमीला ते फोन वरून एकादशीच्या माहात्म्याबद्दल प्रवचन देतात.

आपण एक निष्कपट व निःस्पृह गोमातेचे सेवक आहात. आपल्या बंगळूर येथील श्रीरंगनाथ गौडीय मठात ६० पेक्षाही अधिक भारतीय प्रजातीच्या गायी, वासरे आणि वळूंची सेवा आणि संवर्धन होते आहे.

---

**राधाकृष्णप्रणयविकृतिर्ह्लादिनीशक्तिरस्मा-**
**देकात्मनावपि भुवि पुरा देहभेदं गतौ तौ।**
**चैतन्याख्यं प्रकटमधुना तद्द्वयं चैक्यमाप्तं**
**राधाभावद्युतिसुवलितं नौमि कृष्णस्वरूपम्॥**

*(चैतन्यचरितामृते १/१/५)*

राधाकृष्णांच्या प्रणय-विकृतिरूप ह्लादिनी-शक्तीद्वारे राधा-कृष्ण स्वरूपतः एकात्म असूनही विलास-तत्त्वाच्या नित्यतेसाठी राधा-कृष्ण नित्यकाळ दोन्हीही स्वरूपांमध्ये विराजमान आहेत, तेच दोन्ही तत्त्व या वेळी एका स्वरूपात चैतन्य-तत्त्वाच्या रूपात प्रकटित आहेत. म्हणून राधा भाव आणि कांतीद्वारे सुशोभित त्या कृष्णरूप गौरसुंदरांना प्रणाम करतो.

---

**पितामाता गुरुगण आगे अवतरि।**
**राधिकार भावकान्ति अंगीकार करि॥**
**नवद्वीपे शचीगर्भ-शुद्धदुग्धसिन्धु।**
**ताहाते प्रकट हैला कृष्ण पूर्ण इन्दु॥**

*(चैतन्यचरितामृते १/४/२७१-२७२)*

माता-पिता आणि अन्यान्य गुरुजनांना आधीच अवतरित करवून नंतर स्वयं श्रीमती राधिकेच्या भाव आणि कांतीला अंगीकार करून कृष्णरूपी पूर्णचंद्र श्रीधाम नवद्वीपात श्रीशचीमातेंच्या गर्भरूपी शुद्ध दुधाच्या समुद्रातून प्रकट झाले.

## श्रीएकादशी व्रताचा दिवंगत पित्यांना फायदा

मुंबईच्या एका सज्जनांचे वडील वारल्यानंतर त्यांच्या स्वप्नात येऊन त्यांना दर्शन द्यायचे. परंतु ते बघायचे की त्याचे वडील दुःखी आहेत. त्यांनी मळकट आणि फाटके कपडे घातलेले होते. ते त्यांच्या स्वप्नात येऊन त्यांना मदत करण्याची कळकळीची विनंती करायचे. त्या सज्जनाने श्रीपाद भक्तिवेदांत दंडी महाराजांच्या प्रेरणेने एकादशीच्या दिवशी उपवास करणे आरंभ केले. त्यांनी आपल्या एका एकादशीचे फळ आपल्या पित्यांना अर्पण केले. काही दिवसांनतर त्यांना आपल्या वडिलांचे स्वप्नात परत दर्शन झाले. यावेळी त्यांनी पाहिले की त्यांचे वडील फारच प्रसन्न होते. त्यांनी पांढरे धोतर, पांढरा झब्बा आणि पांढरे उपरणे घातले होते. त्यांच्या कपाळावर गोपीचंदनाचा उर्ध्व-पुंड्र टिळा सुशोभित होता. त्यांनी आनंदाने आपल्या मुलाला आशीर्वाद देत स्वतःला एकादशीच्या कृपेने सद्गती मिळाल्याची गोड बातमी दिली.

## विरोध झाल्यास एकादशी उपवासाचे फळ अधिक!

जर कोणी व्यक्ती इतरांद्वारे विरोध होत असताना सुद्धा एकादशीचे व्रत करते, तर तिला ज्यांना एकादशीचा उपवास करण्यास काहीही विरोध झाला नसेल त्यांच्यापेक्षा एक कोटीपट अधिक फळ प्राप्त होते. जर एखादी व्यक्ती इतरांना एकादशी व्रत करण्याची प्रेरणा देऊन त्यांना एकादशी उपवास करण्यास प्रवृत्त करते, तेव्हा त्या व्यक्तीची भूतकाळातील अनेक जन्मांची आणि पुढील जन्मांतील भावी पातकेसुद्धा जळून भस्मसात होतात. एकादशीचा प्रचार करणाऱ्या व्यक्तीइतका कोणीही भगवान श्रीकृष्णांना आणि श्रीशंकरांना प्रिय नसतो. *(श्रीमन् आनंदतीर्थ मध्वाचार्य-विरचित 'श्रीकृष्णामृत-महार्णव' या ग्रंथातून उद्धृत)*

## श्रीतुकाराम महाराजांचा अमूल्य उपदेश

ज्या व्यक्तीला एकादशी आवडत नाही, ती जिवंत अवस्थेतच नरकात राहणारी आहे. ज्या व्यक्तीला हे व्रत पसंत नाही, तिला नरकसुद्धा घाबरते. कारण ती व्यक्ती महापापी मानली जाते. जी व्यक्ती एकादशी व्रताचे पालन करते, तिला निश्चितच वैकुंठाची प्राप्ती होते. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात की ज्या व्यक्तीने पूर्व जन्मात पुण्यांच्या राशी एकत्र केल्या आहेत, तीच केवळ एकादशी व्रताचे पालन करते. जे एकादशीच्या दिवशी विडा किंवा तांबूल भक्षण करतात त्यांना ऋतुमती स्त्रीचा मासिक धर्मातील विटाळ (अशुद्ध रक्त) पिण्याचे पाप लागते. ते काळपुरुषाच्या तावडीत सापडतात.





नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज. आपण श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराजांना संन्यास प्रदान केला. जसे श्री कुरेशांनी श्रीरामानुजाचार्यांच्या प्राणांचे रक्षण केले होते, आपण पण आपला जीव धोक्यात घालून प्राणघातक हल्ल्यातून श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूरांचे रक्षण केले होते. आपण श्रीधाम मायापूर येथील श्रीभक्तिविनोद इंस्टिट्यूटला रविवारच्या ऐवजी एकादशी आणि पंचमीला साप्ताहिक सुट्टी प्रदान केली होती. एकादशी माधव-तिथी आहे. पंचमी तिथी श्रीमती सरस्वती देवी आणि श्रील भक्तिसिद्धान्त सरस्वती प्रभुपाद यांची शुभ आविर्भाव तिथी आहे. आपण दररोज तीन लाख हरिनामांचा जप करीत असत.

नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त स्वामी महाराज. आपण पाश्चात्य देशात हरिनाम आणि एकादशी माहात्म्याचा प्रचार केला. आपल्या तिरोभावापूर्वी श्रील भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांना आपल्या शिष्यांना मदत करण्याची आपण विनंती केली होती. ही आज्ञा शिरोधार्य मानून श्रील गुरुदेव नित्यलीलाप्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त नारायण गोस्वामी महाराजांनी चाळीस विश्व-प्रदक्षिणा करीत श्रीगौरवाणीचा प्रचार केला.



